माझ्या प्रिय मित्रांस

आणि

मैत्रिणींस



# अनुक्रमणिका



## वाचकमहाशय !

प्रस्तुत कादंबरी म्हणजे एका भावनाप्रधान जिवाच्या पंचवीस वर्षांपर्यंतच्या आयुष्यांत घडलेल्या प्रसंगांची गुंफण होय.

मनुष्य जन्मतः आजूबाजूच्या जीवांकडून सहानुभूतीची अपेक्षा करतो. दुसऱ्यानें आपल्याशीं गोड बोलावें, प्रेमानें रहावें, अशी अपेक्षा करणें रास्त नाहीं असें मला वाटत नाहीं. पण या गोष्टी मिळतातच असें नाहीं. आपल्या या चरित्रात्मक कादंबरीच्या नायकाचा हा अनुभव आहे—

१ मातापितरांची सहानुभूति......शून्य.

२ सहवासजन्य प्रेम, ( बन्याचें उदाहरण )......कायमचें शत्रुत्व.

३ तात्कालीन जडणारें प्रेम, ( श्री. साठे )......परिस्थितीमुळें लवकरच ताटातूट होते.

४ स्त्रियांचें प्रेम, ( शकुन्तलाख्यान )......आशा न करावी हें बरें.

त्याचे आडाखे कदाचित् चुकीचेहि असूं शकतील; पण चरित्र त्याचें आहे हें आपण विसरून भागणार नाहीं. त्याचे विचार ऐकणें आपल्याला प्राप्त आहे.

उद्वेगाच्या भरांत त्याला जाणीव झाली कीं, आयुष्य हें स्वतःच्या उपभोगाकरतां नसून दुसऱ्याच्या सुखाकरतां आणि स्वतःच्या त्रासाकरतां आहे— ही जाणीव पुष्कळांना झाली असेल—

## टीकाकारमहाशय !

वैद्यापुढें रोग्यानें सर्व कांहीं सांगणें त्याच्या हिताचें असतें, त्याप्रमाणें लेखकानें तुमच्यापासून कांहींएक दडवून न ठेवणें हें त्याच्या हिताचें असतें. हें माझें पहिलें पाऊल आहे. विख्यात लेखकांच्या पावलाची लांबीरुंदी मोजण्यांत उपयोगी पडणारी फूटपट्टी माझ्याकरतां सरसावून आणलीत तर त्यांत माझा गौरव

होण्याचा संभव आहे—पण त्यापेक्षां माझ्या पावलावर वळ उठण्याची भीति जास्त आहे. मौज ही कीं, तुमच्या-माझ्यांत एक पिढीचें अंतर आहे. वाङ्मयाच्या बाबतींत तुमचें माझें एकमत असणें शक्य नाहीं. तुमच्या लहानपणीं स्वप्नांत-सुद्धां न दिसणाऱ्या विजेच्या गाड्या आज आमच्या लहानपणीं प्रत्यहीं पुणें-मुंबई रस्त्यावर फिरतांना आम्हीं पहात आहोंत. काळांत फरक पडला आहे.

दीक्षितांचा बंगला,
भांगरवाडी, लोणावळें
ता. ३०-४-१९३०

सर्वांचा कृपाभिलाषी,
**विष्णु विनायक बोकील**

*  *  *

# फोल आशा

# प्रकरण १ लें



## पिलाचें घरटें

काय असेल तें असो, जगाचा अनुभव म्हटला म्हणजे बहुतकरून कटुच असतो. तारुण्याच्या तकाकीनें दृष्टीला विभ्रम होऊन आयुष्य म्हणजे वनभोजनाला निवडून काढलेलें एक रम्य ठिकाण वाटत असतें. वनभोजनाच्या सुरुवातीस दिसून येणारा उत्साह शेवटपर्यंत टिकत नसतो. उष्टया पत्रावळी फेंकून देतांना त्याबरोबर आपल्या आनंदीवृत्तीवर आपण न कळत पाणी सोडीत असतों.

अर्थात् हा निराशावाद लहानपणीं माझ्या डोक्यांत मुळींच नव्हता. लहानपणीं जर कोणता वाद डोक्यांत शिरत असेल तर तो हाच कीं, सबंध भाकरी खाल्ली तर आई रागावते कां? ओणवें उभें राहून पाठी-मागें वांकून पाहूं लागलों तर आई फटकन् चापटी कां मारते! खड्या सुरांत गाणें म्हणूं लागलों तर 'स् स्' करून आई कानांत बोटें कां घालते! थोडक्यांत, मी कांहींही करूं लागलों तरी ह्या मोठ्या माणसांना मध्येंच लुडबुड करण्याचें काय कारण असावें हें एक मोठें कोडेंच पडलें होतें मला. मला वाटतें आईची नि बाबांची ठाम समजूत होती कीं, ज्या दिवशीं हें पोरगें जन्माला आलें त्या दिवशीं सर्व अवगुण या पृथ्वीतलावर भाड्यानें जागा पहाण्याच्या शोधांत असावेत. आणि बिऱ्हाड आलें तें बारमाहीचेंच बिऱ्हाड आलें. असें सांगतात कीं, पुत्रजन्मामुळें पतिपत्नींच्या प्रेमाच्या ग्रंथी बलवत्तर होतात. म्हणणें अगदीं बरोबर आहे. पण माझ्या उदाहरणामध्यें त्या ग्रंथी बळकट होऊन माझ्या मानगुटीस बसत होत्या

हेंच काय तें चुकत होतें. माझ्या जन्मामुळें आईला आनंद झाला. छान. बाबांना आनंद झाला. छान. बाबा आईच्या अर्ध्या वचनांत वागूं लागले. उत्तम. आई बाबांच्या अर्ध्या वचनांत रहाणार आणि बाबा आईच्या अर्ध्या वचनांत रहाणार. म्हणजे दोन्हीपक्षीं उरलेला आवेश 'कार्ट्या'च्या माथीं बसणार! मातापितरांची ही एकजूट अभिनंदनीय जरी असली तरी मला बरीच नडत असल्यामुळें जर कधींकाळीं आई बाबांना टाकून बोललीच तर मला तो पर्वणीचाच दिवस वाटे. त्या दिवशीं मी अगदीं मोकळ्या मनानें बाबांना समजावून सांगत असें, 'आई वाईट आहे. रोज माझ्याशीं भांडते; आज तुमच्याशीं भांडली—उद्यां तुम्हांला मारील-सुद्धां. तुम्ही तिच्याशीं बोलूं नका. तुम्ही आपले माझ्याशींच बोलत जा कसे—' पण 'बालादपि सुभाषितं ग्राह्यम्' हें वचन बाबांच्या गांवींही नसल्यामुळें माझी विवेचनपद्धति पोरकटपणाची समजली जाई आणि 'तोंडांत पाहिजे का?' म्हणून प्रश्न विचारण्यांत येई.

आईच्या बाबतींत तीच तऱ्हा. बाबांच्या घरांत रहाण्यापेक्षां मामांच्या घरीं जाऊन रहावें; पुन्हां बाबांचें तोंड पाहूं नये हा सल्ला तिला पटत नसे. मला हें एक कोडेंच होतें. मामा रोज खाऊ देतात. बरोबर हिंडायला नेतात. गोष्टी सांगतात. अन् पुन्हां कांहींही केलें तर हड्हड् बिलकूल नाहीं. मग आईला मामांच्याकडे जाणें कां आवडत नाहीं? ज्या घरांत हाताव्यतिरिक्त खाऊ नाहीं, कोंडण्याच्या खोलीपलीकडे हिंडणें नाहीं, आणि रागाच्या शब्दावांचून दुसरी गोष्ट नाहीं त्या घरांत रहाणें आईला काय आवडत असेल तें तिचें तीच जाणे. मातापितरांच्या माझ्यावरच्या या रोषाचीं कारणें सकारण वा अकारण आहेत हें ठरविणें फार कठीण आहे. एक तर माता म्हटली म्हणजे लगेच डोळे किलकिले करून गर्हिवरलेल्या नेत्रानें मातेचें गुणवादन करीत सुटणाऱ्या कविजनांना हें समजणारच नाहीं. 'आई! अन् मुलावर रागावणार! अरे काय राव! हेच आईचे उपकार फेडणार वाटतें तुम्ही. तुम्हांला तिनें जन्म दिला—' वगैरे वगैरे ठराविक सांच्याच्या बोधामृतानें ते पुढें धांवतील. पण कविराज! तुमच्या काव्याचा जोर उसनवारीवर कसा अवलंबून असतो हें मला पूर्ण-

पणें कळून चुकलें आहे. कधींकाळीं पूर्वीं एका ठोंब्या पशूनें आईवर गुण-वर्णनपर कविता केली. आजपर्यंत तुम्ही लोक त्याची ‘री’ ओढीत आलांत. काव्याचा विषय विटून गेला तरी तुमचें तोंड अजून मिटत नाहीं अं !

मी या बाबतींत कोणत्याही तऱ्हेचा पक्षपात करूं शकत नाहीं. आई म्हटली कीं अंगचें मनुष्यपण उडून देवपण येतें या मताचा मी नाहीं. जशा इतर परिस्थिति असतात त्याप्रमाणें ‘आई’ ही एक मुलाच्या आयुष्यांतील परिस्थिति आहे. त्यांत ती कसले आपल्यावर उपकार करणार आणि आपण ते काय मानणार ? लहानपणीं बहीण या नात्यानें भावाशीं उभा दावा ठेवणारी मुलगी मोठेपणीं आई या नात्यानें एका कोंवळ्या अर्भकाला ‘सळो कीं पळो’ करून सोडील यांत नवल असें कांहींच नाहीं. माझ्या आईचें व मामाचें कधींच पटलें नव्हतें. माझें आणि माझ्या आईचें कधींच पटलें नाहीं. बाबांशींच ती जरा नमतें घेत असे याचें कारण ‘उडी मारायची झाली तर आधाराला जागा ही पाहिजेच’ याकरतांच असावें.

प्रथमरत्न जन्माला येण्यापूर्वीं नवराबायकोमध्यें प्रेमाच्या पैजा लागाव्यात यांत कांहींएक वावगें नाहीं. अगदीं सृष्टिनियमांना धरून आहे. आईनें पैज लावली होती, माझें नांव ‘शकुंतला’ ठेवायचें ठरलें होतें. नंतर माझ्याकरतां आकडे किती रंगाचे, किती तऱ्हेचे आणायचे याचा हिशोबसुद्धां ठरला होता. नंतर माझ्या लग्नांत हुंडा किती द्यायचा, जांवई किती शिकलेला पहायचा, सासू, सासरा, दीर, नणंद अगदीं भरल्या घरांत मला द्यायचें म्हणजे गेल्याबरोबर लगेच ‘ये ग चुलीबाई, ये ग चुलीबाई’ करायला नको, वगैरे वगैरे सर्व कांहीं आईनें ठरवून ठेवलें होतें. शकुंतला कदाचित् ‘माता’ या संस्थेची स्तुतिपाठक बनली असती. शकुंतलेचें आयुष्य खरोखरी सुखांत गेलें असतें. पण—मी ‘सुडकरी’ जन्माला आलों. आई पैज हरली. आईच्या भावना दुखवल्या गेल्या. आशा, इच्छा, आकांक्षा धुळीला मिळाल्या. शकुंतला माडीवरच्या तसबिरींतच राहिली.

बाबांनीं पैज जिंकली होती—पण पुढें त्यांना कळून आलें कीं आपल्या कल्पनेप्रमाणें हें पोरगें नाहीं. याला चांभारचौकशा फार. कल्पना नाहीं त्या ठिकाणीं तोंड घालण्याचा मोह अनिवार. जाऊं नको म्हटलें तरी जाणार. बाबांची कल्पना निराळी होती. त्यांना पितृभक्त मुलगा पाहिजे होता. म्हणजे सांगेल तें करावें अन् पुन्हां नेमल्याजागीं बसावें. बहुतेक सर्व पित्यांची इच्छा हीच असते कीं पोरानें कसें सुतासारखें सरळ वागावें. जेव म्हटलें जेवावें; नीज म्हटलें निजावें; धांव म्हटलें धांवावें. अंगणांत बांधलेल्या टिप्या कुत्र्याप्रमाणें आज्ञाधारकपणा दाखवणें निदान माणसाच्या मुलाला अशक्य आहे हें बाबांच्या ध्यानींमनींही नव्हतें. अर्थात् 'चंपे ये' म्हटलें म्हणजे चंपी धांवत येत असे; पण सदाशिव बाळ वडिलांच्या पहिल्या हांकेला 'ओ' देणें अधर्म समजत असे. मुकाट्यानें सावकाश पावलें टाकीत जाण्याचा हुकूम सुटला कीं कायदेभंग करण्यांत ह्याला मौज वाटे. एके दिवशीं मीं उत्तरसुद्धां दिलें, जोरानें चालण्यानें खालीं माती पडते तर ती माती गोळा करून आणावी अन् पुन्हां वर थापावी ! ह्या सरळ उत्तराला सरळ प्रत्युत्तर मिळालें. तेव्हांपासून बाबांशीं सरळ वागण्यांत कांहींच अर्थ नाहीं, आपल्याला जें करायचें त्यांत चुकूं नये. 'कर्मण्येवाऽधिकारस्ते मा फलेषु कदाचन' मी फलाची आशा कधींच मनांत धरीत नसें. उलट 'फल' नकोच ह्या निस्पृह बाण्यानें मी कोणत्याही कार्याला हात घालीत असें.

त्यांतल्या त्यांत 'दगडापेक्षां वीट मऊ' ह्या न्यायानें बाबांच्यापेक्षां आई मला जरा बरी वाटे. जात्या स्त्री असल्यामुळें माझ्यासारखें पोरगेंसुद्धां तिला चुटकीसरशीं फसवीत असे. आईला फसवतां येणें शक्य आहे हा शोध मला अचानक लागला.

बायका 'अमक्या एका ठिकाणीं उभ्या उभ्या जाऊन येतें' म्हणाल्या कीं त्या बसल्याबसल्या चार तास घालवतात हें सर्वांना ठाऊक असेलच. आणि भेटीला निमित्त कांहींच नसतें हेंही महशूर आहेच. आईकडे तिच्या चारदोन मैत्रिणी अशाच कांहींशा कारणानिमित्त सहजच उभ्याउभ्या आल्या होत्या. त्यांत एक बाई, औरंगजेब बादशहाच्या छावणीच्या शिरस्त्या-

प्रमाणें, परिवारासह आली होती. तळ हालवतां हालवतां दोनतीन दिवस सहजच लागायचे हें मोगलांच्या कारकीर्दीचा इतिहास चाळून पाहतां समजण्याजोगें आहे. त्या बाई 'येतें, येतें' म्हणतां म्हणतां इतका वेळ बसल्या कीं घरीं जाऊन पुन्हां खरोखरीच परत आल्या कीं काय असेंच मला वाटलें. निघतां निघतां मामुली पद्धतीप्रमाणें त्यांनीं माझ्या दंडाला धरून मोठ्या आर्जवयुक्त स्वरानें विचारलें,

" काय रे गुलामा, अं ? येतोस का आमच्या सुशीलेशीं खेळायला, अं ? भारीच गुलाम झाला आहेस तूं अं ? आईचं ऐकत नाहींस का रे, अं ? गुलामांनो, तुमच्या एवढ्या खस्ता खायच्या अन् तुम्हीं असे पांग फेडायचे, अं ?"

लहान मूल झालें म्हणून काय झालें ? स्वाभिमान हा प्रत्येकाला असतोच कीं नाहीं ? आमच्या घरीं यायचें, खुशाल चारदोन तास चकाट्या पिटायच्या, माझें मधल्या वेळचें खाणें बुडवायचें, दोनतीन खुळचट पोरींशीं मला खेळायला लावायचें, आणि वर ही मखलाशी ? मी झटक्यासरशीं दंड सोडवून घेऊन म्हणालों,

" तुम्हाला काय करायचं आहे आमच्या आईशीं अन् माझ्याशीं ? मी गुलाम नाहीं. तुमची सुशी गुलाम आहे. तुमची विमली गुलाम आहे. तुमची बबिटली गुलाम आहे. अन् तुम्हीसुद्धां—"

आईनें झटकन् मला जवळ ओढून घेतल्यामुळें माझ्या या न्यायनिर्णयाचें कार्य तसेंच राहून गेलें. कारण त्या प्रकरणानंतर सदरहू बाई पुन्हां आमच्या घराचा उंबरठा कधींही चढल्या नाहींत. आईला त्या दिवशीं माझें कौतुक वाटलें. आपला पोरगा अगदींच कांहीं टाकाऊ नाहीं. आतां शकुंतला असती तर—पण आतां काय त्याचें ? हें पोरगेंसुद्धां वेळीं उपयोगी पडतें; नाहीं असें नाहीं.

कारण, मला पुष्कळ दिवसांनीं कळलें कीं त्या बाईचा नक्षा उतरविण्याचा आईचा बेत होता. पण तें जमावें कसें हें तिला समजत नव्हतें. जें काम थोरामोठ्यांच्या हातून होणें अशक्य असतें तें काम एखादें पोरगें कसें बिनबोभाट करून जातें याचें हें एक उत्कृष्ट उदाहरण आहे. या

वरील प्रकारावरून माझ्या फायद्याची गोष्ट ही झालीं कीं, आईच्या मनःस्थितीचें मला थोडेंबहुत ज्ञान झालें. शत्रूंना शिव्या आणि मित्रांना गौरवयुक्त शब्दानें उल्लेखणें हें कोणाही मनुष्याला आवडतें. शत्रू निंदा आणि मित्र वंदा हा मनुष्यस्वभाव आहे. आणि या धोरणानें आई रागावली कीं मी तिच्या शत्रूंना सप्पाटून लाखोली वाहात सुटें. कांहीं वेळानें मात्रा बरोबर लागू पडे.

जन्माला येण्यापूर्वी मनपसंत मातापितरांची निवड करण्याची जर आपल्याला मुभा दिली गेली तर मुलगा होऊन यायचें असेल तर पहिल्या नंबराचा मान घेण्याच्या भानगडींत कधींही पडूं नये असें मला वाटतें. कारण अगदीं उघड आहे. आईबाप दोघेंही तरुण असल्यामुळें शिशुसंगोपन म्हणजे कशाशीं खातात याचा त्यांना बिलकुल अनुभव नसतो. उलट, 'हें कारटें नव्हतें म्हणून नाटकाला तरी बरोबर जातां येत होतें. आतां कुठं कुठं म्हणून जायची सोय नाहीं ! या धर्तीची आईची कुरकुर सुरू होते; आणि वडिलांना मालकी हक्क गाजवण्याची हौस म्हणूनच कीं काय 'पत्र्यावर ठेवीन रडलास तर ' अशा धमक्या द्याव्याशा वाटूं लागतें.

त्यांतून लहानपणीं चीन देशाशीं आपला किती जिव्हाळ्याचा संबंध येत असतो हें सांगायला नकोच. बाजारांतून अफू आणण्याचा बाबांना मनस्वी कंटाळा होता कीं लाज वाटत होती देव जाणे. आणि अफू नसली कीं माझा अपमान होई. या अपमानाचीं भरपाई करण्याकरतां आईला मानेवर खडा ठेवण्याची शिक्षा मी फर्मावीत असें. अर्थात् पांच वर्षांच्या अवधीनंतर अफू सोडणें भाग पडलें. पण पांच वर्षांतील अफूच्या खुराकाचा अम्मल पुढें दोनतीन वर्षेंपर्यंत तसाच कायम होता. 'खरूज, नायटे इत्यादि रोग ! हें शरीर त्याचें बिढार ' हा प्रकार माझ्या वयाच्या सातव्या वर्षापर्यंत चालू असे. दर वर्षी नवीन फुटणाऱ्या पालवीप्रमाणें हे संतशिरोमणी ताज्या दमानें चढाई करून येत. माझी आई आणि माझें शरीर तितक्याच जोमानें प्रतिकार करण्याचा प्रयत्न करींत. मला समजूं लागल्यापासून तें सर्व बंद पडलें. पण मला समजूं लागलें तें हळूहळू न समजूं लागतां एकदम सगळें समजूं लागलें. आणि म्हणूनच वडीलमातोश्री एका

बाजूला आणि अतिशहाणें पुत्ररत्न एका बाजूला असा हा लढा पडला.

कोणी कांहींही म्हणो, माझी तरी पक्की खात्री आहे कीं मी नसत्या चौकशा कधींही करीत नसें. आतां लोकांना जर माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देतां आलीं नाहींत तर तो कांहीं माझा अपराध नव्हता. मी प्रश्न विचारी म्हणून बाबांना अतिशय चीड येत असे.

एकदां आम्ही सदर्न मराठयाच्या गाडीनें कुठें कोल्हापूरला कीं कुठेंसें जात होतों. ती छोटीशी गाडी, तें झुकुझुकु करणारें एंजिन वगैरे नवीन प्रकार पाहून मला मोठी गंमत वाटली. मी बाबांच्याजवळ चौकशी केली. माझे प्रश्न सारखे चालूच होते. बाबा कांहीं तरी उत्तरें देऊन वेळ मारून नेण्याच्या खटपटींत होते. एरवीं ते माझ्या अंगावर ओरडले असते, पण गाडींत समोरच्याच बांकावर मामा बसलेले असल्यामुळें ते ओरडणार नाहींत हें मला नक्की माहीत होतें. लहान मुलाच्या शिरस्त्याप्रमाणें मी सूड उगवण्याचा निश्चय केला होता. गाडी इतकी लहान कां? ती कुणीं केली? तुम्हाला गाडी तयार करतां येईल का? कां नाहीं? मग तुम्हाला काय येतें? इत्यादि प्रश्नांचीं भेंडोळीं मी विजेचा झटका बसलेल्या माणसा-प्रमाणें भराभर पुढें टाकीत होतों. बाबांची दर क्षणीं पालटणारी मुद्रा पाहून मला आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. कपाळाच्या आंठीगणिक प्रश्नाचे आंकडे वाढत होते.

"आई, तुला जर सरकारनं गाडी दिली तर तूं काय करशील?" मीं आईला विचारलें.

"तूं नीट बैस पाहूं. बाहेर वांकूं नये लहान मुलांनीं." आईनें प्रश्न टाळलेला मीं ओळखलें.

"मला जर गाडी कुणीं दिली तर मी अशी जोरानं हाणीन कीं नाहीं कीं सगळीं माणसं घाबरून जातील. अन् घाबरले म्हणजे मी मोठ्यानं हंसेन!" मी म्हणालों.

"भद्रीनारायण आहेस. बोलणं तरी धड आहे का?" आई जरा त्रासिक मुद्रेनें म्हणाली.

"आई, हें बघ—हें बघ. कित्ती गाडी वांकली पण! आई, इतकी गाडी वांकली तर पडत कां ग नाहीं ती?" मीं विचारलें. इतका वेळ शान्त दिसत असणाऱ्या ज्वालाग्राही पर्वताप्रमाणें एकदम सत्यस्वरूपांत प्रकट होऊन बाबा वस्कन् माझ्या अंगावर आले. "तूं जर आतां एक शब्द बोललास तर इकडचं थोबाड तिकडे करून देईन. बेअक्कल—" बाबांचें अवसान पाहून मी थोडासा नरमलों. पण जरा वेळानें मला नवीनच शंका आली. मी हळूच मामांना विचारलें, "मामा, इकडचं थोबाड तिकडे म्हणजे कसं?" मामांनीं उत्तर देण्याच्या आधींच बाबांनीं मला सप्रयोग उत्तर दिलें. मी आपली नापसंति व्यक्त करण्याच्या उद्देशानें तारस्वरांत गाणें घोळायला सुरुवात केली. बाबा सारखे 'चूप, चूप. अगदीं चूप' म्हणून दटावीत होतेच. आईनें मोठ्या नाइलाजानें मला मांडीवर घेतलें. शेजारींच बसलेल्या एका मराठमोळा बाईला माझी कींव आली.

"अयाऽऽईऽ काय पोर कळवळलं व्ह. ये—माझ्या राजा—ये" म्हणून तिनें माझी बाजू उचलून धरतांच मला जोर आला. डब्यांतल्या पानतंबाकूभक्तांनासुद्धां माझी दया आली. बाबा खजील झाले. आईनें खिडकीच्या बाहेर पहाण्यास सुरुवात केली. विजयी मुद्रेनें एकवार बाबांच्याकडे पाहून मी मामांच्या मांडीवर जाऊन बसलों.

अशा थाटांत आयुष्याची नौका मीं पाण्यांत सोडली होती. नौका बांधून देण्याची ज्यांनीं खटपट केली होती त्यांच्यापासून मला मदतीची आतां फारशी आशा नव्हती. माझ्या कोणत्याही करण्याचें कौतुक तर बाजूसच्च राहिलें, उलट माझा उत्साहभंग करण्यांतच बाबांना आणि आईला मौज वाटत असे. बाबांनीं किंवा आईनें, मर्जीविरुद्ध कां होईना, पण थोडेंसें माझ्याच कलानें घेतलें असतें तर माझा व त्यांचा संबंध कदाचित् निराळ्या स्वरूपाचा राहिला असता. लहान मुलांची मनोभूमिका तयार करण्याची जबाबदारी सर्वस्वीं त्यांच्या आईबापावरच अवलंबून असते. नेहमींच निष्कारण हिडिसफिडिस करण्यांत काय मतलब आहे? त्यामुळें मुलांची मनःस्थितीही तदनुरुप एककल्ली बनत जाते. निदान माझ्या बाबतींत

तरी माझ्या या तऱ्हेच्या तऱ्हेवाईक वागणुकीला आई आणि बाबा कारणीभूत आहेत हें मी निश्चयानें सांगूं शकेन. मुलांची वृत्ति स्वभावतःच झालेल्या गोष्टींचें विस्मरण होण्याकडे झुकत असते, त्यामुळें मला त्या वेळेस कांहीं इतकासा त्रास झाला नाहीं. पण पुढें पुढें या गोष्टींची मला चांगलीच जाणीव होऊं लागली.

शेजारचा चपट्या डोक्याचा बन्याही पण माझ्यासारखाच किनाऱ्या-किनाऱ्यानें आपली नौका वल्हवीत होता. तास न् तास त्याच्या कर्तबगारी-कडे लक्षपूर्वक पहाण्याचा मला नादच लागला होता. बन्याच्या आयुष्यांत डोकावण्याची मला बिलकुल इच्छा झाली नसती, पण एके दिवशीं तो प्रसंग अचानक रीतीनें घडून आला, आणि त्यामुळें बन्याचा आणि माझा पुढें परिचय वाढला. बन्या माझ्यापेक्षां दोन वर्षांनीं मोठा होता. शाळे-मध्यें बन्या जाऊं लागला होता. दुपारच्या प्रहरीं मी अंगणांत खेळत होतों. दोनतीन रिळें आणि ताटें ठेवण्याकरितां ठोकलेले एकदोन खिळे (आईला नकळत उपटून आणलेले) इत्यादि साधनसामुग्रीवर एक छानदारशी विहीर खणण्याचा माझा प्रयत्न चालू होता. खरोखरींचें पाणी लागलेंच पाहिजे हा तर माझा दृढनिश्चय होता. खिळ्यांनीं खणतां खणतां हाताचे खवाटे दुखूं लागले तरी मी नेटानें काम चालू ठेवलें होतें. 'जिथें तिथें खणून ठेवायला तूं काय आदल्या जन्मीं घूस होतास कीं काय!' म्हणून आई नेहमीं ओरडत असे. पण आज माझा निश्चय ठरला होता कीं कितीही त्रास पडला तरी हरकत नाहीं. अंगणांत विहीर पाडीन तेव्हांच राहीन. मग आईला पाणी घेऊं देईन का? नांव नको! हात तर लाव म्हणावें आमच्या विहिरीला,—असा मोठ्यांदा रडेन कीं नाहीं! अन् मग सगळे बाहेरचे लोक येऊन माझी पाठ थोपटतील. बाबांना जोरांत सांग-तील, 'काय हो! इतका तुमचा मुलगा शहाणा असून तुम्ही त्याला उगीच मारतां? पुन्हां तर त्याला मारा,—म्हणजे मग दाखवतों कसें काय तें.' हें ऐकल्याबरोबर बाबा पुन्हां म्हणून कधीं माझ्या अंगावर ओरडणार नाहींत. मीं छत्री मागितली कीं छत्री आणून देतील. गोट्या खेळायल्या मागितल्या तर 'धेडाचा मुलगा आहेस का गोट्या खेळायला!' म्हणून

वस्कन् ओरडणार नाहींत. मी जें जें मागेन तें तें एक शब्द न बोलतां मुकाट्यानें आणून देतील.

पुष्कळ खणलें म्हणजे पुष्कळ पाणी लागेल; आणि थोडेंसें खणलें म्हणजे थोडेंसें पाणी लागेल ही माझी समजूत. पण चार बोटें खणूनसुद्धां पाणी लागेना तेव्हां आशा फोल होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. पुन्हां आणखी थोडें खोल खणण्याचा मीं विचार केला.

कांहीं वेळानें हाताचीं बोटें दुखूं लागलीं. जमिनींत पाणी येण्याचा रंग दिसत नव्हता तरी डोळ्यांमध्यें अभ्रांची गर्दी होऊन डोळ्यांवाटे पाणी येण्याचा रंग दिसूं लागला. तरीही पण हातांतलें हत्यार बाजूला केलें नाहीं. पांढरपेशा वर्गानें विहिरी वगैरे खणण्याच्या खटाटोपांत पडूं नये, हा धडा मला त्या वेळेला मिळाला. डाव्या हातानें माती काढायची आणि उजव्या हातानें खिळा मारायचा हा क्रम. पण अवधान न राहिल्यामुळें डाव्या हातानें आणि उजव्या हातानें एकदम एकाच वेळीं दोन्हीही कामें करण्याचा योग जमून आला. झटक्यासरशीं मी डाव्या हाताचीं बोटें तोंडांत घातलीं आणि खिळा दूर फेंकून दिला. याच वेळीं शेजारच्या घरांतून एका लहान मुलाचा आवाज ऐकूं आला—

" आई—ए आई, तो बघ मुलगा बोट चोखतो आहे. मी शहाणा आहें कीं नाहीं? मी कधींसुद्धां तोंडांत बोट घालत नाहीं—"

" आहेच माझा सोन्या तसा शहाणा. जीं वाईट मुलं असतात तींच अशीं मातींत खेळतात, हाताचीं बोटं चोखतात, रडतात. आपण असं कध्धीं करूं नये हं " म्हणून बन्याच्या आईनें माझ्याकडे तुच्छतापूर्वक पाहिलें. मला असा संताप आला कीं हाताचें दुःख थोडेंसें कमी तीव्र असतें तर मी खिळा फेंकूनच त्या 'सोन्याला' शहाणपण शिकवलें असतें. ज्याप्रमाणें डिंवचलेला सिंह केवळ अशक्यता आहे म्हणून आपल्याशींच गुरगुरत पडतो त्याप्रमाणें मी मनाशींच पुटपुटत त्याच्याकडे पाहूं लागलों. आज नाहीं तर पुन्हां कधीं तरी याचें वट्टें काढीन, हा विचार मात्र मीं मनाशींच बांधून ठेवला.

" आई—तें बघ. अजून तो तोंडांतलं बोट काढीत नाहीं. वेडा आहे का ग तो मुलगा ? ए मुला—बोट काढ तोंडांतलं—नाहीं तर माझी आई मारील बघ तुला—"

यावर छानदारसें उत्तर देण्याकरितां मी तोंड उघडणार तों एक नवीनच प्रकार घडून आला. मला प्रथम ह्याचा कांहींच उलगडा होईना. पण जेव्हां लक्षांत आलें तेव्हां मात्र मी मोठ्यानें हंसलों. बन्याच्या आईनें हातांतलें शिवण्याचें बाजूस ठेवलें आणि बन्याला जवळ ओढून घेतलें. " कसा ग बाई गुणाचा ! अरे नको असं बोलूंस. दृष्ट होईल. ऐकायचं म्हणून नाहीं." इत्यादि शब्दांनीं गौरवीत, बन्याच्या नाकाला नाक लावून त्याला गोंजारीत, एखाद्या अधाशाप्रमाणें बन्याच्या आईनें त्याचे पटापट मुके घेण्यास सुरुवात केली. तिच्या हातांतून सुटण्याकरतां बन्यानें खूप खटपट केली. पण मायापाशाच्या पकडींतून आजपर्यंत कोण सुटलेलें आहे ? जों जों बन्या तोंडावर हात ठेवून तिचें तोंड बाजूस करण्याचा प्रयत्न करी तों तों ती आवेशानें त्याचे मुके घेई. बन्याचा होत असलेला हा कोंडमारा पाहून मला हंसूं कोसळलें.

सातआठ वर्षें वयाच्या मुलाची ही दैना पाहून कुणाही समवयस्क मुलाला त्याची कींवच आली असती. कदाचित् बन्यानें मला चिडवलें नसतें तर मी त्याच्या मुक्ततेसाठीं कांहीं तरी धडपड केली असती. पण झालेला अपमान गिळण्याइतका मोठेपणा माझ्या अंगीं बिलकूल नव्हता. बन्याची बोबडी वळलेली पहातांच माझ्या अंगांत पिशाच्च नाचूं लागलें. मी मोठ्यानें हंसत नाचूं लागलों. व मोठ्यानें ओरडून म्हणालों,

" काय पापा गोल ( गोड ) लागतो पण—पप्पी देते का बाबी ? "

पापीच्याऐवजीं मला टप्पी मात्र चांगलीच मिळाली. मी एकदम नृत्याचा नाद सोडून देऊन मागें वळून पाहिलें. पाठीमागें आईसाहेब उभ्या होत्या. हात उगारलेला होता. पावित्र्यांत उभी असलेली मातृदेवता पहातांच मी देखल्या देवा दंडवत ठोकून घरांत पळालों.

पण बन्याची आणि माझी दोस्ती जमण्यास यापुढें मुळींच वेळ लागला नाहीं. बन्यानें हळूहळू माझ्याजवळ सर्व कांहीं सांगितलें. बन्याविषयीं

पुष्कळच गोष्टी मला कळल्या. बन्याचें सगळयांत मुख्य गाऱ्हाणें हें होतें कीं आई दिवसांतून कमींतकमी दहा वेळां तरी त्याचा हा असला छळ करीत असे. बन्याच्या आईचा हा वेडेपणा घालवावा कसा हें कांहीं आम्हांला समजेना. कांहीं लोकांना दारू पिण्याचें व्यसन असतें, कांहींना कशाचें व्यसन असतें म्हणून मामा मला कांहीं तरी सांगत असत. पण बन्याच्या आईला लागलेल्या ह्या चमत्कारिक व्यसनाविषयीं मामा एक अक्षरसुद्धां बोलले नव्हते. पण त्यांना विचारावें तरी कसें ? कारण ते मुंबईला अन् मी पुण्याला. मित्राचें जें दुःख तें आपलें दुःख म्हणून पुन्हां त्याला यासंबंधीं चिडवणार नाहीं हें मात्र मीं वचन देऊन कबूल केलें. तरी बन्या तोंड पुशीत घराबाहेर पडला कीं मला हंसूं आल्यावांचून रहात नसे. बन्याचें दुसरें एक गाऱ्हाणें होतें तें हें कीं घरामध्यें त्याला वडील 'बनूताई' म्हणून संबोधीत. आतां ह्या गाऱ्हाण्याचें निस्तारण करणें माझ्या आटोक्याबाहेरचें काम होतें.

यापुढें एकजुटीनें वागून, एकमेकांच्या दुःखांत सहकार्य करून मोठे होईपर्यंत कसे तरी दिवस ढकलण्याचा आमचा बेत ठरला. मोठें होण्याला साधारणपणें दिवस किती लागतील याचा आम्ही हिशोब करून पाहिला. आंकडेमोडीची संवय नसल्यामुळें नक्की दिवस किती लागतील तें कांहीं काढतां येईना. अदमासें 'पुष्कळ दिवस' लागतील हा बन्याचा निर्णय मीं बिनतक्रार मान्य केला. हा बेत ठरल्या दिवसापासून आम्ही कांहीं दिवस आज कालच्यापेक्षां किती मोठे झालों हें अजमावून पाहूं लागलों. पण तें कांहीं नीटसें जमेना. कारण आज आठ विती उंच, उद्यां सातच विती उंच असा पिछेहाटीचा अभूतपूर्व प्रकार घडूं लागला. तेव्हां आपण दिवसेंदिवस मोठे होतों कीं लहान होतों हा एक प्रश्नच येऊन पडला. आणि लहान होतों असें जर ठरलें तर मग काय करणार ?

# प्रकरण २ रें



## शान्तामामी

‘येणार ! येणार ! !’ म्हणून जाहिराती फडकावून सुमारें आठ दिवस झाल्यानंतर एके दिवशीं सकाळच्या सुमारास मामी एकदांची आली. बन्या तर रोज येऊन मला विचारी. माझी मामी ही काय चीज आहे हें प्रत्यक्ष पहाण्याची त्याची आतुरता सारखी वाढत होती. मी त्याला मामीच्या पुष्कळच गोष्टी सांगितल्या होत्या—

“ माझी मामी फार चांगली आहे. इतकी मोठी असून माझ्याशीं खेळते. कधींही रागावत नाहीं. ‘अहो सदाशिवराव’ म्हणून मला एखाद्या मोठ्या माणसारख्या हांका मारते. मी तिच्या अंगावर चढून बसतों. आम्ही डोंगर डोंगर खेळतों. तेव्हां ती अगदींसुद्धां हालत नाहीं. अन् आतां ती एक लहानसं बाळ आणणार आहे. मी कांहीं अजून तें बाळ पाहिलेलं नाहीं, पण मला वाटतं तुझ्यामाझ्यासारखं तें असेल. आमच्या शान्तामामीला लहान मुलं फार आवडतात. मीं तिला विचारलं कीं, तुला जर मुलं आवडतात तर तूं एक आणून कां ठेवीत नाहींस तुझ्या घरांत ? तर ‘देवाची मर्जी’ कीं असंच कांहीं तरी ती देवाविषयीं म्हणाली. आतां देव तिला मुलगा देणार आहे. तो घेऊन जाण्यासाठीं तर ती आमच्या घरीं येणार आहे—”

हें सगळें वर्णन बन्यानें शान्त चित्तानें ऐकून घेतलें. मात्र हलकेच ‘आमच्या आईसारखं तर ती करणार नाहीं ना ?’ म्हणून विचारण्यास विसरला नाहीं. हा प्रश्न ऐकून मी मनांत चरकलों. कारण, एकदोन वेळां शान्तामामीनेंसुद्धां माझा हा असला कोंडमारा केला होता. मीं जेव्हां तिला बजावून सांगितलें कीं ‘हें काय असं वेड्यासारखं, लोकं काय म्हणतील ?’ तेव्हां ती लगेच हंसून म्हणाली, “ग बाईऽऽ आतां तुम्ही मोठे झालां नाहीं का सदाशिवराव ? पण म्हटलं, मोठेसाहेब, ही तुमची

आवडनिवड आणखी किती दिवस चालणार हो ? बरं बाई, माझं काय ? नाहीं आवडत तुम्हाला, राहिलं ! आतां तुम्ही आहांत आणि मी पण आहें. कधींकाळीं जर का सांपडलांत तर याद राखा—" मला तिच्या या बोलण्याचा कांहींच अर्थ समजला नाहीं; तरी पण ही आपली थट्टा करते आहे इतका संशय मला आला. पुढचें पुढें पहातां येईल, तूर्त तरी सुटका झाली या विचारानें मला आनंद झाला. तो प्रकार पुन्हां शान्तामामी करीलसें मला वाटेना. पण काय नेम घ्या ! तरी पण बन्याची गठडी वळणार नाहीं ही मला खात्री होती. मी त्याप्रमाणें बन्याला बेधडक सांगून टाकलें, "आमच्या मामीची तुला बिलकूल धास्ती वाटायचं कारण नाहीं. अन् त्यांतून तसं तुला वाटायला लागलंच तर मी आहे ना !"

"म्हणजे तुझी मामीसुद्धां तसं करते म्हणायची !" बन्या कांपऱ्या आवाजांत म्हणाला.

"आतां एकदम नाहीं म्हणून कांहीं मी खोटं बोलणार नाहीं. मला वाटतं, कधींमधीं वर्षांतून एकदां तिला हें वेड येतं—पण मला वाटतं आतां ती विसरलीसुद्धां असेल तें. त्यांतून तूं हें विसरतो आहेस, तिला स्वतःला एक बाळ आम्ही देणार आहोंतच. तेव्हां त्या बाळाला पुढं ढकलून आपण लांब पळून जाऊं. आलं कीं नाहीं लक्षांत ?" मी म्हणालों.

"पहा बुवा ! मला तर भीति वाटते. असं वाटतं कीं—" म्हणून बन्या स्वतांच्या घराकडे पाहूं लागला.

एकदां मनुष्याला चटका बसला कीं ताकावरसुद्धां फुंकर मारावीसें वाटूं लागतें यांत शंका नाहीं. ओढवलेल्या आपत्तीमुळें बन्या इतक्या हळुवार मनाचा झाला होता कीं कोणतीही स्त्री म्हटली कीं 'अस्तिक, अस्तिक' म्हणून दूर सरण्याचा त्याचा क्रम असे. मला बन्याच्या या दीनवाण्या स्थितीची कींव आली. स्त्री म्हटली कीं आपल्यासारख्या असहाय्य पोराबाळांच्यावर झडप टाकून त्यांना गिळंकृत करण्याचा दुष्ट हेतु मनांत बाळगणारी एक राक्षसी शक्तीच होय, हा बन्याचा ठाम सिद्धान्त होता. मी स्त्रीजातीचा कट्टा शत्रु नव्हतों. ठराविक लोकांशीं माझें वैर होतें. तेवढ्या-

जणींना मात्र मी वचकून असें. 'साप, साप' म्हणून बन्यासारखा मी तो रस्ताच सोडून देण्याचें कधींही मनांत आणलें नाहीं. मनांतून जरी घाबरत होतों तरी वरकरणी पोकळ अवसान आणून उगीचच खोड्या काढण्यांत मला अपरिमित आनंद होई. तरी पण तूर्त बन्याला चुचकारून घेण्यांतच शहाणपण आहे, असा पोक्त विचार करून मीं त्याचें सान्त्वन केलें.

आमचें चहापान चाललें होतें. बशींतल्या चहामध्यें पडणारें समोरच्या खिडकीचें प्रतिबिंब निरखून पहाण्यांत मी गर्क होतों. मी जसजसा बशी फिरवी तसतसें प्रतिबिंब हालूं लागे. मी जोरजोरांत बशी फिरवूं लागलों.

" काय नतद्रष्ट पोरटं आहे पहा. फोडायची आहे का ती बशी ! झाला असला चहा तर हो चालता बाहेर—" बाबा माझ्या हातांतली बशी हिसकावून घेत म्हणाले. " इतकं बोललं तरी ह्याचा लचकोडगेपणा कांहीं अजून जात नाहीं. कुठं ह्यालाच हात लाव, कुठं त्याच्याच पाठीमागं पळत सूट—" आईसाहेब पतिराजांच्या भाषणाला पुष्टि देत म्हणाल्या. हातांतली बशी नाहींशी झाल्यामुळें मीं तसाच कप तोंडाला लावला. एक वार, दोन वार झालें होतें. तिसरा वार पूर्ण करण्याकरितांच कीं काय ऊन चहा जिभेला डसला. चहाचा कप खालीं पडला. चहा सांडला. मी आईच्याकडे हळूच वांकून पाहिलें आणि तडक बाहेरचा रस्ता धरला. कोणत्याही गोष्टीचा अगदीं अंत पहाणें केव्हांही चांगलें नाहीं.

मी बाहेर जातों तोंच बन्या धांवत आमच्या घरांत शिरला.

" बाहेर कोणसासा एक बुवा अन् एक बुवी टांग्यांतून आलीं आहेत; चल आपण पाहूं—" म्हणून बन्या मला हाताला धरून ओढूं लागला. मी त्याच्या पाठोपाठ बाहेर गेलों. 'कोणसासा बुवा' म्हणजे आमचे मामा, अन् 'कोणाशी बुबी' म्हणजे शान्तामामी.

" हॅलो ! कसं काय सदाशिव ! बाबा आहेत का रे घरांत ! " म्हणून मामांनीं प्रश्न केला. " चहा पीत आहेत " म्हणून मामांना इकडे उत्तर देत तिकडे मी शान्तामामीकडे पहात होतों.

शान्तामामीला त्या स्वरूपांत पहातांच मी घोंटाळ्यांत पडलों. मामी आजारी होती कीं काय ! टांग्यांतून पटकन् उडी टाकून माझ्याकडे धांवत

येणारी मामी आज अशी सावकाश, अगदीं बेतानें पाऊल ठेवून कां उतरते आहे हें गूढ कांहीं मला उकलेना. आणि मामी माझ्याकडे पाहून नेहमींप्रमाणें हंसेनासुद्धां. असें का? कां रागावली माझ्यावर?

मामी माझ्याशीं कांहींएक न बोलतां तडक घरांत गेलेली पाहून मला जरा आश्चर्यच वाटलें. का माझ्या हातून पडलेल्या कपाची हकीकत तिला कळली? पण तें तर शक्यच नव्हतें. मग हें असें कसें झालें? मी बन्याकडे सहजच पाहिलें. बन्या आपल्याशींच प्रसन्न मुद्रेनें कांहीं तरी पुटपुटत होता. मला वाटतें 'सगळ्या बायका इतक्या समजूतदारपणानें वागल्या तर लहान मुलांचें आयुष्य किती सुखांत जाईल!' हा विचार त्याच्या डोक्यांत घोळत असावा. बन्याच्या स्वभावांतली स्वार्थीपणाची ही लकेर मला बिलकूल पटली नाहीं. या गोष्टीचा कांहीं तरी छडा लावलाच पाहिजे या निश्चयानें मीं मामांचें बोट धरलें.

"मामा—मामा—मामा माझं ऐका ना—" म्हणून मीं त्यांच्या कोटाला धरलें.

"अरे, अरे, अरे—सुधारलेल्या जगांत कोटाची इस्त्री अशी चुरगाळून चालणार नाहीं, हें तुला आतां सांगावं तरी कितीदां? लहान मुलं लांबून बोललीं म्हणजे मनाला कसं मोकळं मोकळं वाटतं. अजून तुला माझा उपदेश पटत नाहीं? काय हट्टी मुलगा आहेस रे? काय रे, तुझं नांव काय? सद्या, तो पोरगा बघ कसा शहाणा आहे तो—!"

"पण माझं ऐका आधीं. नाहीं तर मी तुमच्या डोक्यावर चढेन—" मी म्हणालों.

"तुला दुसऱ्याच्या डोक्यावर चढण्याची खोड आहेच मुळीं. असला वरचढ मुलगा म्हणून तर बाबा खाऊ देतात—बरं, नाहीं. लगेच घुस्सा आला वाटतं पंतांना? हं, ही मी धुमी पेटवतों अन् मग आपलं प्रवचन ऐकतों. बोला आतां—" मामा सिगारेट पेटवीत म्हणाले.

"शान्तामामीचं बाळ कुठं आहे?" मीं प्रश्न केला. मामा मोठ्यानें हंसले.

" तुम्ही देणार आहांत ना ? तुझी शान्तामामी इकडे आली ती तुझ्याकडून एक बाळ उपटून नेण्याकरितां आली आहे. मीच विचारतों कीं कुठं आहे आमचं बाळ ? द्या आम्हांला." मामा मला हातावर घेत म्हणाले.

" म्हणजे ? तुम्हालाहि एक आणखी पाहिजे का ? " मी आश्चर्यानें म्हणालों.

" छेः छेः छेः ! आम्हांला दोघांना मिळून एक पुरेल. " मामा हंसून म्हणाले.

" पण आम्ही एकहि बाळ आणून ठेवलं नाहीं. आम्हांला काय माहिती तुम्ही लगेच येणार तें. अन् बाळं कुठं मिळतात तें मला माहीत नाहीं." मी अत्यंत खिन्न मुद्रेनें म्हणालों.

" बरं ! त्यांत काय वाईट वाटायला झालं ? आतां मामी आलीच आहे. तिला विचारून एक बाळ घेऊन ये तूं बाजारांतून." मामीकडे पाहून हंसत मामा म्हणाले.

" इश्श ! कुठं काय बोलावं याचा कांहीं तरी धरबंद ! सदू, तूं बोलूं नकोस रे कांहीं त्यांच्याशीं--तूं आपला इकडे ये कसा." मामी म्हणाली. मी मुकाट्यानें मामांच्या हातावरून खालीं उतरलों. शान्तामामी बोलायला लागल्यावर मग मामाशीं बोलण्यांत कांहींच अर्थ नव्हता. बन्याच्या अस्तित्वाची ओळखसुद्धां मी विसरलों, आणि शान्तामामीशीं सुखदुःखाच्या गप्पागोष्टी करण्यांत रमून गेलों. शान्तामामीनें सामानाची व्यवस्था लावली. 'गाडींतलें' सोडून आईनें दांडीवरचें ओढून दिलेलें लुगडें गुंडाळून घेतलें.

" मामी, मुंबईला बाळं मिळत नाहींत का ग ? मग तूं पुण्याला कशाला आलीस ? "

" कुणीं सांगितलं तुला हें वेड्यासारखं ? लहान मुलांनीं किनई असं कधींसुद्धां बोलूं नये. तूं त्यांचं कांहींसुद्धां ऐकत जाऊं नकोस." मामी म्हणाली.

" पण मग आपल्याला बाळ आणायला कधीं जायचं बाजारांत ? " मी म्हणालों.

" आपण बाळ आणायला जात नसतों. देव आपल्याला आणून देत असतो." मामी म्हणाली.

" देव म्हणजे आपल्या माजघरांत आहेत तेच का ? ते तर चालत नाहींत, बोलत नाहींत; मी प्यायला दूध दिलं तर तेंसुद्धां पीत नाहींत, तर मग ते कसं आणणार ? अन् त्यांना कसं समजतं कीं आपल्याला बाळ पाहिजे म्हणून ? " शान्तामामीनें आपलें बोलणें ऐकावें म्हणून दोन्ही हातांनीं तिचें तोंड धरून मी म्हणालों.

" हें बघ, तूं माझं ऐकशील का ? मोठा झालास म्हणजे तुला सगळं कांहीं कळेल. लहान तोंडीं मोठा घांस घेतला म्हणजे लोक वेडं म्हणतात. तूं वेडा आहेस का ? " म्हणून शान्तामामीनें माझ्या डोक्यावरून हात फिरविला. माझा निश्चय कायम होता. शान्तामामीकडून त्या बाळाची माहिती काढून घेतलीच पाहिजे. मामी माझ्यापासून कांहीं तरी लपवून ठेवते आहे. तिला त्या बाळाची माहिती असलीच पाहिजे. कदाचित् मला आश्चर्यचकित करून सोडण्याकरतां म्हणून वळकटींत तर गुंडाळून आणलें नसेल ? विचारासरशीं मी शान्तामामीची वळकटी सोडण्याकरतां धांवलों.

मामांच्या मदतीनें मीं वळकटी सोडली. मोठ्या कुतूहलानें मीं वळकटी उलगडली; पण चारदोन मळकीं लुगडीं, एक काळाकुट्ट झालेला जोडा, अन् दोन फाटकीं धोतरें यांशिवाय वळकटींत कांहींच नव्हतें. शान्तामामी हंसत हंसत बाहेर आली.

" आतां काय डोक्यांत आलं ह्याच्या ? सामानाची झडती घेऊन मग घरांत येण्याची परवानगी देणार आहेस कीं काय ? कशाला वळकटी सोडलीस ?" मामी वळकटी गुंडाळीत म्हणाली. मामांनीं माझ्या मनांतला आशय ओळखला. कारण लगेच ते हंसून म्हणाले,

" अरे वळकटींतून का कुणी मुलं बांधून आणत असतं ? तुला पाहिजे आहे तें बाळ तुझ्या शान्तामामीनं बरोबर आणलं आहे. पण तें इतक्यां-तच तुला दिसणार नाहीं—"

शान्तामामीनें माझ्यादेखत मामांच्या हातावर चापटी मारलेली पाहून मला जास्तच आश्चर्य वाटलें. 'जळ्ळं तें मेलं बोलणं' म्हणून शान्ता-मामी वळकटी बांधूं लागली. मी मामांच्याकडे पाहिलें. आईनें मला मारलें म्हणजे मी रडून रडून सगळें घर डोक्यावर घेत असें, त्याप्रमाणें मामा आतां काय करतात याकडे माझें लक्ष वेधलें. पण मामा हंसत असलेले पाहून, आई म्हणते त्याप्रमाणें मामाहि मार खाऊन खाऊन कोडगे बनले आहेत कीं काय ही शंका पुढें उभी राहिली. आणखी आई मोठी असल्यामुळें मला मार खावा लागतो पण शान्तामामी लहान असून-सुद्धां मामा तिला मारूं कसे देतात हें कोडें मला उलगडेना. अन् शान्ता-मामी हें असें मारायला कधींपासून शिकली ! मला तर ती कधींच मारीत नसे. माझी बावरलेली मुद्रा पाहून मामा तर हंसूंच लागले.

" सदुभाऊ—अज्ञबालका, अरे, पुरुषाचा जन्म पहा किती खडतर आहे तो. लहानपणीं आईबापांनीं विटी कोलल्याप्रमाणं टोलवावं, मध्यम वयांत सख्ख्या बहिणीनं वेळीं अवेळीं खडसवावं, अन् मोठेपणीं घर-धनिणीनं तिंबून काढावं—हेंच आम्हा पुरुषांचं स्वतंत्र जीवन. पुरुषजाती-मध्यें बोलण्याचीसुद्धां चोरी, बोलेल तर उरीं सुरी—सोडीव रे बाबा, मुरारी ! "

मार खाल्ल्यानंतरसुद्धां मामांना इतकें बोलणें सुचतें तरी कसें याचाच मी विचार करीत होतों. शान्तामामीनें वळकटीची दोरी तशीच टाकून दिली.

" आतां पाया पडूं का ! " म्हणून मामीनें हात जोडले.

" तेवढं नको करूं. पाया पडण्याच्या निमित्तानं चावलीस पायाला तर काय घ्या ! " मामा म्हणाले. या खेपेस शान्तामामी बऱ्याच गोष्टी शिकून आली होती कीं ! मारायला तर शिकलीच होती. मामांच्या म्हणण्याप्रमाणें चावण्याची कलाहि तिनें हस्तगत केल्याप्रमाणें दिसत होतें. आणखी काय काय नवीन शिकली आहे कुणास ठाऊक ?

आणखी कुठवर हें प्रकरण लांबलें असतें हरी जाणे. आईला माझी आठवण होतांच ती बाहेर आली होती. अन् बाबाहि माडीवरून

खालीं आले होते. शान्तामामी गर्दीगर्दीनें वळकटी गुंडाळून आंत गेली तसा मीहि तिच्या पाठोपाठ गेलों.

" मामी ऽ—ए मामी—" मी सुरुवात केली. आई चटकन् माझा कान धरून ओरडली, " काय रे सारखं मामी मामी करून तिच्या राशीला लागला आहेस ? माणूस परगावाहून दमून येतं तर ह्याची बडबड चालूच आहे. हो बाहेर चालता नाहीं तर देतें कान उपटून हातांत."

'परगांवाहून मनुष्य येतं तें कांहीं पायीं येत नसतं, चांगलं ऐटींत गाडींत बसून येत असतं' असें झणझणीत उत्तर देण्याचा माझा बेत होता. पण बोलल्याप्रमाणें वागण्याचा आईचा हुकमेहुकूम स्वभाव माझ्या चांगलाच परिचयाचा असल्यामुळें निदान कानतुटका मुलगा ही प्रसिद्धि होऊं नये म्हणून मी ओसरीवर जाण्याकरितां निघालों. शान्तामामीनें माझा हात धरला. मी थोडासा फुगटून 'सोड माझा हात' म्हणून म्हणत हात सोडवूं लागलों.

" तुला खाऊ देईन अं मग—" शान्तामामी हळूच म्हणाली.

" इथं कुणाला खाऊची गरज आहे ? " मीं तोऱ्यानें उत्तर केलें.

" अस्सं काय ? पहा बरं. मग—पुन्हां मागितला तरी—मी—मुळींसुद्धां—देणार नाहीं. अगदींसुद्धां नाहीं. अगदीं कानाला तुळशीपत्र. खाऊ आणला—मग काऊ आला—अन् काऊनं खाऊ खाल्ला. हेंच माझं उत्तर. आतां जा पाहिजे तर !" शान्तामामी म्हणाली.

खाऊच्या आशेपेक्षां तिच्या या तुटक तुटक, लाडक्या शब्दांनींच मी जागच्याजागीं उभा राहिलों. खाऊची बोली कबूल केल्यानंतर मी शान्तामामीस सोडून ओसरीवर गेलों.

ओसरीवर बाबा आणि मामा कांहीं तरी नवव्या महिन्याविषयीं बोलत होते. मला त्यांचें तें तुटक तुटक भाषण बिलकुल आवडलें नाहीं. त्यापेक्षां मनुष्याला समजेलसें भाषण चालावें या उद्देशानें मीं मामांना मध्येंच अडवलें.

" मामा, शान्तामामीची मी नक्कल करतों अं. करूं का ? "

माझ्या या धाष्ट्यांकडे पाहून बाबा चकितच झाले. मी परवानगीची वाट न पहातां एक रिकामी खुर्ची घेतली. ‘ हा टांगा बरं का ’ म्हणून तोंडानें पुटपुटत मी खुर्चीवर चढलों. बराच वेळ ‘ टॅक टॅक ’ करून टांगेवाल्याचा अभिनय संपल्यावर मी शान्तामामीची भूमिका घेतली. शक्य तितकें तोंड गंभीर करून, एका हातानें खुर्चीचा आधार घेत, सावकाशपणें जमिनीवर पाय टेंकवून मी शान्तामामीच्या टांग्यांतून उतरण्याच्या प्रवेशाचें सोंग हुबेहूब उठवून दिलें. मामा किंचित् ओशाळल्यासारखे झाले. बाबांच्या एरवींच्या कठोर मुद्रेवर, क्षणमात्र कां होईना, पण थोडा वेळ हास्यरसाची छटा उमटली.

येथपर्यंत ठीक झालें. पण शान्तामामी टांग्यांतून उतरतांना पाय अडकून पडली नव्हती. अभिनयाची कमाल करून दाखविण्याच्या नादांत खुर्चीच्या हाताकडे माझें पूर्ण दुर्लक्ष झालें. आणि क्षुल्लक चुकीमुळें केवढे घोर प्रसंग उद्भवतात हें मला लवकरच कळून आलें. खुर्चीच्या हातानें माझ्यापुढें आघाडी मारण्याचा विचार केला. आणि काय होत आहे हें लक्षांत येण्याचे पूर्वींच मी तोंडावर पडलों. पण अशा वेळीं रडण्यानें आपल्या पूर्वींच्या अभिनयावर पाणी पडण्याचा संभव आहे हें लक्षांत येतांच मी मोठ्या कष्टानें ‘ येऊं का ’ म्हणून परवानगीची वाट पहात असणाऱ्या अश्रूंना मनाई हुकूम पाठवला. मामा झटकन् पुढें झाले. मी लगेच सांवरून उभा राहिलों.

फिरून यत्न करून पहाण्याचा माझा बेत होता, पण बाबांनीं हटकल्यामुळें माझा इलाजच उरला नाहीं. मी तसाच खिन्न मुद्रेनें मामांच्याकडे पाहूं लागलों.

“ हो आंत चालता. अक्कल नाहीं कवडीची अन् वेडावून दाखवायला तयार ” म्हणून बाबांनीं मला दंडाला धरून आंत लोटलें. आतां मात्र मोठा कठीण प्रसंग आला होता. आई घरांत जेवूं घालायला तयार नाहीं अन् बाबा बाहेर भीक मागूं द्यायला हरकत घेणार, असा हा विलक्षण पेंच होता. आईनें आत्तांच बाहेर हांकललें होतें. काय करावें ह्या विचारांत मी पडलों.

अशा वेळेस मित्राची आठवण झाल्यास नवल कसलें ! बन्याच्याकडे जाण्याचा माझा निश्चय झाला. पण बाबांना टाळून जाणें सोपें काम नव्हतें. शत्रूंची फळी फोडून बाहेर पडण्याचा कोणता मार्ग सोपा ? इतक्यांत पाठी-मागें आईसाहेबांचा आवाज झालेला मीं ओळखलें. कांहीं तरी केलेंच पाहिजे. इकडे आड आणि तिकडे निवडुंगाचा फड. पण प्रसंगीं मनुष्य धीट बनतो. लढाईच्या ऐन गर्दींत शिरणाऱ्या वीराप्रमाणें मी डोळे घट्ट मिटून तीरासारखा बाबांच्या अंगावरून धांवत गेलों.

---

# प्रकरण ३ रें



## आगंतुक पाहुणा

आणि ध्यानीं मनीं स्वप्नीं नसतां एके दिवशीं दुपारच्या सुमारास बाळानें आपल्या आगमनाची वर्दी दिली. माझ्या पसंतीनापसंतीची बिलकूल वाट न पहातां बाळानें स्वतःच्या जबाबदारीवर आमच्या घरांत प्रवेश केला ! असल्या या धरसोडीच्या वर्तनाचा निषेध म्हणून ह्याच्याशीं न बोलण्याचा मीं निश्चय केला.

मामा परत मुंबईला गेले होते. बाबा दुकानांत गेले होते. शान्तामामी सकाळपासून आजारी असल्यामुळें आंतल्या खोलींत पडून राहिली होती. आश्चर्याची गोष्ट ही कीं आई सारखी आंतबाहेर करीत होती. मला खोलींत जाण्याची बंदी होती. आईचा डोळा चुकवून आंत जाण्याचें धाडस करणें म्हणजे नसती संकटपरंपरा गळ्यांत ओढून घेणें. त्यापेक्षां आज रविवार असल्यामुळें बन्याच्या शाळेला सुट्टी असेल तर त्याच्याच सहवासांत कांहीं तरी खेळत बसून दिवस काढावा म्हणजे उद्यां शान्ता-मामी बरी झाल्यावर तिच्याशीं खेळत बसायला मिळेल, या उद्देशानें मीं

अंगणांतून बन्याला आरोळी ठोकली. आरोळीच्या प्रतिध्वनीसरशीं बन्या हाताचीं बोटें चाटीत खिडकींत आला.

" काय रे ! " म्हणून बोटांना कल्हई करीत बन्यानें पृच्छा केली.

" जम्मत—खालीं ये." मी म्हणालों. 'जम्मत' याचा अर्थ जवळ जवळ 'कांहीं नाहीं' असाच. बन्या माझ्या सूचनेची वाट पहात होता. बराच वेळ दोघांनींहि एकमतानें विचार करण्याचा प्रयत्न केला. पण आम्हांला माहीत असलेल्या खेळांपैकीं एकसुद्धां शिल्लक राहिलेला नसल्यामुळें खेळायला काय काढावें हा मोठाच प्रश्न होता. शेवटीं गाडी-गाडीचा खेळ जरी नेहमींचाच होता तरी पण तोच खेळावा असें ठरलें. पण या वेळेला नवीन सुधारणा करण्याचा आमचा बेत होता. एरवीं बन्या एंजिनचें काम तोंडानें 'झुस् झुस्' आवाज काढीत करीत असे. माझें काम म्हटलें म्हणजे दरवाजाची कडी दोनदां-तीनदां आपटणें. 'हलो, हलो' म्हणून दाराशीं कान देऊन कांहीं तरी ऐकल्यासारखें करणें. कल्पनेंतल्याच मास्तरला 'मास्तर, गाडी सोडूं का' म्हणून विचारणें. गरीब बिचारा मास्तर—तुम्ही गाडी सोडा नाहीं तर तिकडे मोडा—कांहींच बोलत नसे. प्रत्यक्ष शब्दांच्या कबुलीची वाट पहाण्यापेक्षां मास्तरच्या मुग्धतेचा फायदा घेऊन मी एंजिनला गाडी नेण्याचा हुकूम करीत असें. घंटा म्हणून घरांतून आणलेल्या परातीवर अगर ताटावर मी दांडूनें ठोका देतांच एंजिन शक्य तितक्या कर्कश आवाजानें शिटी मारीत असे आणि तोंडावाटे कारंजा-सारखे पाण्याचे फवारे सोडीत धांवत सुटे. वाटेंतच दम लागला म्हणजे 'एंजिन मोडलं आहे. खिळा नीट करतों आहें' म्हणून तोंडीं तार येई. आमचा रेल्वेरस्ता ( Permanent Way ) म्हणजे आमची आळी आणि फार तर पलीकडली आळी; याव्यतिरिक्त रस्ते परकी ( Foreign lines ) होते. अर्थात् आमच्या गाड्या त्या रस्त्यावरून कधींच पळत नसत. त्या मानानें स्टेशनमास्तरवर फारच जबाबदारी होती. गाडी सोड-ण्याची परवानगी विचारणें, गाडीहांक्याला कांहीं तरी खासगी सांगणें, घंटा देणें, आल्या गेल्या गाडीला हाताच्या पंजाची सिग्नल दाखवणें

आणि पुन्हां तिकिटाकरितां कागदाचे तुकडे फाडून ते देणें. आमच्या रेल्वेवर संपाची वावटळ मिनिटागणिक उठे. कामाची अदलाबदल हा त्यावर रामबाण तोडगा होता म्हणा.

आज आम्ही सिग्नली खरोखरच्या करणार होतों. दुकानांतून बाबांनीं खोक्याच्या फळ्या आणलेल्या माझ्या लक्षांत होतें. फळ्या पाहिल्याक्षणींच ही 'शिंगनळ'ची कल्पना माझ्या मेंदूला पटली होती. पण ती कल्पना बाबांच्या मेंदूला पटणारी नसल्यामुळें मीं चोरासारख्या भेदक नजरेनें त्या फळ्यांचा ठावठिकाणा हेरून ठेवला होता.

" पण खरोखरीच्या शिंगनळला रंग दिलेला असतो." बन्यानें शंका काढली. रंगाची अडचण दूर करावी कशी हा प्रश्न पडला. पण लगेच आठवलें, घरांतल्या बाबांच्या तांबडया आणि काळ्या शाईचा उपयोग काय ? आतां, बाबांना कळलें तर रागें भरतील, पण आपलें काम झाल्यावर मग कांहीं का होईना. शिंगनळी जाळून टाकल्या तर पुन्हां दुसऱ्या करूं. कामाची धमक आमच्या अंगांत विलक्षण होती.

बन्याला बरोबर घेऊन मीं चोरट्या पावलानें लांकडाच्या खोलीची कडी काढली. मी आंत शिरतों तों एक विलक्षण प्रकार आमच्या दृष्टोत्पत्तीस आला. कोळसे ठेवण्याच्या रिकाम्या टोपलींत आमची चंपी अंगाची वळकटी करून परमेश्वरानें दिलेल्या देणगीकडे कौतुकानें पहात पडली होती. मला पाहिल्याबरोबर चंपीनें आनंदानें शेंपटी हालवीत स्वागत केलें. चंपीच्या या स्वागताकडे माझें फारसें लक्ष नव्हतें. मी बन्याला आंत ओढून चंपीकडे बोट दाखवीत ओरडलों,

" बन्या, अरे चंपीनं बाळं आणलीं बघ. आमच्या घरांतले देव माणसांना, कुत्र्यांना सगळ्यांना बाळं देत असतात. मला वाटतं त्यांच्याजवळ बाळांनीं भरलेलीं पोतीं असावींत. अन् ज्यांना लागेल तसतशीं त्यांना धाडून देत असेल, नाहीं ? " शान्तामामीनें पुरवलेल्या माहितीच्या आधारावर मीं बन्यास चकित करून सोडलें.

" हो, पण असं पहा, कीं सगळीं बाळं एका ठिकाणीं ठेवलीं म्हणजे घोंटाळा नाहीं का उडायचा ? समज, माणसांना बाळं पाहिजे असलीं

म्हणजे माणसांचींच बाळं कशावरून येतील ? " शंकेखोर बन्या म्हणाला. प्रश्न वावगा नव्हता. पण मला उत्तर लगेच आठवलें,

" अरे तसं कसं होईल ? आपण घरांतून तांदळाच्या, जोंधळ्याच्या, गव्हाच्या डब्यांवरून चिठ्ठया नाहीं का लिहीत, त्याप्रमाणं देव त्या पोत्यावरून लिहून ठेवत असेल. मग चूक होण्याचं कारणच उरणार नाहीं." मी म्हणालों. बन्याला हा युक्तिवाद पटला. वयानें बन्या माझ्यापेक्षां मोठा होता तरी जगांतील अनेक प्रकारच्या घडामोडींचें शास्त्रशुद्ध ज्ञान मलाच जास्त होतें. आणि हें माझें ज्ञानवृद्धत्व बन्या निमूटपणें कबूल करी. बऱ्याचशा गोष्टींत ही तऱ्हा चालू असे. बन्यानें शंका काढाव्यात आणि 'काय वेडा आहेस रे, इतकं तुला समजत नाहीं—न समजायला काय बायको आहेस का ? ' म्हणून मी त्याचें शंका—समाधान करावें.

" अरे, पण चारपांच बाळं आहेत ! इतकीं कुणाचीं ? " बन्या मध्येंच ओरडला.

" पांच नाहींत, सहा आहेत." मी म्हणालों. आणि वादाला रंग चढला.

मी म्हणावें सहा आहेत अन् बन्यानें म्हणावें पांच आहेत. होतां होतां वाद निकरावर आला.

" तुलाच तेवढं समजतं वाटतं—आम्ही वेडे ! आम्ही मूर्ख ! आम्हाला कांहींच समजत नाहीं ! आम्हाला कांहींसुद्धां येत नाहीं ! " मी आवेशानें म्हणालों.

" तुला मोजतां कुठं येतं आहे ! " बन्यानें चिडून टोमणा मारला.

" हो, तुलाच काय तें मोजतां येतं आहे. रावजी, नीट डोळे उघडून पहा. एक, दोन, तीन, सात, नऊ—पांच, सहा." मी चढत्या आवाजीनें माझें म्हणणें खरें करण्याचा यत्न केला.

" अहाहाहा ! हेंच का मोजतां येतं तें ! म्हणे तीन, सात, नऊ, पांच, सहा. अरे वाटेंतले चार काय झाले ? फराळाकरतां ठेवून दिले वाटतं ? " बन्या उपरोधिक स्वरानें हंसत म्हणाला. हा माझा धडधडीत तोंडासमोर अपमान होता. बोलतां बोलतां बन्यानें माझ्या ज्ञानाला

हात घातला होता. माझ्या स्वाभिमानावर हा निष्ठुर घाला पडला होता. रागानें लाल होऊन मी बन्याच्या सदऱ्याला घट्ट धरलें.

" बन्या ऽऽ" म्हणून मी संतापानें ओरडलों.

" सद्या ऽऽ" म्हणून बन्यानें उत्तरास प्रत्युत्तर दिलें.

" मला वेडा म्हणतोस ? तूं वेडा आहेस. तूं सातदां वेडा आहेस. तूं शंभरदां वेडा आहेस. रामाच्या शेंडीपासून तों सीतेच्या केंसापर्यंत तूं वेडा आहेस, झालं ?" मी म्हणालों.

" माझा सदरा सोड—सोडतोस का नाहीं ? का मी आईला सांगूं ?" बन्यानें मातृदेवतेला मदतीस हांक मारलेली पाहून मी थोडासा बुचकळ्यांत पडलों.

" मला पुन्हां वेडा म्हणणार नसशील तर सोडीन." मी या अटीवर मुक्तता करण्याचें कबूल केलें.

" म्हणेन जा. वेडा म्हणेन; सोडणार नाहीं." बन्यानें संतापानें उत्तर केलें.

या भांडणाचा परिणाम काय झाला असता हें सांगणें जरा कठीणच आहे. पण मध्येंच चंपीनें भोंकण्यास सुरुवात केली. कदाचित् आमच्या भांडणानें तिला त्रास होत असावा. आम्ही भांडणाचा मुद्दा विसरून चंपीकडे पाहूं लागलों. मी चंपीच्या शेंपटीवरून हात फिरवला.

" चंपीची शेंपटी अशी वांकडी कां रे ?" बन्यानें प्रश्न केला.

" आतां कशाला विचारतोस मला ? मी वेडा आहें ना ? वेड्या माणसाशीं शहाण्या माणसांनीं कशाला बोलावं ?" आतांच्या अपमानाची भरपाई करण्याकरितां मी म्हणालों.

वास्तविक पहातां मी असें तिरसटासारखें उत्तर दिलें याचें मुख्य कारण म्हणजे मला त्या प्रश्नाचें उत्तर देतां येणें अशक्य होतें हेंच होय. चंपीची शेंपटी सरळ करण्याकरितां मीं कितीदां तरी प्रयत्न केला होता. शेंपटी सरळ रहावी म्हणून दांडूला बांधून ठेवली होती. बराच वेळ हातांतसुद्धां धरून ठेवली होती. हेतु हा कीं विसर पडल्यावर मग कांहीं चंपी पुन्हां शेंपटी वांकडी करणार नाहीं. पण शेंपटी कांहीं सरळ झाली

नाहीं. इतर कांहीं गोष्टींप्रमाणें हीहि गोष्ट मनुष्याच्या शक्तीबाहेरची असावी असा पोक्त विचार करून मी चंपीच्या शेंपटीकडे पहाण्याचेंच सोडून दिलें. तरीहि मधूनमधून ज्याप्रमाणें एखाद्या बापाला आपल्या नादिष्ट पोराविषयीं अनुकंपा उत्पन्न होत असते त्याप्रमाणें त्या शेंपटीच्या या एककल्ली वागणुकीविषयीं मला थोडेंबहुत वाईट वाटे. इतकी शहाणी कुत्री पण शेंपटी कांहीं ताब्यांत ठेवतां येत नाहीं, याविषयीं राहून राहून मनाला खेद वाटे.

चंपीच्या परिवाराची ती धडपड पाहून मला मोठी मौज वाटली. मी हळूच चंपीकडे पहात एका पिलाला हात लावला. बन्याहि धिटाईनें पुढें सरला. आमच्या भांडणाचा मागमूससुद्धां नाहींसा झाला. तसेंच 'शिंगनळी'ची कल्पनाहि आम्ही विसरून गेलों. आणि त्या जागीं चंपीला धरून घरांत घेऊन जावें हा विचार ठरला. एकीकडे मनांत आईची धास्ती तर होतीच, पण इकडे चंपीच्या पिलांचें कौतुक पण वाटतच होतें. मनाचा निश्चय होण्यास थोडासा अवधि लागला. इतक्यांत चंपीनें माझ्या हाताचीं बोटें चाटण्यास सुरुवात केलेली पहातांच मी ठरवून टाकलें कीं कांहीं हरकत नाहीं. रागावली आई तर रागावली. बन्याच्या कांखोटींत दोन पिलें बसवलीं. मीं राहिलेलीं पिलें स्वतः उचललीं. चंपी आमच्या पाठोपाठ आली.

चंपीचें स्वागत आम्हीं मोठ्या थाटानें केलें. माडीवरच्या पलंगावर गादी पसरून त्यावर चंपाबाईंना निजवलें. थंडीची बाधा होऊं नये म्हणून अंगावर रग टाकला आणि पिलांना तिच्या स्वाधीन केलें. बन्याच्या आग्रहाखातर पुण्यांत डांस फार असल्यामुळें चंपीला ताप वगैरे येऊं नये म्हणून मच्छरदाणीहि सोडण्यांत आली. बाबांची उशी चंपीला डोक्याखालीं देण्यास मी विसरलों नाहीं. आई घरांत नसली म्हणजे किती तरी उपयुक्त कामें मी पार पाडीत असें.

बन्याचे मनांत आणखी पुष्कळ सुधारणा करण्याचें घाटत होतें. चंपीला उजेडाचा त्रास होऊं नये म्हणून एक चष्मा तिला द्यावा असें त्याचें म्हणणें पडलें. पण चष्मा कशाचा करावा हा प्रश्नच होता. जवळच

एक इंग्रजी वर्तमानपत्र पडलें होतें. विचारासरशीं मीं झटकन् त्या कागदाचे दोन वाटोळे तुकडे काढले. चंपीच्या डोळ्यांचें माप घेण्याचें काम बन्यानें केलें. पण नुसतेच कागदाचे तुकडे चंपीच्या डोळ्यांना चिकटेनात. बन्यानें तोंडवाफ उपयोगांत आणली. तरीहि कांहीं साधेना. आणि मौज ही कीं चष्म्याची ही उत्कृष्ट कल्पना चंपीच्या डोक्यांत शिरेना. बन्यानें तिची पुष्कळ समजूत घातली. थोडा वेळ समजल्यासारखें ती दाखवी, पण पुन्हां कागद पुढें नेले कीं मुंडी हालवी.

"चंपे, तूं मुकाट्यानें बसलीस तर नाहीं का चालणार? तुझ्या हिताची गोष्ट आम्ही सांगतों आहोंत. चष्मा घातलास म्हणजे डोळे चांगले रहातील. नाहीं तर ऊन लागून डोळे आंधळे झाले म्हणजे मग तुलाच वाईट वाटेल. आतां हालूं नकोस बघ," असें म्हणून मीं तिला परोपरीनें सांगितलें. पण तिचा आपला एक हट्ट.

बन्यानें दोरीची कल्पना काढली. दोरीमध्यें कागदाचे तुकडे ओंवायचे आणि ती दोरी चंपीच्या कानांना घट्ट बांधून टाकायची. म्हणजे मग चंपी कितीहि हालली तरी चष्मा पडणार नाहीं. मला ही कल्पना पसंत पडली. आणि नाहीं नाहीं म्हटलें तर बन्याला डोकें थोडें तरी आहे याचें मला कौतुक वाटलें. त्याप्रमाणें मी बन्याजवळ बोलूनसुद्धां दाखविलें. पण बन्याला आभार मानायचे, विनयानें उत्तर द्यायचें हे प्रकार माहीतच नव्हते. उलट, लाडिक आवाजांत तोंडाचा फुगा करून तो हातवारे करीत स्वतः-चीच प्रशस्ति गाऊं लागला—

"बघ, मी शहाणा आहें कीं नाहीं? आतां तुझ्याइतकं मला येत नसेल, पण कांहीं कांहीं वेळेला मी तुलासुद्धां हटवून टाकीन. परवां तर मी बाबांनासुद्धां स्वच्छ सांगि—" पण पुढें ऐकण्याची माझी इच्छा नव्हती. बन्यानें आपल्या बाबांना 'स्वच्छ' सांगितलें कीं 'मळकं' सांगितलें—मला तें ऐकण्याची कांहींच गरज नव्हती. तरी पण आपल्यापेक्षां कमी शहाणपणाच्या माणसाकडून जर एखादी चांगली सूचना आलीच तर तिचा स्वीकार न करण्याइतका अनुदारपणा दाखविणें मला योग्य वाटलें नाहीं.

बन्यानें चंपीचें मुंडकें धरलें आणि मी तिच्या कानाला दोरी गुंडाळली. चंपी म्हणजे मुलखाची लाजरी. तिला आमच्यापुढें चष्मा घालण्याची लाज वाटत होती. 'आम्हांला चालेल, तूं चष्मा घाल' म्हणून आम्हीं परोपरीनें सांगितलें तरी आपल्या मूक भाषेंत 'इश्श! नको गडे. नाहीं घातला चष्मा तर नाहीं का चालणार?' म्हणून ती सारखी अळंटळं करीत होती. आतां जुलमाशिवाय हें काम होणें शक्य नाहीं—दुसरा मार्गच उरला नाहीं—हें आम्हांला कळून चुकलें. आणि म्हणूनच हा सडेतोड मार्ग पत्करावा लागला.

पण स्वभावाला औषध नाहीं म्हणतात तेंच खरें. आम्ही इतक्या खटपटीनें बसवलेल्या चष्म्याशीं तिचं पटेना. मग काय तो 'नंबर' तिला लागत नव्हता का तिला तें 'कसंसंच' वाटत होतें तिचें तीच जाणे. चष्म्याचें निशाण रोंवल्यावर बन्यानें आणि मी एकमेकांचा हात धरून 'मोरया, मोरया' म्हणून तोंडानें जयघोष करीत तांडवनृत्याचा फेर धरला. चष्मा काढून टाकण्याबद्दल चंपी जसजशी धडपडूं लागली तसतसें आमचें नृत्यकौशल्य जास्त जास्त रंगूं लागलें.

खरोखरीच आमच्या मतें चष्म्यांतली चंपी सुंदर दिसत होती. पण सौंदर्याची कल्पना चंपीला मुळींच नव्हतीसें दिसलें. किंवा असल्यास आम्हां मानवांच्या कल्पनेपेक्षां फार वेगळ्या स्वरूपाची असली पाहिजे. नाहींपेक्षां 'बुच्च्या' डोळ्यांनीं भटकत फिरण्यांत चंपीसारख्या कुत्रीनें केव्हांच आनंद मानला नसता.

पण हा आमचा आनंद क्षणैक पुरणारा होता. नृत्यानंदाच्या भरांत आम्ही भोंवतालची परिस्थिति अजिबात विसरून गेलों होतों. पण परिस्थिति आमच्या आनंदांत विरजण घालण्याकरतां युक्त काळाची वाट पहात होती. परिस्थितीनें आईलाच सामोरें धाडलें. आईला पहातांच मी जागच्या जागींच खिळून उभा राहिलों. पण बन्या अर्धवट राहिलेली गिरकी पूर्ण करण्यांत गुंतला होता. आईनें तडक माझ्या अंगावर चाल केली.

"मेल्या, तुला शंभरदां बजावलं तरी तुझं अजून चालूच आहे ना! त्या पोरीचा तिकडे जीव जायची वेळ आली अन् तुम्हांला हुदड्या मारा-

यचं सुचतं आहे. अन् हें काय ? कुत्री रे कशाला इथं आणलीस ! अन् तिच्या कपाळाला हें काय बांधलं आहेस ? ”

“ मी नाहीं आणली तिला. तीच आपल्या पायांनीं आली. मी तिला सारखं बजावून सांगत होतों कीं, आई रागावेल तूं आपली खालीं जा. पण तिला माझं बोलणं समजत नाहीं, त्याला मी काय करणार ? माझ्याकडे काय दोष ? ” म्हणून म्हणत मी बन्याला हळूच खुणावलें.

“ खरंच हो सदूची आई, आम्ही जा म्हणून सांगत होतों. पण ऐकतच नाहीं ती. चांगली स्वतःच्या पायांनीं अगदीं माणसासारखी चालत आली. गादी पसरली, मच्छरदाणी उडी मारून सोडली, अन् मी नको म्हणत असतां पांघरूण घेऊन निजून राहिली. ” बन्या म्हणाला. पण वर्णन करण्याच्या भरांत अतिशयोक्तीच्या अलंकाराचा बन्यानें इतक्या सढळपणानें उपयोग केला होता कीं कठोर सत्यसृष्टीला तो मुळीच पचनीं पडणारा नव्हता. हेंच जर एखादें काव्य असतें तर कदाचित् बन्या एक प्रतिभासंपन्न कवि ठरला असता. पण व्यवहारामध्यें कवीला विकून टाकण्याचा मोह अनावर असतो. आई लगेच वळून म्हणाली,

“ तर तर ! तें काय विचारावं ? गादी पसरली, मच्छरदाणी सोडली, अन् लवकर झोंप यावी म्हणून तुम्हांला नाचायला सांगितलं. साऱ्या मुलखाचे डाकू मेले ! बोलायला लाज पण नाहीं. काय रे ए गधड्या सद्या, तुला आई म्हणजे काय लांकडाची बाहुली वाटली का रे ! ”

उत्तर देण्याचें मनांत आलें होतें कीं लांकडाची बाहुली फार चांगली; निदान गालगुच्चे तरी घेणार नाहीं. पण ही वेळ नव्हती. प्रलयकाळाची तडफड शान्तपणें पहात बसणाऱ्या एखाद्या स्थितप्रज्ञाप्रमाणें मीं मुकाट्यानें काय काय होईल तें पहाण्याचें ठरवून टाकलें. बन्यानें जेव्हां पाहिलें कीं आपल्या वर्णनांत कांहीं तरी चूक झाली खास, तेव्हां तो मुकाट्यानें मला पुढारीपणा देऊन आपण खुशाल खिडकीची कडी चघळीत, मधूनमधून दांतांची शक्ति अजमावून पाहूं लागला. आईनें रागारागानें सगळे कपडे जागच्या जागीं ठेवले. चंपीला खालीं ठेवलें. अंथरुणाच्या आंत दडलेल्या पिलाला हात लागतांच आई दचकून ओरडली—

" ईः ! हें रे काय मेल्यांनो ! " म्हणून म्हणत आईनें एक एक पिलूं बाहेर काढलें.

" तें चंपीला विचार, मला काय माहिती ? " म्हणून मीं लगेच उत्तर केलें. हेतु हा कीं आईनें त्या पिलांबद्दल मला जबाबदार धरूं नये.

आईची गाळण उडालेली पाहून मला हंसूं आवरेना.

" हंस—तूं हंस अं ! दाताड काढून हंसायला पाहिजे नाहीं का तुला ? आज दुकानांतून येणं झालं म्हणजे तुझं हंसणंच बाहेर काढतें. तूं काय समजला आहेस ? " आई म्हणाली. आईनें बाबांच्यावर 'माझें हंसणें बाहेर काढण्याचें' काम सोंपवून दिलेलें पहातांच माझ्या जिवांत जीव आला. हो ! नाहीं तर दुप्पट बक्षिसी मिळायची ! तेव्हां तें एकहातीं होत असलेलें पाहून तेवढेंच समाधान वाटलें.

" जा, तीं पिलं परसांत ठेव जा.—अन् पुन्हां वर येऊं नकोस." म्हणून आईनें म्हणतांच मी बन्याच्या मदतीनें पिलांची उचलबांगडी करून खालचा रस्ता धरला. जातां जातां 'काय पोरीचं होतं आहे—ती काळजी' हें आईचें स्वगत वाक्य माझ्या कानांवर पडलें.

तेवढ्यावरून मीं तर्क करण्यास सुरुवात केली. शान्तामामी फार आजारी असावी. कदाचित् लोक म्हणतात त्याप्रमाणें ती मरणारहि असावी. येथें हें अवश्य सांगितलें पाहिजे कीं मृत्यूची मला बिलकूल कल्पना नव्हती. मृत्यु म्हटला म्हणजे चारदोन घरांतले लोक रडतात अन् एक मनुष्य अजिबात कुठें तरी निघून जातें, यापलीकडे मला मृत्यूची कांहींच कल्पना नव्हती. शान्तामामी मरणार म्हणजे फार तर नेहमीं जशी मुंबईला निघून जाते तशी ती निघून जाईल हीच माझी बालसमजूत होती. आणि म्हणूनच शान्तामामीच्या मृत्यूची कल्पना मला इतकी असह्य वाटली नाहीं. या ठिकाणीं मनानें मी दुष्ट होतों हें कारण केव्हांहि संभवनीय ठरणार नाहीं. तर केवळ बालवयानुसार असणाऱ्या अज्ञानामुळें मीं तो तर्क बांधला.

मीं बन्याला आपल्या घरीं जाण्यास सांगितलें. बन्याहि कंटाळला होता. तो लगेच आपल्या घरांत पळून गेला. मी कांहीं तरी गम्मत

पहायला मिळेल म्हणून घरांत पळालों. ओसरीवर, मला ताप आला म्हणजे माझा उजवा हात धरणारे एक गृहस्थ खुर्चीवर बसून कसला तरी विचार करीत होते. माझी कल्पना निराळीच झाली. हा गृहस्थ नेहमीं नेहमीं येऊन आमच्या येथें चहा पितो, माझ्याशीं गोडगोड बोलून मला कसलें तरी औषध देतो आणि पैसे पण मागतो, तेव्हां याला हांकलून लावला तर—? मी लगेच म्हणालों,

" मला औषध द्यायला आलांत का ? "

" अंऽऽऽऽ " म्हणून सद्गृहस्थानें माझ्याकडे झोंपेंतून जागें झालेल्या माणसाप्रमाणें दचकून पाहिलें. मीं पुन्हां प्रश्न केला. उत्तराऐवजीं डॉक्टरनें खिशांतला रुमाल काढला आणि नाकाला लावून घोडें खेंकाळल्याप्रमाणें ' फुर्र्र्र् ' आवाज केला. आश्चर्याची गोष्ट ही कीं तो रुमाल पुन्हां नीट घडी करून तसाच खिशांत ठेवून दिला. ' आमच्या आईला असला घाणेरडेपणा मुळींच आवडत नाहीं ' म्हणून म्हणावेंसें वाटत होतें; पण मी त्याप्रमाणें म्हणालों मात्र नाहीं. पहिल्या प्रश्नाला मिळालेलें उत्तर माझ्या पसंतीस पडलें नाहीं. मी दुसराच प्रश्न केला,

" डॉक्टर, तुम्ही चहा प्यायला आलांत ? " मी म्हणालों.

" चहा ? चहा ? चहा ?—काय पोर आहे ! " म्हणून डॉक्टरांनीं मला बाजूस ढकललें.

" मग आलांत तरी कशाला ? " मी जरासें चिडून म्हणालों.

" कशाला ? कशाला आलांत ? मग आलांत तरी कशाला ? हंः ! काय पोर आहे ! " म्हणून पुन्हां डॉक्टरांनीं मला खुर्चीच्या दुसऱ्या बाजूला ढकललें. मला समजेचना मुळीं. मी सरळ प्रश्न विचारतों आहें. सरळ उत्तरें द्यायचीं सोडून पुन्हां माझेच प्रश्न हा मला विचारतो आहे, आणि शेवटीं ' काय पोर आहे ! ' म्हणून पालुपद जोडतो आहे. ही काय भानगड ?

" मग काय शान्तामामीला औषध द्यायला आलांत ? " मीं पुन्हां विचारलें.

" औषध द्यायला ! शान्तामामीला औषध द्यायला ? मग काय शान्तामामीला औषध द्यायला आलांत ? हं: ! काय पोर—"

वाक्य पुरें होण्यापूर्वीच मी त्याच्या चष्म्याला हात घातला. 'हा काय चावटपणा ? दोनदां ऐकून घेतलं—' डॉक्टरांनीं वाक्य पुरें करण्याचा मोह सोडून दिला आणि चष्म्याला हात दिला. जरा वेळानें, काय झालें कुणास ठाऊक, डॉक्टर एकदम उभे राहिले.

" म्हणे मला समजत नाहीं. मला ?—मला समजत नाहीं ? डॉक्टर-कीची परीक्षा दिली कीं हातांत धोकटी घेऊन खुंटावारी फिरणाराची परीक्षा दिली ? मला समजत नाहीं ? दुसऱ्या लोकांना बोल लावण्यांत काय अर्थ आहे ? आमचे—आमचेच जातभाई. आमच्या हाडामांसाचे, आम-च्याच रक्ताचे हे भाईबंद,—अन् म्हणे डॉक्टर सावित्रीबाई आत्तां येणार आहेत. डॉक्टर सावित्रीबाई—? Indeed ! पुन्हां ह्या घरांत पाऊल टाकीन तर नांवाचाच नाहीं. डॉक्टरचा अपमान ! धन्वंतऱ्याचा अपमान ! प्राण-दात्याच्या मर्मस्थानीं हा निष्ठुर घाव !—"

मला वाटलें होतें कीं, डॉक्टर आतां खालीं बसून मोठ्यानें रडायला सुरुवात करणार. पण नाहीं. वरील अंतःकरणाला पिळवटून काढणाऱ्या आवेशाच्या स्वगत भाषणानंतर सदरहू डॉक्टरसाहेब हातांत बॅग घेऊन तडक बाहेर जाऊं लागले. पण डोक्याचें साहेबी घमेलें तसेंच राहून गेलें. मीं लगेच त्यांच्या पाठोपाठ पळालों, " डॉक्टर, डॉक्टर—" म्हणून मी सारखा हांका मारूं लागलों. तरी डॉक्टरांनीं पुन्हां म्हणून मागें वळून पाहिलें नाहीं. डॉक्टरांचें नांव माझ्या स्मृतिपटलावरून पार उडून गेलें असलें तरी साहेबमजकुरांच्या डोक्याचें माप अजून माझ्याजवळ आहे. लहानपणच्या आठवणी डोळ्यांसमोर आल्या म्हणजे त्या टोपीचें कौतुक करावें तितकें थोडेंसें होऊन जातें.

मला पुढें हा प्रकार समजला. आईनें गडबडीनें आपल्या नेहमींच्या डॉक्टरना बोलावणें पाठवलें होतें. डॉक्टरसाहेब तिसरेंच कांहीं समजून क्विनीनच्या दहापांच गोळ्या आणि कानाचें यंत्र या साधनसामुग्रीवर

आले होते. बाबा मध्येंच घरीं आले होते. त्यांनीं हा प्रकार पाहिला, आणि नेहमींच्या तिरसट स्वभावानुसार 'डॉक्टर, तुम्ही शुंभ आहांत' म्हणून म्हणाले होते. डॉक्टरांना अर्थात् हा अपमान सहन झाला नाहीं. अपमानाचा सूड कोणत्या प्रकारें त्यांनीं काढला हें वर सांगितलेंच आहे. असहकारितेचे परिणाम हे अवसानघातकी असतात.

सुमारें दोन तासांनंतर पुन्हां शान्ततेचे वारे खेळूं लागले. एका लहान अर्भकाच्या केंकाटण्याशिवाय इतर सर्वत्र स्तब्ध होतें. हे नवीन नवीन प्रकार पाहून माझी मति गुंग होऊन गेली होती. चाललेल्या घडामोडीचें अस्पष्ट चित्र मेंदूवर उमटत होतें. ह्या वेळेला जर कुणाला विचारायला गेलों तर लक्षण ठीक नाहीं हें मी जाणून होतों. पण एवढें मात्र खरें कीं, माझी जिज्ञासा अतोनात वाढली होती. क्षुल्लक आवाज झाला—उंदरानें एखादी लांब उडी मारली—तरी बाळ आलें कीं काय म्हणून मी डोळे ताण-ताणून त्या दिशेनें पाहूं लागें. आणि मला आश्चर्य वाटे तें प्रत्येकजणाच्या चालीचें आणि बोलीचें. इतकें सावकाश बोलण्याचें काय कारण असावें हें मला समजेना. इतकें धांवत जाण्याचें कारण काय असावें हें उमगेना. आणि प्रत्येकानें मीं प्रश्न विचारला कीं नाकावर बोट ठेवून 'शूः!' करून मांजराला जसें हांकलतों त्याप्रमाणें मला बाहेरून आंत आणि आंतून बाहेर पिटाळावें हेंहि पटेना. अर्भकाचा पाहिला सवाल कानीं पडल्याबरोबर मीं दचकलों. एकवार शान्तामामीकडे जाऊन पहावें म्हणून मी थोडासा पुढेंहि सरकलों. पण इतक्यांत बाबा बाहेरच्या बाजूनें तीरा-प्रमाणें धांवत आले, माझ्या कल्पनेबाहेर बाबांनीं मला अलगज उचललें.

"सदू, मामीला बाळ झालं—पेढे काढ लेका—" म्हणून बाबा माझ्या गालावर चापटी मारून म्हणाले. मीं मनांतल्या मनांत देवाचा धांवा केला. मला हें खरेंच वाटेना. बाबा माझ्याशीं इतक्या गोडीनें बोलल्याचा हा पहिलाच प्रसंग होता.

मला पुढचें कांहीं फारसें आठवत नाहीं. बाबांच्या अंगावरच मी झोंपीं गेलों होतों. बऱ्याच वेळानें मला आईनें हाताला धरून एका खोलींत उभें केलें आहे, एका बाजेवर एक कोणशीशी बाई अंगावर पांघ-

रूण घेऊन पडलेली आहे, आणि एक अगदीं लहान हातपाय असलेलें 'कांहीं तरी' तिच्याशेजारींच पडलेलें आहे हें मला नक्की आठवतें आहे. शान्तामामीचें बाळ आलें हें मला समजलें; पण हें कसलें बाळ ? याला बोलतां येत नाहीं, चालतां येत नाहीं, ऐकूं येत नाहीं—कांहीं नाहीं. हें असलें बाळ आणण्याकरितां का एवढी धडपड ? मला विचारलें असतें तर मीं असलें बाळ कधींच कबूल केलें नसतें. आई मला कांहीं तरी समजावून सांगत होती.

"आई, हें ग कसलं बाळ ?" मीं मध्येंच तिला अडवून म्हणालों. माझी नापसंति ऐकतांच शान्तामामीनें माझ्याकडे डोळे उघडून पाहिलें. मला वाटतें ती थोडीशी हंसलीहि.

"सदू, आलास का रे ?" म्हणून शान्तामामी माझ्याकडे पाहून म्हणाली.

"मामी, बाळ आणायला गेलीस तेव्हां मला कां नाहीं बरोबर नेलंस ?" मी धिटाईनें म्हणालों.

शान्तामामीनें हलकेच डोक्याखालीं आपला हात घातला. सहजच का हेतुपुरःसर—देव जाणे काय तें—तिनें आढ्याकडे पाहिलें. आणि मीं कधींहि न ऐकलेल्या अशा गंभीर आवाजांत ती म्हणाली, "एक बाळ देवाजवळ मागायला गेलं, सदू—तर किंमत कोण जबर पडते ? प्रत्यक्ष मृत्यूच्या दारांतून जावं लागतं. घडीचा भरंवसा नसतो. कुणावरहि विश्वास टाकावंसं वाटत नाहीं. दर पावलागणिक हें शेवटचंच पाऊल कीं काय म्हणून मन कचरत असतं—"

मला कांहीं समजलें नाहीं. आणि मला कांहीं समजावें ह्या हेतूनें ती बोललीच नव्हती. आलेल्या प्रसंगामुळें तिला जगाच्या रहाटीचा व्याप आणि संताप कळून आला होता. मनाच्या झालेल्या या हळुक स्थितीमुळें ती माझ्यासारख्या पोरापुढें जगांतल्या पंडितांनाहि न समजणारी भाषा एकदम बोलून गेली. मला वाटतें तिला लगेच आपली चूक कळून आली असावी; कारण लगेच ती हंसली.

"सदू, पण मला खरं खरं सांग—माझं बाळ तुला आवडलं का ?"

मी घोंटाळ्यांत पडलों. खरें बोलायला जावें तर शान्तामामीला वाईट वाटणार. आणि खोटें बोलायला जावें तर—छेः ! हें काय बाळ झालें ? मला तें बाळ मुळींच आवडेना.

" सांग ना ? मी जशी तुला आवडतें तसं माझं बाळ तुला आवडेल का ? " पुन्हां तिनें प्रश्न केला. तिला दुखविणें माझ्या जिवावर आलें. ज्याप्रमाणें एखाद्या आवडत्या माणसाच्या मर्जीखातर आपण त्याच्या इतर दोषांकडे दुर्लक्ष करतों त्याप्रमाणें मी शान्तामामीच्या त्या 'चिन्हाकडे' बिलकूल लक्ष न देतां सपशेल खोटें बोलून गेलों. मीं आपली पसंति मानेनेंच दर्शविली.

" आहेच आमचा सदू तसा शहाणा—! मी बाहेर आलें कीं नाहीं सदू—म्हणजे मग मी तुला छान छान गोष्टी सांगेन—खाऊ देईन. बाळाशीं भांडायचं नाहीं हं पण ! बाळाला मारायचं नाहीं—! बाळाशीं किती गोडीनं खेळायचं म्हणून सांगूं—? " शान्तामामी पूर्वीच्या आनंदी स्वरांत म्हणाली.

" पण मामी—हें बाळ अगदींच कसं ग लहान ? " मी म्हणालों.

" तूंसुद्धां असाच होतास ! " शान्तामामी हंसून म्हणाली.

त्या दिवशीं रात्रीं सगळीं माणसें दिवसाच्या श्रमानंतर एकमेकांशीं घोरण्याची शर्यत लावीत होतीं. मी मनांत प्रत्येकाच्या श्वासोच्छ्वासाची लांबी मोजून पहात होतों. बराच वेळ गेला—मला झोंप कांहीं येईना. डोक्यांत विचारांची वावटळ सुटली होती.

इतके दिवस वाट पाहिली ती काय ह्या असल्या बाळाकरितां ? ह्याला बाळ कसें म्हणावें ? अन् हें बाळ माझ्याशीं कसें खेळणार ? अन् हें असें वेड्यासारखें रडायला लागलें तर मी काय करणार ? शान्तामामीला हें बाळ कसें आवडतें ? ह्याच्यांत आवडण्यासारखें काय आहे ? अन् शान्तामामी 'तूंहि असाच होतास' म्हणून काय म्हणाली बरें ?

मी आईला हालवून जागें करण्याचा प्रयत्न केला. शेवटीं कोपरखळ्याचें शस्त्र उपयोगांत आणलें.

"काय रे ?—नीज आतां मुकाट्यानं." म्हणून आई ह्या अंगावरची त्या अंगावर झाली.

"मी असा होतों म्हणून मामी म्हणाली—आई—मी असा कधींच नव्हतों. खरं ना ? सांग मला" म्हणून मी आईच्या हाताला धरलें. आईनें माझा हात धरला आणि जोरानें जमिनीवर आपटला.

मी मुकाट्यानें उठलों. अंधारांत चांचपडत चांचपडत शान्तामामीच्या खोलीकडे गेलों. मी हळूच दरवाजाच्या फटींतून वांकून पाहिलें. बाळ शान्तपणें निजलें होतें—आणि मामीहि पण झोंपीं गेली होती. कोंपऱ्यांत समई तेवत होती. बाळाकडे पाहून मला अंगावर शहारे आल्यासारखें झालें. "म्हणे मी असाच होतों !—हंः, काय पोर आहे !" म्हणून न कळत दुपारच्या डॉक्टरांच्याच शब्दांत मी अंधाराला उद्देशून म्हणालों, आणि तडक धांवत जाऊन डोक्यावरून पांघरूण घेऊन स्वस्थ पडून राहिलों.

---

# प्रकरण ४ थें



## शिक्षण ! शिक्षण ! ! शिक्षण ! ! !

नवऱ्यानें बायकोस धाडलेलें खासगी स्वरूपाचें पत्र दुसऱ्यानें वाचणें महापाप आहे. पण सार्वजनिक हिताकरतां म्हणून तें पाप माथीं बसवून घेण्यास मी तयार आहें.

"चि. सौ. शान्ता ईस,

त्या दिवशीं कोण माझ्याशीं भांडलीस ? म्हणे पहा माझंच खरं होईल कीं नाहीं तें ! कुणाचं खरं झालं आतां ! शान्ताकाकू—अहो नकट्या बाईसाहेब ! कोणी जिंकली ? पुन्हां नाक काढायला जागाच नाहीं तुला.

पण सोनुली कुणासारखी आहे? तुझ्यासारखी असेल तर तिच्या लग्नाच्या वेळीं मला जाड तळव्याचे जोडे विकत घ्यावे लागतील. अर्थात् दुसऱ्या तिसऱ्या कांहीं कारणाकरतां मात्र त्यांचा उपयोग नाहीं बरं का! फक्त—! माझ्यासारखी असेल तर मी उलट जांवयाकडून हुंडा घेईन—आणि एका नवीन पद्धतीचा पुरस्कर्ता होण्याचा मान मिळवीन. शान्ते, रागावूं नकोस. अग त्यांत काय आहे? ह्या खेपेला मुलगी झाली तर इतकं वाईट वाटायला काय झालं—? देवाच्या दयेनं पुढच्या खेपेला—!!! कांहीं नाहीं, कांहीं नाहीं. विसरून जा. हो—पण नांव काय ठेवणार? लोकांनीं नांवं ठेवावींत असलं नांव ठेवायचं नाहीं—मी रागावेन. खालीं यादी देत आहें—

**गट १ ला :**—गंगा, सिंधु, सरस्वती—वगैरे सर्व नद्यांचीं नांवें.

**गट २ रा :**—चिमी, ठकी, बायडी, आवडी, ढंबू, फुम्या, ढली—वगैरे अर्थपूर्ण काव्यरसपरिपोषित नामाभिधानें.

**गट ३ रा :**—बेबी, रेना ( Raina ), रोझी—इत्यादि भूमध्यसमुद्रापलीकडील वातावरणांत पावसाळ्यांतील बेडकांच्या आवाजाप्रमाणें दुमदुमणारीं नांवें.

**गट ४ था :**—**(अ)** अमला, कमला, विमला, सरला—'ला'चा प्रास साधणारीं नांवें.

**(ब)** सरोजिनी, कुमुदिनी, सुहासिनी, नन्दिनी 'नी' च्या निशाणीचीं नांवें.

**(क)** सर्व स्थलवाचक नांवें. उदाहरणार्थ—काशी, वारणी ( वाराणशी ).

यापेक्षां आणखी किती तरी प्रकार करतां येतील. पण पोस्टमास्तर-जनरल अर्ध्या आण्याच्या एका कागदी पेटींत अडीच तोळ्यांच्या वर वजन धाडण्यास परवानगी देत नसल्यामुळं, आणि तूर्त खिशांत दोन पैसे ( दोन पैसे 'बाळगून' आहे हा अर्थ नव्हे. ) बाळगून असल्यामुळं, आणि इतरां-जवळ भिक्षांदेही करण्याची लाज वाटत असल्यामुळं—इत्यलम्! संसार वाढता असला म्हणजे अनेक आपत्ती वाढत्या असतात—या नियमाला

अनुसरून माझा पगार दहा रुपयांनीं वाढला आहे. साहेबी इच्छेपुढं इलाज नाहीं. असो. सदाशिवच्या लग्नाची आतां काळजी करण्याची जरूरी नाहीं. देशस्थांमध्यें ही देवघेव पूर्ण व्यवहाराला धरून आहे—बघ, मी दूरदर्शी आहें कीं नाहीं—? सही काय करूं? कशी करूं? कुठं करूं? माझी सही तर तिकडेच आहे—रागावलीस का? हा चहाटळपणा नाहीं—

—**रघुनाथ.**"

शान्तामामीच्या बाळाचें नांव काय ठेवावें याविषयीं बरीच चर्चा झाली.

"तुझा भाऊ महा विक्षिप्त आहे—मला पत्र आलं आहे त्याचं, त्यांत त्यानं एखाद्या चिनी मुलीसारखं 'कुंईकुंई' नांव ठेवावं म्हणून म्हटलं आहे. बायकोला एक पत्र धाडलं आहे वाटतं त्यानं. विचार तिला—तिची मर्जी असेल तसं करायला हरकत नाहीं." बाबा म्हणाले.

"मला आपलं वाटतं कीं 'शकुन्तला' नांव ठेवावं." आईनें आपली इच्छा प्रदर्शित केली.

शान्तामामी कांहींच बोलली नाहीं. मला वाटत होतें कीं मला कुणी तरी विचारील, पण माझी निराशा झाली. बन्यानें आणि मी या प्रश्नावर बराच वेळ खल केला होता.

"'बन्या' नांव फार चांगलं आहे—तेंच ठेवावं." बन्या म्हणाला.

"मग 'बन्या' ठेवण्यापेक्षां 'सदू' काय वाईट आहे?" मी म्हणालों.

"तुमचंच नांव काय तें चांगलं—लोकांचीं मात्र अगदीं वाईट!" बन्या रागावून म्हणाला.

"अन् तुम्हाला तरी काय वाटतंय् हो?" मी रागावून म्हणालों.

शेवटीं बारशाच्या दिवशीं संध्याकाळीं मामी हातांत पेढा देत हंसून म्हणाली, "हा सुलोचनेचा खाऊ बरं का सदू! बाळाचं नांव 'सुलोचना' बरं का! आतां बाळ म्हणून हांक मारलीस तर सुलोचना रागावेल बरं का!"

यानंतर सुमारें एक महिन्यांनीं मामा आले. थोरल्या बहिणीच्यादेखत स्वतःच्या अपत्याला उचलून घ्यायची इतकी कां लाज वाटावी हें एक गूढच आहे. मला वाटतें, आईला हें समजलें असावें; कारण दुपारीं मला

घेऊन तिनें माडीवरचा रस्ता धरला. पण मातृदेवतेला 'अंगाई' करून मी हलकेच खालीं निसटलों. ओसरीवर मामासाहेब आपल्या नूतन अर्भकापुढें हातानें चुटक्या वाजवीत, तोंडानें मांजरासारखें, कुत्र्यासारखें आणि इतर रानवट जनावरासारखें ओरडत, आपल्या अकलेचें प्रदर्शन पत्नीच्यापुढें करून दाखवीत होते. मी बाहेर गेलों तों मामा तोंडानें 'ओळोऽळो—ळो'चा प्रयोग करीत होते.

" अरे कोण, सदू का ? आई कुठं आहे रे ? " म्हणून मामांनीं प्रश्न केला. मी आईची परिस्थिति निवेदन केली. मामांनीं एक समाधानपूर्वक श्वास सोडला.

" निजली आहे ना ? Good Night म्हणावं ! तूं ये—बस असा. ह्या एका नवीन जीवाशीं तुझी ओळख करून देतों. आज दंतविहीन, पुच्छ-विहीन, ज्ञानशून्य, कृतिशून्य, अनुभवशून्य आणि विचारशून्य असा हा सव्वा हाताचा रंगीबेरंगी इतस्ततः गडबडां लोळणारा मुकस्तंभ जीव उद्यां कुमारी सुलोचना रघुनाथ जोशी ह्या नांवाखालीं दुसऱ्याचे चावे काढण्या-साठीं टपून बसेल, युनिव्हर्सिटीच्या शेपटीसाठीं रात्रंदिन आलफा, बीटा घोकत बसेल, दोन पुस्तकांच्या दोनशें दूणं चारशें पानांच्या ज्ञानावर अनु-भवाच्या गोष्टी सांगूं लागेल, आणि तारुण्याच्या धडार्डीत विचारांच्या कृतीपासून कायमची फारकत करून बसेल ! ही माझी मुलगी—सुलो-चना. सुलोचना हा माझा भाचा— सदाशिव. Shake hands. "

विंचू डसल्याप्रमाणें मी त्या पोरीचा हात सोडून दिला.

" मामा, तुम्ही आत्तां कायसंसं म्हणालांत त्याचा अर्थ काय ? " मी म्हणालों.

" माझ्या म्हणण्यांत कधींच कांहींच अर्थ नसतो असं तुझी मामी म्हणते." मामा हंसून म्हणाले.

इतक्यांत बन्या माझ्या शोधार्थ आला. त्याला पहातांच मी मामा-सारखा आवाज काढून म्हणालों, " बन्या, आज हें फिन्, तें फिन्, हें शून्य, तें शून्य म्हणून लोळणारी ही माझी मुलगी उद्यां मारामारी करील,

कांहीं तरी करून कुणाला तरी चावेल. माझी मुलगी सुलोचना. सुलोचना, हा माझा भाचा--बन्या. फिर फ्रॅन्ड ! ”

मी इतक्या गंभीर मुद्रेनें भाषण करीत असतां मामा, मामी हंसत आहेत हें पाहून मी रागावलों. “ बन्या, ही एक मुलगी आहे. ती वाईट आहे. चावणारी आहे. तूं तिचा हात धरूं नकोस. ” म्हणून मी सत्यस्वरूपांत प्रकट होऊन ओरडलों. मामा जास्तच्च हंसूं लागले. बन्या माझ्याकडे ‘ भले रे पठ्ठे ’ या कौतुकाच्या मुद्रेनें पहात तोंडानें सद्याचा रस चोखीत उभा राहिला.

“ म्हणजे ? सदाशिव, अरे इतक्या लहान वयांतच तूं स्त्रीद्वेष्टा आहेस कीं काय ? संभाळ हो, सुधारलेल्या जगांत असलीं मतं आचरटपणाचीं, हेकेखोर अन् स्वार्थी समजलीं जातात. पूर्वींचा मनु आज पालटलेला आहे. वेड्या, हा दुराग्रह तुला सोडलाच पाहिजे. शान्ते, अग ह्या पोराचं होणार तरी कसं ? हा जर असं बडबडूं लागला तर शाळा-कॉलेजांतल्या महिला याला चार रेवड्यांवर विकतील.” मामा म्हणाले.

शान्तामामी मला जवळ ओढून हंसत म्हणाली, “ गुलामा— अजून दुधाचे दांतसुद्धां पालटले नाहींत अन् ही शिरजोरी ? वळणाचं पाणी वळणावरच जाणार म्हणून म्हणतात तेंच खरं. एक पळ जात नाहीं मेल्यांचं बायकांच्याशिवाय अन् मानभावीपणा कोण ? ”

“ हा टोला मला लागूं नाहीं” मामा म्हणाले.

“ हें सांगावं लागतं ! माझ्या मराठी सात यत्तांचे काय सत्तसूर निघाले तें मी विसरणार नाहीं बरं का—!” मामी किंचित् कोपाविर्भावानें म्हणाली.

“ अग तूं म्हणजे सातासमुद्रांपलीकडचं रत्न ! सातासमुद्रांपलीकडे राजानं केला भात--पण नवऱ्याच्या गळ्याला निष्कारण तांत. आतां तुझंच उदाहरण घेऊं. परमेश्वराला स्मरून उत्तर दे, एक दिवस कधीं माझ्याशीं वाद खेळल्यावांचून तूं राहिली आहेस ? ”

“ हो—पण वाद खेळणं निराळं अन् वाद घालणं निराळं आहे—” मामी म्हणाली.

" आतांच बघ. शब्दच्छल करण्याचं कांहीं तरी कारण होतं ? पण मग माझ्याशीं भांडणार कोण ? पण तें जाऊं दे. मी आपलं वर्तन सुधारण्याची शिकस्त केली आहे. आतां या पुढच्या पिढीचे आधारस्तंभ हे तुझ्यापुढं उभे आहेत. त्यांच्या मतामताबद्दल मला जबाबदार धरूं नकोस. त्यांच्या मताचे धनी ते आहेत." मामा म्हणाले.

" त्यांना शिकवण्याचे धनी कोण ? त्यांची काय वाट ?" मामी म्हणाली.

" पुन्हां आपलंच. सदू , यापुढं तुझ्या शिक्षणाची नैतिक जबाबदारी मी पत्करणार नाहीं. बाई पाहिली कीं तिच्यापुढं मान वांकव, नाहीं तर तिच्या वांकलेल्या मानेवर सुरी ठेव—काय वाटेल तें कर. बरं पण शान्ते, आपल्या सुलीला मात्र अगदीं सुलेमान बनवून सोडूं आपण. तिला विजार, बूट देऊन शाळेंत घालूं, कॉलेजांत धाडूं—"

" अगबाई ! पुरे पुरे ! उगीच कुणी नांवं ठेवतील आपल्याला—करायचीय् काय शाळा ? शाळेचे खांब, तुळया, आढीं, पिढीं—सर्व कांहीं तें तिथं उभं आहे. सुलेमान—तूं सुलेमानखां, बरं का ! माझा छुलेमानखां ! हंसला—" म्हणून मामीनें सुलोचनेला प्रेमानें कवटाळून घेतलें. बन्याचें तोंड गोरेंमोरें झालें. माझ्या हाताला धरून तो हलकेच म्हणाला, " बाहेर चल, बाहेर चल. नाहीं तर तुलाहि धरतील त्या—"

मी त्याच्या बोलण्याकडे लक्ष दिलें नाहीं. मी मामांच्या शेंडीशीं खेळत उभा राहिलों.

" कां रे बाबा, माझी शेंडी तुझ्या हातांत कां ?" म्हणून मामांनीं म्हणतांच मीं तो नाद सोडून दिला.

" सदू, तूं अजून शाळेंत जात नाहींस ना ? छान ! तूं उद्यांपासून शाळेंत तर जाऊं नकोस पहा कशी गंमत होईल ती. आमची सुली आतां शाळेंत जाईल. तुझ्यापुढं जाईल बघ. अन् मग तूं मागं रहाशील. उद्यां या पोरीचं नांव घालतों शाळेंत." मामा म्हणाले.

आणि शिक्षणाचे विचार माझ्या डोक्यांत याच वेळीं शिरले. पाटी, पेन्सिल घेऊन शाळेंत जायचें, मधल्या वेळेला खायला परत यायचें अन् संध्याकाळीं सुट्टी, अगदीं साधासिधा मार्ग ! सुलोचना पुढें जाईल अन्

आपण मागें राहूं ही भीति मला फारशी त्रास देत नव्हती. पण—मुलांच्या बरोबर खेळतांना मुलें आपल्याला चिडवतील ही मात्र भीति मला वाटूं लागली.

त्या दिवशीं मीं बन्याचा सल्ला घेतला. बन्याचें मत शिक्षणाविषयीं फारच कलुषित झालें होतें. त्याचें मत शिक्षणाच्या फार विरुद्ध होतें. त्यानें मला स्वच्छ सांगितलें——

" तूं शाळेंत जाऊं नकोस. कोणी कितीहि मारलं, कितीहि रागं भरलं तरी उंबऱ्यांत बसून रहा. पाहिजे तर मोठ्यानं रड, पण शाळेचं नांव काढूं नकोस. मी तर म्हणतों—सदू, घरांत राहून इतकं खेळायला मिळतं तर मुलांनीं शाळेंत जावंच कशाला ? शाळा कशी असते तुला माहीत आहे ? एक मोठं थोरलं घर असतं. त्यांत पुष्कळशा खोल्या असतात. प्रत्येक खोलींत निरनिराळे वर्ग असतात. प्रत्येक वर्गांत तुझ्यामाझ्यासारखीं मुलं असतात. एक मास्तर असतो. कांहीं तरी वेड्यासारखं विचारून आपल्याला उत्तर देतां आलं नाहीं म्हणजे एका लांब छडीनं मारायचं हें त्याचं काम. सगळ्या मास्तरांच्यावर एक सुपरिंटेण असतात. ते तर फारच मारतात."

बन्याच्या म्हणण्याप्रमाणें म्हणायचें झालें तर पुष्कळशीं मोठीं माणसें एके ठिकाणीं जमून लहानलहान मुलांना मारण्याचा निश्चय करतात त्या ठिकाणाला ' शाळा ' असें म्हणतात. बन्यानें आणखी पुष्कळच गोष्टी मला सांगितल्या होत्या, पण माझा निश्चय कांहीं बदलला नाहीं.

संध्याकाळीं बाबा घरीं आल्याबरोबर मीं त्यांच्यापाशीं माझा बेत सांगितला. बाबा बराच वेळ विचार करीत होते. न्यायाधिशासमोर उभा रहाणाऱ्या गुन्हेगाराप्रमाणें मी धडधडणाऱ्या हृदयास धीर देत खालीं मान घालून उभा होतों. बराच वेळ गेल्यानंतर बाबांनीं मान हालवली. " नाहीं——" या तुटक उत्तरानें माझी कंबरच खचली.

" उद्यांपासून मीच तुला रोज एक तासभर घेणार आहें. शाळेंत जाऊन वेळेच्या एकशतांशसुद्धां अभ्यास होत नाहीं. हल्लींच्या शाळा म्हणजे निव्वळ डांबिसगिरी आहे. मास्तरांचे पगार मात्र भरपूर द्या यांना. शिकवण्याच्या नांवानं मात्र—! " म्हणून बाबांनीं मला थोडेंसें हल्लींच्या

शिक्षणावर विस्तृत व्याख्यान दिलें. आणखी बराच वेळ जुनी पद्धति आणि नवी पद्धति यांतील गुणदोषांचें तुलनात्मक व्याख्यानवजा वर्णन झालें. पण मला जुनी पद्धति माहिती नव्हती आणि म्हणून मला तें कांहीं पटलें नाहीं. उलट करायला गेलों काय आणि झालें काय ह्याचा मात्र खेद झाला. आतां यापुढें बाबांची आणि माझी रोज नियमित तासभर चांगलीच जुंपणार या विचारानें मी गर्भगळितच झालों. तीनचार दिवसांकाठीं एकदां हजिरीपट बाहेर निघे तो मी पुढें पंधरा दिवस विसरत नसें. आतां तर शहाशिवाजीची रोजचीच भेट.

" आमच्या लहानपणीं हे असले शिक्षणाचे धिंडवडे कधींच होत नव्हते. भूगोल म्हटला म्हणजे नदी न् नदी तोंडपाठ. एक वेळ नदी आपला ओघ पालटील पण आमचा वाक्ओघ अखंडीत. शिवाजीचा जन्म—शहाजीची भेट—सुरतेची स्वारी—सनावळ्या अगदीं संध्येसारख्या ! अन् हल्लीं काय तर वस्तुपाठ म्हणे ! वस्तुपाट ! हंः ! अन् सगळाच गोष्टयांचा खेळ. लहान पोरांना गोष्टया खेळायला शिकवायच आहे काय ? इंद्रियविज्ञान-शास्त्र ! यांच्या काकोबांनीं ठेवलं आहे ! शरीरांत दोनशें हाडं आहेत कीं दोनशेंसहा आहेत—मी म्हणतों साडेतीनशें आहेत—! करायचं आहे काय यांना ? त्यापेक्षां मीच तुला धडे देईन." इत्यादि, इत्यादि. नंतर बाबांनीं माझ्या शिक्षणाचा प्रश्न निकालांत काढला.

मला बाबांचें शिक्षण नको होतें. पण मी होऊनच ह्या घोंटाळ्यांत पडलों होतों. त्यांतून बाहेर पडण्याचा कांहींच मार्ग सुचेना. मामांना शरण जावें हाहि एक विचार डोक्यांत आला. पण बाबा मामांचें मुळींच ऐकणार नाहींत, तेव्हां त्या मार्गांत शिरावेंसें वाटेना. शेवटीं आल्या प्रसं-गाला तोंड देण्यावांचून कांहींच गत्यंतर नाहीं म्हणून मी स्वस्थ बसलों. मात्र या निराशेचा राग बिचाऱ्या सुलोचनेवर निघाला.

दुसऱ्या दिवशीं मामांना कांहीं तरी काढून देण्याकरतां म्हणून शान्ता-मामी बाहेर गेली होती. 'तिच्याकडे पहा बरं का—पडेलबिडेल ती' म्हणून सुलोचनेच्या रक्षणाची जबाबदारी माझ्यावर सोंपवली होती. प्रथम प्रथम मीं तिच्याकडे लक्षपूर्वक पाहिलें. पहिल्या दिवशीं वाटलेला तिट-

कारा आज थोडासा कमी झाला होता. पण अजून तिच्याविषयीं आपलेपणाचा भाव वाटत नव्हता.

एवढेंसें लहान मूल हातपाय हालवतें तरी कसें याचा मला अचंबा वाटला. मी इकडे तिकडे पाहून हळूच तिच्या पायाला हात लावून पाहिलें. नंतर मी सरावामुळें थोडासा धीट झालों. माझ्या हातांत तिचे हात घेऊन मी तिच्यापुढें नंदीबैलासारखी मान हालवीत म्हणालों,

" काय ग ए, मी कोण आहें तुला माहिती आहे ? "

माहिती असल्याप्रमाणें तिनें माझ्याकडे निरखून पाहिलें. इतक्या गोड स्वभावाची मुलगी जवळ असतांना मी मनांत तिच्याविषयीं शत्रुत्व बाळगून होतों याचा मला खेद वाटूं लागला. झालेल्या अपराधाची क्षमा मागण्याकरितां म्हणूनच कीं काय मीं तिला माझें बोट धरूं दिलें. आणि मनांत निश्चय केला कीं यापुढें सुलोचनेला खेळवण्याकरितां म्हणून मुद्दाम दोन तास निराळे काढून ठेवायचे. तिला आपल्या सर्व खेळांची माहिती करून द्यायची.

विचारांत गुंग असल्यामुळें माझें तिच्याकडे थोडेंसें दुर्लक्ष झालें. तेवढ्या वेळांत तिनें माझ्या बोटाचें निरीक्षण करून, थोड्याशा विचारान्तीं तें बोट चोखण्यास सुरुवात केली होती. जसजशी जी जोरजोरानें बोट चोखूं लागली तसतसें मी बोट उदार हृदयानें पुढें करूं लागलों. माझ्या बोटाला इतकी गोडी असेल ही कल्पनाच नव्हती मला पूर्वीं. पण म्हणतात ना, आपल्याजवळ कस्तुरीचा सांठा आहे हें खुद्द कस्तुरी-मृगाला समजत नसतें. त्याप्रमाणेंच माझ्या स्वतःच्या गुणांबद्दल मी पूर्ण अंधारांत होतों.

आणि एकाएकीं सुलोचना कळवळून रडूं लागली. मला तिच्या रडण्याचें कारण समजेना. मी तिला प्रथम गोडीनें सांगून पाहिलें—पण तिनें आपला सूर कमी केला नाहीं. नंतर मी रागानें तिच्या पाठींत एक रट्टा लगावला. पण रट्ट्याचा उद्देश सफळ न होतां तिनें तर अत्रसानांत ओरडण्याला सुरुवात केली. शेवटीं कंटाळून मी शान्तपणें हाताची जुडी करून छातीवर ठेवीत म्हणालों, " रड—तूं वाटेल तितकी रड. तुला मोठ्या माणसाचं ऐकायला नको काय ? चालू दे तुझं—"

आई धांवतच आली. शान्तामामी, मामा सगळींजणें धांवत आलीं.

"कार्स्या––काय रे केलंस तिला? चिमटा तर नाहीं ना घेतलास?" आई माझा हात धरून म्हणाली, "काय केलंस तिला? तोंड नाहीं का तुला बोलायला?"

"मीं काय केलं? तिनंच माझं बोट खेळायला मागितलं. मी तिला सांगितलं कीं तोंडांत बोट घातलं म्हणजे मला राग येतो. पण तिनं हट्टच घेतला––मी ऐकत नव्हतों म्हणून तिनं रडायला सुरुवात केली. विचार तिला. मी काय करणार?" मी म्हणालों.

"कार्स्या––तिच्या तोंडांत का तूं बोट घातलंस?" आई एकदम ओरडली.

"मीं नाहीं. तिनंच माझं बोट मागितलंन्!" आईच्या भाषणांत मी दुरुस्ती करीत म्हणालों.

पण आईला माझें खरेंच वाटेना. तिनें पहातां पहातां दोनदां स्क्रू पिळल्याप्रमाणें माझा गाल फिरवला. मी संतापानें रडत रडत म्हणालों, "मार, मार मला. लागेल तितकं मार. मी कांहीं न करतां मला मारणार काय? मी रडीन––मोठ्यानं रडीन––"

रात्रीं आई बाबांना समजावून सांगूं लागली,

"हें पहा––मला तुमची जुनी पद्धत नको. मला तें कांहीं समजत नाहीं––मला एवढं समजतं आहे कीं ह्या पोराला उठतां लाथ अन् बसतां बुक्की खाण्याची झालेली आहे संवय. बोलतांना माझं तोंड दुखून आलं तरी त्याचं गुरगुरणं कांहीं संपत नाहीं. मारतांना माझे हात दुखून आले तरी हा खुशाल अंगावरचे वळ मोजीत फिरतो. खोटं बोलणं तर त्याच्या पांचवीला पुजल्यासारखं झालं आहे. मीं आपल्या भावाची बायको इथं चार दिवस आणली तें कांहीं यानं तिच्या मुलीचं नाक तोंड ओढण्याकरितां नाहीं. उद्यांपासून त्या बन्याच्या शाळेंत जाईल तो. असेल नशिबीं त्याच्या तर शिकेल, आपल्या पोटाला मिळवील. कांहीं मला त्याच्या जिवावर रहाण्याची आशा नाहीं."

बाबांना जरी आईचें भाषण आवडत नसलें तरी मला मनापासून

गुदगुल्या होत होत्या. मनांतल्या मनांत मी मातृदेवतेला शतशः प्रणाम केले. एक शेवटचा प्रयत्न करून पहावा म्हणून बाबा थोडेंसें आर्जवाच्या स्वरांत म्हणाले, "पैशाची निष्कारण उधळपट्टी होईल, याची काय वाट? आज एक मुलगा शाळेंत घालायचा म्हणजे—"

"पण आतां त्याला घरकुल्यांत किती दिवस बसवून ठेवणार?" आई मध्येंच म्हणाली.

"मराठी चार यत्ता घरींच केल्या असत्या तर तेवढाच खर्च वांचला असता. आमच्या लहानपणीं मी या पुण्यांत वारावर जेवून दिवस काढलेले आहेत. तेल फार जळेल म्हणून संध्याकाळच्या आंत जेवण करून निजलों आहें. आत्तांच्या लोकांना सगळी थट्टा वाटते. पण मी कसे दिवस काढले असतील तें माझं मला माहीत. आणि इतक्या दिवसांच्या कष्टानं एकएक पैसा करीत मिळविलेल्या संपत्तीवर हें पोरटं अत्तराचे दिवे पाजळणार! बापानं मर मर मरावं अन् चार पिढ्या पुरेल इतकी माया जवळ करून ठेवावी, अन् पोरानं दुसऱ्याच एखाद्या महामायेच्या नादीं लागून पाठीमागच्या चार पिढ्यांना कलंक लावावा. शिक्षण! कसलं आलं बोडक्याचं शिक्षण? तिकडे शिकून पंडित नाहीं महापंडित झाला तरी एक टांचणी करण्याची अक्कल नाहीं—आणि जवळ टांचणांचे गठ्ठे कोंपऱ्यागणिक लोळत पडतील. काय शिक्षणाचं खूळ शिरलं आहे लोकांच्या डोक्यांत देव जाणे. त्या मेकॉलेसाहेबाची ही कारवाई. आमच्या लोकांना इंग्रजी पद्धतीचं ज्ञान मिळवून देण्याचा काय खटाटोप केलान् पण त्या चोरानं. धुळीला मिळण्याचीं लक्षणं! सारा मतिभ्रष्टतेचा परिणाम! शेवट प्रळय होईल!!"

"आतां पुरे नाहीं का झाली वटवट? कित्ती वेळचा ग्रंथ चालला आहे!" आई मध्येंच म्हणाली.

त्याच वेळेला माझ्या डोक्यांत आलें कीं बाबांनाहि शाळेंत अडकवून टाकावें म्हणजे ते वटवट करणें बंद ठेवतील.

---

# प्रकरण ५ वें



## पहिली पायरी

कायदा पास झाल्यापासून तो अमलांत येण्यास थोडासा अवधि जावा लागतो, या न्यायास अनुसरून सुमारें आठ दिवसांनीं मीं शाळेंत प्रथम पाऊल टाकलें.

लोकनियुक्त पक्षाचें मत वळविणारा गृहमंत्रि आणि बाबा एकाच रंगाचे होते. बाबांनीं आईला पदोपदीं विनवून सांगितलें, पण आईनें आपला हट्ट शेवटपर्यंत कायम ठेवला. तेवढ्या अवधींत बाबांनीं पुण्यांतल्या सर्व शाळांची आंतून आणि बाहेरून पहाणी केली; आणि आतां जर माझी व्यवस्था केली नाहीं तर घरांत प्रकरण बरेंच चिरडीस जाईल अशी वेळ आली, तेव्हां एके दिवशीं सकाळीं त्यांनीं माझें मनगट पकडलें. फांशीच्या गुन्हेगाराला ज्या प्रेमानें ओढण्यांत येतें त्याप्रमाणें माझें मनगट पकडून मोठ्या गंभीर मुद्रेनें बाबांनीं घराबाहेर पाऊल टाकलें !

एखादा उंचापुरा उंट चालत असतां त्याच्याबरोबर जर एखादें दीडवीत उंचीचें कुलंगी कुत्रें चालूं लागलें तर जी शोभा दिसेल त्याप्रमाणें आम्ही दिसत असूं. मंडईकरितां म्हणून खांद्यावर पोतेऱ्याच्या रंगाचें फडकें टाकून, तपकिरीच्या चिमटीचा आस्वाद घेत, ‘ हळुहळु अमलांगी ’-प्रमाणें दुडक्या चालीवर पावलें टाकीत येणारे रामभाऊ वाटेंत भेटले.

“ कोण, भाउसाहेब ? अरे वाः ! अलभ्य लाभ ! आज कुणाचं तोंड पाहिलं होतं सकाळीं मी कुणास ठाऊक ! ”

बहुतकरून रस्ता झाडणाऱ्या बाईशिवाय सकाळीं ह्यांना तोंड दाखवायला यायला हे मोठे खानदानीचे सरदार पडले कीं नाहीं !

“ हे कोण ? चिमुकले भाउसाहेब वाटतं ! वाः ! छान ! छान ! काय हो पुट्टुपाडत, अध्ययन कोठपर्यंत आलं आहे ? ” म्हणून रामभाऊंनीं फटक्‌दिशीं शिंकेचा आवाज दिला.

"आज त्याला शाळेंत घालणार आहें. अकरा वाजायला आले असतील, जातों." म्हणून बाबांनीं गंभीर मुद्रेनें उत्तर केलें. रामभाऊ 'ऑ' करून दुसऱ्या शिंकेची वाट पाहूं लागले.

"अजून शाळेंत नाहीं घातलं ? My dear भाउसाहेब, आमचा दत्तू या वर्षी पहिलींतून दुसरींत जाईल. शिक्षणाची कोण ही हेळसांड ? मुलांच्या बाबतींत फुकट जाणारीं पहिलीं पांच वर्षसुद्धां जमेस धरतां येतील तर पांचव्या वर्षी मुलगा मराठी पांचवीचं ज्ञान घेऊन बसेल. अलिकडे अलिकडे वेळेचं महत्त्व लोकांना वाटेनासं झालं आहे. शास्त्रीय शोध झपाट्यानं मनुष्याच्या आयुष्यक्रमांत 'न भूतो न भविष्यति' फरक करून टाकीत आहेत. विमानांची सुधारणा राष्ट्राच्या, देशाच्या, व्यक्तीच्या, सर्वांच्या—! पण जाऊं द्या. मलाहि भाजी आणायची आहे. बरं आहे." म्हणून रामभाऊ पुन्हां डबींतून बुचकुली काढीत चालूं लागले. मला हेंच समजेना कीं हा सद्गृहस्थ विमानाच्या गप्पा कशाला मारीत होता ?—अन् विमान म्हणजे काय ? रामभाऊंच्या घरांत तर एखादें विमान नाहीं ? वेळेचा अन् विमानाचा संबंध काय ? मला पुढें कळून आलें कीं, रामभाऊंच्या देवघरांत खंडोबा, व्यंकोबा इत्यादि दैवतें असलीं तरी त्यांच्या हृदयांत एकाच देवाला थारा होता.—तो देव म्हणजे गोरा मनुष्य !

प्रेम अनिर्बंध असतें, गोरा मनुष्य आणि काळा मनुष्य यांच्यामध्यें थोडें का अंतर आहे ? जलमार्गानें एक पत्र पोहोंचायलासुद्धां दिवसच्या दिवस लागतात. किती समुद्र आडवे येतात हें भूगोल शिकल्यानें छान समजतें. पण प्रेमाची गति पंखावर असते. रामभाऊंचें प्रेमसर्वस्व म्हणजे गोरा मनुष्य——white man ! तसें म्हणायला गेलें तर रामभाऊ कधींहि इंग्लंडला गेले नव्हते. मुंबईला जाऊन समुद्राच्या लाटेला आनंदानें स्पर्श करून इंग्लंडच्या दिशेकडे तोंड करून उभें रहाणें, आणि कपडे भिजण्याची भीति म्हणून साष्टांग नमस्कार न करतां फक्त मनोभावानें दोन हातांची अंजुली मिटवून 'जय देवा' म्हणून म्हणणें—एवढाच काय तो त्यांचा

आणि इंग्लंडचा परिचय होता. रामभाऊ I. C. S. फेल नव्हते कीं संस्थानचे युवराज नव्हते. तरी पण प्रेम कांहीं सांगून येणारी चीज नसते. असो. ह्या प्रेमी जीवाचा पुढें पुष्कळच संबंध येणार असल्यामुळें हें इतकें सांगावें लागलें.

" बाबा, रामभाऊंचा दत्तू शहाणा आहे का हो ? " मी म्हणालों.

" बापापेक्षां जास्त शहाणा आहे." बाबांचें तुटक उत्तर आलें. मी मुकाट्यानें चालूं लागलों.

शाळेंत मास्तरांच्या समोर बाबा अगदीं लष्करी शिस्तींत वागत होते.

" मास्तर, हा मुलगा शाळेंत घालायचा आहे. ह्याला बसवा. फी वगैरे काय तें सांगा. मला बसायला मुळींच वेळ नाहीं—" म्हणून बाबांनीं मला पुढें केलें. मी भीतभीत मास्तरांच्याकडे पाहिलें. आमच्या मास्तरांचा चेहरा अजून मला स्पष्ट आठवतो मास्तरांच्या दाढीमिशा हें एक त्यांचें वैशिष्ट्य होतें. डोक्याचे केंस संपून दाढी सुरू कुठें झाली हें समजणें कठीण होतें. मिशा आणि दाढी यांच्यामध्यें फरक करणारी रेषा मुळींच दिसत नव्हती. केंसांचीं झुलपें मनाला वाटेल तशीं डोक्यापासून हनुवटीपर्यंतच्या प्रदेशांत इतस्ततः बागडत होतीं. आणि अहिंसा हाच धर्म, म्हणूनच कीं काय मास्तरांनीं त्यांची कत्तल करण्याचें बरेच दिवसांत टाळलें होतें. किंवा कदाचित् कधीं काळीं उगवणाऱ्या प्राण्याला अतिथिसत्कार दाखवणें एक वेळ चालेल, पण रोजच मरणार त्याला कोण रडणार हेंहि तत्त्व त्यांनीं आपल्या आयुष्यांत गोंविलें असावें. पुढचे दोन दांत स्थानभ्रष्ट झालेले असल्यामुळें दोन बाजूंस दोन खांब आणि मध्यें लोंबता लोलक असा प्रकार दिसत होता. त्यांतल्यात्यांत दंत्यवर्णांतील अक्षरें म्हणतांना मध्येंच लुडबुडणारा जिभेचा शेंडा पाहिला म्हणजे जगामध्यें अशा करमणुकीच्या गोष्टी आहेत म्हणून जगांत रहावेंसें वाटतें, हा विचार मनांत आल्यास नवल नाहीं. मास्तरांच्या कोटाला चार गुंड्या होत्या, पण चारीहि गुंड्या चार दिशांकडे धांवत होत्या. नाकाच्या शेंड्यावर चष्मा ठेवून चष्मा आणि कपाळ यांच्यामध्यें सांपडणाऱ्या सापटींतून पहाणें मास्तरांना आवडत असलें पाहिजे. माझी लहानपणीं तर हीच समजूत होऊन गेली

होती कीं मास्तरांना नाकानें दिसत असावें. इतर चारचौघांप्रमाणें माझ्याशीं त्यांचें वर्तन असे. निष्कारण सूडाची भावना ठेवून मला त्यांनीं कधींहि छळलें नाहीं. पण चारचौघांप्रमाणें माझा स्वभाव नसल्याकारणानें मला तें सर्व पुढेंपुढें कंटाळवाणें होऊं लागलें.

मास्तरांनीं माझ्याकडे चष्म्याच्या आणि कपाळाच्या झरोक्यांतून पाहिलें. स्टेशनवर ज्याप्रमाणें हुंडेकरी एखाद्या डागाकडे डांबरानें नंबर टाकण्याच्या आधीं काळजीपूर्वक पहातो त्याप्रमाणें मास्तरांनीं माझ्याकडे बराच वेळ लक्षपूर्वक पाहिलें.

"काय रे बाळ, तुला घरीं कांहीं शिकवलं का रे?" म्हणून मास्तरांनीं प्रश्न केला.

"आम्ही घरीं कांहींच न शिकवतां तो स्वयंस्फूर्तीनं बऱ्याचशा अवान्तर गोष्टी छान शिकला आहे." बाबांनीं उत्तर केलें. मी विनयानें लज्जित होऊन खालीं मान केली.

"काय रे तुला लिहितां वाचतां येतं का?" मास्तरांनीं दाढीस कुरवाळीत प्रश्न केला.

"मास्तर—इकडे लक्ष द्या. त्याला काय विचारतां? मी तुम्हांला सांगतों, त्याला कांहीं येत नाहीं. त्याला रडतां येतं, लहान मुलांना रडावं कसं हेंहि येत आहे. मोठ्या माणसांना रडकुंडीस कसं आणावं हें त्याला उपजतच ज्ञान आहे. खोटं बोलण्याची कला आज ह्या पुण्यांत त्याच्यासारखी दुसऱ्या फारच थोड्या लोकांना साधली असेल. मास्तर, माझा मुलगा आहे म्हणून मी अवास्तव, उगीच लांब लांब गप्पा मारीत बसणारा गृहस्थ नाहीं. माझा मुलगा शुद्ध दगड आहे, सह्याद्रीच्या काळ्या फत्तराला फोडणं जितकं सोपं आहे तितकं ह्या मुलाला वागवणं सोपं आहे. आतां तुम्हांला काय बोलायचं तें बोला—" म्हणून बाबांनीं मास्तरना बोलण्यास परवानगी दिली. माझ्याविषयींचें बाबांचें मत ऐकून मला फार वाईट वाटलें. बाबांना ह्या वर्तनाबद्दल पश्चात्ताप करण्याची पाळी आणीन तेव्हांच राहीन, ही भयंकर प्रतिज्ञा मीं मनांतल्या मनांत केली. मी आपल्या परीनें चांगलें वागण्याचा इतका प्रयत्न करीत असतां मला शुद्ध दगडाच्या

पंक्तीला नेऊन बसविण्यांत बाबांना काय पुरुषार्थ वाटला असेल तें त्यांचें तेच जाणोत. स्वतःच्या लहरी आणि खुनशी स्वभावामुळें एका लहान जीवाचें कायमचें शत्रुत्व त्यांनीं पदरांत बांधून घेतलें हें मात्र नक्की. अर्थात् त्या वेळेला मी कांहींच बोललों नाहीं. फक्त एकवार माझ्या मनाची चळवळ व्यक्त करणाऱ्या क्षोभित नेत्रांनीं मीं त्यांच्याकडे पाहिलें.

" अरे वाः ! म्हणजे हा छोकरा बराच क्रान्तिकारक आहे म्हणायचा ! काय रे, घरांतल्या माणसांना तूं बराच त्रास देतोस कीं. चालायचंच, चालायचंच. लहानपणीं मुलं स्वभावतःच थोडींशीं हूड असतात. गंगोत्री-पासून तों बाद्रिनारायणाच्या पुढं बऱ्याच अंतरापर्यंत विजेच्या वेगानं धांवत सुटणारी गंगामाई अलाहाबाद आल्याबरोबर शान्तपणानं वाहात जाते. पोक्तपणीं गंभीरपणा उठावदार दिसतो. बाळपणीं चार उड्या मार-ण्यांतच शोभा असणार." मास्तर माझ्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाले.

" मास्तर, तुम्ही एक मला विचित्रच दिसतां; का दाखले आणि उपमा देऊन मला खोटं करूं पहातां ? आज सहा वर्षं या पोराला मी रात्रंदिवस डोळ्यांखालीं घालतों आहें आणि तुम्ही मला गंगामाईच्या गोष्टी सांगतां ! भूगोल तो भूगोल, आणि अनुभव तो अनुभव. असले सात भूगोल आणलेत तरी मी बधणार नाहीं." बाबा उसळून म्हणाले. मला वाटतें, दर वर्षीं प्रत्येक नवीन मुलाच्या भरतीच्या वेळीं मास्तरांना पाल-काचीं स्फूर्तिदायक वचनें ऐकायला मिळत असल्यामुळें त्यांना तें अंग-वळणींच पडल्यासारखें होऊन गेलें असावें. मास्तरांनीं माझ्या तोंडावरून हात फिरवीत म्हटलें,

" काय मुलांची जात तरी पहा ! विलक्षण, विलक्षण ! अगम्य, अघ-टित; आश्चर्यकारक ! बाकीं आपल्या लहानपणीं आपण तरी काय कमी चिंचा पाडल्या ! "

पण बाबांना हें न समजण्याजोगें नव्हतें.

" आपल्या लहानपणीं आपण काय केलं त्याची वाच्यता आज कर-ण्यांत काय अर्थ आहे ? पुन्हां चुक्या होऊं नयेत म्हणून जपायचं कीं चुकीबरहुकूम पुन्हां दुसरी चूक होऊं द्यायची ? मास्तर, लहान मुलांत

मिळून मिसळून वागण्यानं तुम्हीहि लहान मुलासारखंच बोलायला लागलांत." बाबा म्हणाले.

"साधूसंगति, साध्वीसंगति आणि बालसंगति नेहमींच पवित्र असतात !" मास्तर म्हणाले.

बाबा समोर भिंतीला टांगलेल्या घोड्याच्या चित्राकडे पहात स्तब्ध होते.

"मास्तर, हल्लींचं शिक्षण माझ्या मतं अजिबात चूकीचं आहे. ज्या भरतवर्षांत कांहीं काळापूर्वीं शिक्षणाची स्थिति सुधारणेच्या कळसाला पोहोंचली होती त्याच देशांत आज शिक्षणाचीं दुकानं उघडलीं जावींत हा काळाचा महिमा आहे. ज्या देशांत आचार्यांच्या आश्रमांतून विद्येचे अविच्छिन्न झरे वहात होते त्याच देशांत चार धंदेवाईक व्यापाऱ्यांनीं लुटालुटीच्या तत्त्वावर शिक्षणाच्या तोट्याकरवीं ज्ञान पुरवावं—हः ! यालाच मी नवी पद्धत म्हणतों. आणि या नव्या पद्धतीच्या शिक्षणाचा मी कट्टा शत्रु आहें. मुलांची चौकसबुद्धि मुळांतच खुडली जाऊं नये म्हणून तुमची ही नकाशांची नवीन पद्धति निघाली. घोडा हें जनावर कसं असतं हें समजायला इंग्लंडच्या एका कंपनीची मदत घ्यावी लागते. जणूं कांहीं घोड्याची जात हिंदुस्थानांत फक्त चित्राच्या सहाय्यानंच समजली जाते ! मास्तर—ही शुद्ध कारवाई आहे—मास्तर, हे भिकेचे डोहाळे आहेत. मुलांच्या शिक्षणाकरितां होत असणारा खर्च त्याच्या हयातींत तरी वसूल होतो कीं नाहीं याची शंकाच असते. केवळ सट्टेबाजीच्या तत्त्वावर मुलाच्या नांवानं पैशाची थैली मोकळी करायची. जुगार—केवळ जुगार आहे हा. शर्यतीच्या सुरुवातीपासून शेवटपर्यंत आपण हाय हाय करीत घोड्याच्या मानेवर लक्ष ठेवायचं, आणि शेवटीं दुसराच घोडा आयत्या वेळीं लांब कान करून जिंकून जातो. मास्तर—केवळ नाइलाज म्हणून—जनरूढि तोडवत नाहीं म्हणून मी ह्या जुगाराला हातभार लावणार आहें. पण डोळे उघडे ठेवून मी या व्यसनांत पडणार आहें. याचा शेवट मला आज दिसतो आहे. पोराकरतां पैसे पाहिजेत म्हणून पोटाला आपण चिमटा घ्यायचा आणि त्याच पोटावर त्या पोरानं लाथ मारावी, हेंच तुमच्या शिक्षणाचं ध्येय. हेंच तुमच्या शिक्षणाचं कार्य !"

इत्यादि लांबलचक पल्लेदार भाषणाच्या शेवटीं बाबांनीं एकवार समोरच्या घोड्याकडे तुच्छतेनें पाहिलें.

सर्व बाजूंनीं कोंडून टाकलेला जीव जसा धडपड करतो त्याप्रमाणें बाबांनीं चालवलें होतें. प्रचलित शिक्षणपद्धतीवर बाबांनीं ओढलेले कोरडे सर्वथैव अनाठायीं होते असें आज माझें मुळींच मत नाहीं. शिक्षणाच्या एकांगीपणाचा दोष म्हणा अगर परिस्थितीच अशी चमत्कारिक आली आहे म्हणून म्हणा—आजचें शिक्षण खरोखरीच आंधळ्यांच्या मालिकेप्रमाणें ठिकठिकाणीं गोते खात दैवावर हवाला ठेवून चाललें आहे यांत तिळमात्र शंका नाहीं. शिक्षणक्रम पुरा करून बाहेर पडलेल्या तरुणाला कोरडा उपदेश मात्र भरपूर मिळतो. पोटाकरितां शिक्षण नाहीं, तर ज्ञानाकरितां शिक्षण आहे इत्यादि गुळमुळीत वचनांचा सुळसुळाट दृष्टीस पडतो. आयुष्यामध्यें 'स्वत्व' कायम ठेवण्यास या शिक्षणाचा उपयोग होतो असें सांगण्यांत येतें. मोठमोठ्या स्वत्वाच्या तत्त्वाखालीं दडपून टाकण्याचा हा उपक्रम पुढच्या पिढीला कितपत रुचेल हें पहाणें आहे. असलें पोषाखी शिक्षण देण्यापेक्षां चार घण मारायला कां शिकविलें नाहीं आम्हांला, म्हणून प्रश्न करणाऱ्या उद्यांच्या तरुणाला आजचे तरुण काय उत्तर देतील कुणास ठाऊक !

मास्तरांना बाबांचें तत्त्वज्ञान पटलें नाहींसें दिसलें. त्यांनीं हजिरीपट काढला. "नांव काय बाळ तुझं—" म्हणून मास्तरांनीं प्रश्न केला. बाबांनीं उत्तर दिलें.

बाबा निघून गेल्यावर मास्तरांनीं मला बरीच माहिती विचारली. आणि मीं ती मोकळ्या मनानें सांगितली.

शाळेंतला पहिला दिवस माझा सुखाचा गेला. कदाचित् नवीनपणाकरितां सदोदित हपापलेल्या माझ्या मनाला पहिल्या दिवशीं शाळेच्या खडतर आणि कंटाळवाण्या आयुष्याची त्या दिवशीं कल्पना आली नसावी. बरोबरच्या मुलांबरोबर खेळीमेळीनें राहून मी तो दिवस मोठ्या आनंदानें घालवला. आम्ही सर्व लहान मुलें असून एकमेकांशीं अगदीं परिचयाच्या नात्यानें बोलत होतों. मी स्वतः कांहींच बोलत नव्हतों. मी फक्त लोकांचें

बोलणें ऐकण्याचें काम करीत होतों. आमच्या मजलशींना जर थोडाबहुत रंग आलाच, तर डाव्या हातानें दाढीभोंवतीं प्रेमानें कुरवाळीत उजव्या हातानें हातांतला रूळ टेबलावर आपटीत मास्तर मोठ्यानें ओरडत, " काय दंगा चालला आहे रे ? " म्हणून मास्तर प्रश्न विचारीत.

" आम्ही दंगा करीत नाहीं—अभ्यास करतों आहोंत, मास्तर." म्हणून एखादा धीट मुलगा उत्तर करी.

खोटें बोलण्याचें मुलांना कांहींच वाटत नव्हतें. उलटपक्षीं मास्तरांशीं खरें बोलणें हेंच पाप आहे असाच मुलांचा ग्रह होता कीं काय देव जाणे. मोठी विचार करण्यासारखी गोष्ट आहे, इतक्या लहान वयांत यांना खोटें बोलायला शिकवतें तरी कोण ? पाणी पिण्याचें निमित्त करून बाहेर जाऊन खेळत बसणें, पुस्तकाचें निमित्त करून चारचौघांनीं एके ठिकाणीं जमून कांहीं तरी विषयावर गप्पा छाटीत उभें रहाणें, इत्यादि, इत्यादि गोष्टी म्हणजे लहान मुलांचा हातचा मळ असतो. पुढील खोटेपणाच्या आयुष्याचा पाया लहानपणीं शिशुवर्गांत रचला जातो.

मी घरीं गेलों तों शान्तामामी मला अडवूं लागली.

" पाहूं ! पाहूं ! पाहूं बाळाचं तोंड ! मास्तरांनीं किती चापटपोळ्या दिल्या ? दिग्विजय लावून येणाऱ्या माझ्या लाडक्या भाच्या, नीरांजन घेऊन तुला ओवाळूं का ? "

मी शान्तामामीला दूर ढकलण्याचा प्रयत्न करूं लागलों.

" मी मामांना सांगेन हं. तूं मला चिडवतेस. तूं बोलूं नकोस माझ्याशीं." मी म्हणालों.

" मी तुला चिवडतें ? पाहूं कसं चिवडतात तें ! " म्हणून शान्तामामीनें माझ्या अंगाला गुदगुल्या करण्यास सुरुवात केली. मी गडबडां लोळायला सुरुवात केली.

" वहिवाटीचा उकिरडा चुकून आज हें जनावर घरांत आलं का ? काठीनं त्याला मार्ग दाखीव." म्हणून म्हणत मामांनीं बाहेर येऊन मला उठवून उभें केलें.

" आज शाळेंत काय काय शिकला ? " मामांनीं मला विचारलें.

" मी सांगतें—" म्हणून शान्तामामी मध्येंच म्हणाली. मामांनीं तिला मध्येंच थांबविलें.

" नको, तेवढे कष्ट घेऊं नकोस. सदू, बायकांनीं भलत्या गोष्टींत ' मी सांगतें ' म्हणून पुरुषांना संकटांत घालूं नये असं माझं प्रामाणिक मत आहे. " मामांनीं मला उद्देशून म्हटलें होतें तरी शान्तामामीला बोलण्याचा रोंख कोणीकडे आहे इतकें न समजण्याजोगें नव्हतें.

" प्रामाणिक मत—! माझं प्रामाणिक मत आहे ! बाई बाई, प्रामाणिक मत आहे ! " म्हणून दर वाक्यागणिक मानेच्या बदलत्या हिसक्याबरोबर ताल धरीत, शान्तामामी आंतल्या बाजूस पळून गेली. मी नुसताच तिच्या मानेकडे पहात होतों. ती घरांत गेल्याबरोबर मी स्वतःशींच त्या अभिनयाची पुनरावृत्ति करूं लागलों. मामांनीं एकवार हंसून मला आंत नेलें.

लहानपणापासून मला रात्रीं विचार करण्याची खोड लागून राहिलेली आहे. दुसऱ्या लोकांच्या निद्रासंगीताच्या हेलकाव्यांबरहुकूम माझे विचार रंगत जातात. त्या दिवशीं मी तसाच एकंदर दिवसाच्या घडामोडींविषयीं विचार करीत होतों.

बन्याची आणि माझी शाळा एकच होती. दुपारच्या सुट्टींत इकडे तिकडे फिरतांना मी सहजच त्याला ' बन्या ' म्हणून हांक मारली होती. त्या वेळेला माझ्याकडे पाहून सगळीं मुलें मोठ्यानें हंसलीं. त्यांना हंसण्याजोगें मी काय केलें होतें ? आणि बन्या तरी इतका कां रागावला ? कीं घरची ओळख दाखवण्यांत माझ्याकडून कांहीं चूक झाली होती ? बन्यानें रागानें माझ्याकडे पाहिलें आणि म्हटलें, " मला ' बन्या ' म्हणूं नकोस. माझं नांव ' कुलकर्णी ' आहे. पुन्हां बन्या म्हणालास तर मग बघ आपला विचार." मला त्या वेळेस आश्चर्यच वाटलें. ' बन्या ' म्हणून म्हटल्यानें त्याची अपकीर्ति होण्याचा काय संभव होता ? कीं इतर लोकांप्रमाणें बन्यालाहि लोकांनीं चांगलें चांगलें म्हणावें म्हणून वाटत होतें ? पण त्यांत मी काय केलें ?

लोकांच्या डोळ्यांत धूळ पसरून मानमान्यतेचा बुडबुडा आपल्या अंगाभोंवतीं पसरविण्याकरतां अहर्निश तळमळणारा तरुणपणचा बन्या, लहानपणीं मला बन्या म्हणूं नकोस या वाक्यानें आपल्या स्वभावाची बारीकशी चुणूक दाखवीत होता हें मला पुढें कळून आलें.

---

# प्रकरण ६ वें

---

## मामीचें प्रयाण

सुमारें एक वर्षाच्या परिचयानंतर मी विद्यादेवीच्या शेजाराचा कंटाळा करूं लागलों. 'माणसाला शिकून मिळतें तरी काय' ह्या गंभीर प्रश्नाची लहानशी संक्षिप्त आवृत्ति म्हणून मी मनाशींच पुटपुटूं लागलों कीं 'कशाला शिकायचं?' बन्याचे आणि माझे अलीकडे अलीकडे या शिक्षणाच्या विषयावर वाद निघूं लागले.

"बन्या, मला रोज रोज शाळेंत जाण्याचा कंटाळा येतो. सबंध दिवस मास्तरांशीं डोकेंफोड करीत बसायचं—. मास्तरसुद्धां कंटाळतात; पण कंटाळा घालवण्याकरतां म्हणून त्यांना एखाद्या मुलाच्या राशीला लागतां येतं तसं आपण काय करणार? ह्या घंटेपासून त्या घंटेपर्यंत माशांचं घोंघावणं ऐकण्याशिवाय दुसरा कांहींच मार्ग नाहीं."

मी बसायची जागा ठरवून टाकली होती. उशीरा येवो, लौकर येवो मी आपली जागा कधींच सोडीत नसें. जागा अगदीं कोंपऱ्यांतली असल्याकारणानें तिच्याविषयीं भांडाभांडी होण्याचें कांहींच कारण नव्हतें. त्या जागेवर माझें इतकें प्रेम बसण्याचें एक कारण म्हणजे इतर लोकांप्रमाणें माझेहि जगांत वागण्याचे कांहीं ठराविक नियम होते. त्या नियमांतील पहिला भाग हा होता कीं, शक्य तोंवर अधिकारीजनांपासून दूर

रहावें. मनुष्याच्या चेहरेपट्टीबरोबर त्याच्या स्वभावाचें वर्णनहि जन्माचें देण्यांत आलें असतें तर पुष्कळशी कटकट नाहींशी झाली असती. वरून दिसायला किती मनुष्य शिष्ट दिसला तरी संगतीला इष्ट आहे कीं नाहीं हें कांहीं अजमावतां येत नाहीं. तेव्हां विंचवानें फटका मारल्यावर मग ओरडायचें 'अरे हें झुरळ नाहीं. विंचू आहे हा—' त्यापेक्षां दुरूनच कुलदेवतेला करतों त्याप्रमाणें नमस्कार करून आपलें फटकून रहावें हें चांगलें. मास्तर वरून दिसायला गरीब गोगलगाय असले तरी आयत्या वेळीं पोटांतले पाय बाहेर निघतील त्याची काय वाट ? मास्तरांनीं हातांतला रूळ आपटल्याशिवाय मी त्यांच्या निमंत्रणाचा कधींच स्वीकार करीत नसें.

दुसरेंहि एक कारण होतें. समोरच एक पाण्याचा हौद होता. त्यावर दुपारचे प्रहरीं कांहीं मराठमोळा कुटुंबें सहपरिवार येऊन वनभोजन (शहरभोजन) करीत. सकाळची मंडई वगैरे उरकून परगांवचे गाडीवान वगैरे लोक दुपारीं भाकऱ्या खाण्यास त्या जागीं येत असत. मला आपल्या जागेवरून सर्व कांहीं स्पष्ट दिसत असे. पुरुषाच्या पाठीवर आसूड, कांखोटींत मुंडासें आणि हातामध्यें भाकरींच्या चवडींचीं गांठोडीं. पाठोपाठ अस्तुरी आणि तिचा पसारा. एवढ्या थोरल्या मुलानें असें आईच्या कडेवर बसावें ? अन् त्या मुलाला शाळा नाहीं का ? जरा वेळानें हस्तपादप्रक्षालन उरकल्यानंतर जवळच्या झाडून साफ केलेल्या जागेवर मंडळी स्थानापन्न होई. आणि ज्या वेळेस आमचे इकडे दोन आणि दोन किती ? म्हणून चालत असे त्या वेळेस बाहेरच्या बाजूस हौदाशेजारीं भाकरी खात असलेल्या मंडळींत 'आन् त्ये रास्त्याच्या रामाशेजारीं इठू गवसला. आन् मंग काय इचारतां—मंग त्येला मी म्हंगालों—' इत्यादि इत्यादि चालत असे. मला त्यांचा हेवा वाटे. एक वेळ असेंहि वाटत असे कीं, त्यांच्या त्या सांखळ्या घातलेल्या मुलाला फसवून आपल्या जागीं बसवावें, आणि आपण 'आन् त्ये——' म्हणणाराच्याबरोबर निघून जावें.

आमच्या घरांत कोण त्रास ? पाट घे रे, पाणी घे रे; जेवतांना फार बोलूं नये; उभें राहून पाणी पिऊं नये—माती न् मसण. ह्या लोकांचा हा फिरता संसार पाहून मला फार मौज वाटे. आणि एक दिवस जरी बाबा नि आई

असें आमच्या शाळेच्या नळावर येऊन जेवलीं तर काय बहार होईल, हाहि विचार मनांत आला. मला वाटतें, शाळेच्या उद्‌घाटनसमारंभाला आगंतुक या नात्यानें हजर असलेल्या आमच्या शाळेच्या निनांवी कुत्र्याला आमची कींव येत असावी. त्याची स्वतःची स्थिति किती गंमतीदार होती पहा. शाळेमध्यें रहायचें, पण शाळेंतील एकाहि भानगडींत चुकूनसुद्धां सांपडायचें नाहीं—म्हणजे पाण्यामध्यें राहून माशांशीं वैर साधतां येतें तें असें. दुपारच्या प्रहरीं हौदावर आलेल्या संसारीजनांकडून आपल्या पोटापाण्याची सोय लावून घ्यायची, आणि तदनंतर जणूं शाळेंतल्या मुलांना खिजवण्याकरितांच कीं काय संध्याकाळीं शाळा सुटेतोंपर्यंत मुद्दाम तंगड्या पसरून तणावून द्यायची, हेंच त्या कुत्र्याचें आयुष्यांतील ध्येय होतें. मध्यंतरीं जर करतां जागरूक रहाण्याची आपत्ति ओढवलीच तर एखाद्या त्रस्त महायोग्याप्रमाणें भारावलेल्या डोळ्यांनीं पूर्वपश्चिम आणि दक्षिणोत्तर प्रदेशाकडे एकवार पहावयाचें, हातपायादि अवयवांची सुरक्षितता पारखून पहायची आणि पुन्हां स्वीकृत कार्यांत अडथळा उपयोगी नाहीं अशा भावनेनें झोपीं जायचें. हीच आशा—हीच त्याची आकांक्षा—आणि हीच त्याची महत्त्वाकांक्षा.

पण मला त्याच्याविषयीं आपलेपणा वाटत असे. काय त्याचें आयुष्य वाईट होतें ? स्वातंत्र्याची तळमळ लागण्यास तो पारतंत्र्यांत मुळींच नव्हता. मीं जर एखादी गोष्ट करीन म्हटलें तर माझ्या मार्गांत किती तरी अडचणी होत्या. त्याला नुसतें वाटायचा अवकाश कीं तो मुकाट्यानें कुणा तरी मावळप्रान्तस्थाबरोबर चालता झाला असता.

सुधारलेल्या जातींत जन्माला येणें म्हणजे आपण होऊन आपल्याभोंवतीं लक्ष्मणाची रेघ ओढून घेणें होय, हें तत्त्व मला ह्याच वेळीं पटलें. मुलांची अदलाबदल केली तरी माझ्या सोंगाची बतावणी त्या सोंगाला कशी करतां येणार ? ‘आन् त्ये’ म्हणून भरमसाट व्याख्यानें देत सुटणाऱ्या त्या मुलाला आई तात्काळ शोधून काढील. आणि इकडे मला कोरडी भाकरी खाणें बिलकूल ठाऊक नसल्यानें उपाशीं मरण्याची पाळी येईल. आम्ही जरी वैष्णव पंथाचे नसलों तरी कांदा वगैरे भाजीच्या जातींशीं माझें हाडवैर

होतें. आणि माझा मावळप्रान्ती पालक मला एक दिवस कांद्याशिवाय राहूं देणार नाहीं. इत्यादि साधकबाधक प्रमाणें पाहून मी मनाशीं ठरवून टाकलें कीं आतांच गडबड करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. बाबा शाळेंत घालायला तयार नव्हते तर मी आपण होऊनच त्यांना भाग पाडलें. दोष माझा होता. आतां यापुढें मोठे होईतोंपर्यंत--पैसे मिळवतां येतील इतकें शिकेतोंपर्यंत--सकाळीं, दुपारीं, संध्याकाळीं--तिन्ही त्रिकाळीं—अभ्यास, शाळा; शाळा, अभ्यास; अभ्यास आणि शाळा !

मास्तरांचे प्रश्न तरी किती विचित्र असत!—

" तूं कोंपऱ्यांतला मुलगा—सदू ! देवा, ऊठ ! देवासारखा हात जोडून बसायला आला आहेस का शाळेंत ? ऊठ ! कोटाच्या गुंड्या घाल. अन् पुन्हां फाटक्या विजारीनं शाळेंत आलास तर फळ्याच्या ह्या घोड्याला उलटा टांगीन बघ."

माझ्या डोक्यांत तिसरेच विचार घोळत होते. माझ्या कोटाशीं मास्तरांना काय करायचें होतें ? फाटकी विजार घातली तर मास्तरांना कां वाईट वाटावें ? कांहीं ह्यांची विजार मी फाडायला गेलों नव्हतों. विजार माझी आहे, मी काय वाटेल तें करीन. अन् उठायचा कोण त्रास हा ? बसून उत्तर दिलें तर काय हरकत आहे ? घरांत मी नाहीं का मामांना निजून उत्तरें देत ? मामा कधींच मला असें बोलत नाहींत. काय मास्तर आहे पहा !

" अजून तुला शाळा म्हणजे घरच वाटतं आहे नाहीं रे ? असा पुढं ये. बांकाला टेंकून उभा राहूं नकोस. टोपी घमेल्यासारखी घालूं नकोस--"

मी रागारागानें डोक्यावर एक दणका ठेवून दिला, त्यासरशी टोपी डोक्याला पुरून नाकालासुद्धां शिवूं लागली. मुलांनीं हंसून माझ्या कृतीचें अभिनंदन केलें.

" समज—तुला मी बाजारांत धाडला आंबे आणायला. मंडईतला मनुष्य पैशाला चार आंबे देतो. तूं एक पैसा दिलास कीं तो तुला चार आंबे देईल. तुझ्याजवळ मीं चार पैसे दिले आहेत; तर तूं किती आणून देशील आंबे मला ? "

आजपर्यंत कधींहि न ऐकलेलें उत्तर मास्तरांना ऐकविण्याचें माझ्या मनांत आलें होतें.

'समज, तुला बाजारांत धाडला' म्हणे. मग बाबांना काय पुन्हां शाळेंत घालायचें का ?

'किती आंबे आणून देशील' काय ? सगळे खाऊन टाकीन. एकहि परत आणणार नाहीं. तुम्ही कोण मला बाजारांत धाडणार ? मी कांहीं तुमचा गडी नाहीं !

पण या उत्तराऐवजीं मीं 'मला माहीत नाहीं' इतकेंच तुटक उत्तर केलें. मास्तरांनीं तोंडानें चक् चक् करीत माझ्या बुद्धीचें कौतुक केलें.

" अरे—एक पैसा दिलास, त्याचे चार आंबे. दुसरा दिलास, त्याचे हे चार आंबे—किती झाल्या ह्या गोष्या ? "

मी कांहींच उत्तर न करतां मुकाट्यानें खालीं बसलों. हें जर शिक्षण असेल तर बाकीचे लोक कसे शिकतात त्यांचें त्यांनाच ठाऊक. आंब्याचे दर, पेरूचे दर माझ्या आटोक्याबाहेरचे होते. आणि अशा वेळीं मास्तर तर हात धुवून पाठीस लागल्याप्रमाणें करीत. मास्तर उठून उभे रहातांच मी पुन्हां उभा राहिलों.

" अरे तुला बसायला काय झालं ? प्रश्नाचं उत्तर देतां आलं नाहीं तर सबंध रात्रभर इथं रहावं लागेल अं ! बोल, ह्या किती झाल्या गोष्या ? "

मुलामुलांमधील सहानुभूति माझ्या मदतीस धांवून आली.

" सोळा म्हणून सांग—" मला जवळच्या मुलानें तोंडीं तार ठोकली.

मीं उत्तर बरोबर दिलें पण मास्तरांना आमची करामत समजली. मुलगा शोधून काढून मास्तरांनीं त्याला बांकावर उभा रहाण्याची शिक्षा ठोठावली. पहिल्या वेळींच शिक्षा ऐकण्याचा प्रसंग आलेला मनुष्य लाजेनें मेल्याहून मेल्यासारखा होतो, पण इतकी सौम्य शिक्षा ऐकण्याची ही पहिलीच वेळ असेल त्या गृहस्थाला काय वाटत असावें हें मला उदाहरणानें पटलें. मलाहि गुन्ह्याला हातभार लावणारा ( abettor ) ह्या तत्त्वावर बांकावर उभें रहाण्याची शिक्षा झाली. माझी ही प्रथमच फेरी असल्यामुळें मी रडत रडत बांकावर खालीं मान घालून उभा राहिलों.

पण माझा सहाय्यकर्ता कांहीं असा डगमगणारा, कच्च्या दिलाचा वीर नव्हता. 'असे कित्येक वाटेला लावले आहेत मी--' म्हणून तो आम्हांस खासगींत माहिती पुरवीत असे. सदरहु बाळानें, त्याच्या हिशोबाप्रमाणें पाहिलें तर १८५० सालीं शाळेंत नांव घातलें असावें, असा साहजिकच तर्क होई. हिंदुस्थानांतील कोणत्याहि शहरांतील आणि खेडेगांवांतील शाळा याच्या तडाख्यांतून सुटल्या नव्हत्या. दुपारच्या दहा मिनिटांच्या सुट्टींत आम्ही त्याच्या पराक्रमाचें कौतुक करीत, तोंडांत नाहीं तर खिशांत हात घालून उभे रहात असूं. साहसप्रेम ( खोड्या करण्याची खुमखुमी ) हें त्याचें वैशिष्ट्य होतें. मास्तरांच्या घरची त्याला खडान्खडा माहिती असे. कौन्सिलांत शिरून सरकारची सनदशीर पद्धतीनें अडवणूक करायची कशी हें तत्त्व त्याला लहानपणींच पटलें असावें. मास्तरांचा मार खायचा—पण मास्तरांशीं सहकारिता मात्र कायम ठेवायची. कॅटलॉग-वर पद्धतशीर रीतीनें शाई सांडून मास्तरांना दुप्पट त्रास देण्यांत त्याला अपरिमित आनंद होई.

आज मास्तरांनीं शिक्षा सुनावतांच हा मुकाट्यानें गंभीर चेहरा करून उभा राहिला.

" बांकावर उभं रहायला सांगितलं आहे तुला ! " मास्तर ओरडून म्हणाले.

" तें मीं ऐकलं, मास्तर. पण--कां ? मीं काय केलं ? कशाला बांका-वर उभा राहूं ? " जणूं काय 'अरे, जगांत न्यायच नाहीं काय ?' अशा मुद्रेनें तो मास्तरांना विचारीत होता.

" पुन्हां वर तुझी ही वटवट ? मी सांगतों म्हणून उभा रहा ! " मास्तर चिडून म्हणाले.

" मीं काय वटवट केली ? मास्तर, मीं कांहीं केलं नाहीं. मीं उभा रहात नाहीं. तुम्ही मला मारा पाहिजे तर--मी हेडमास्तरांना जाऊन सांगेन. मी घरीं माझ्या वडिलांना सांगेन. अन् मी पुन्हां कधींसुद्धां शाळेंत येणार नाहीं. " मास्तरांनाच उलट निकालावर निकाल ऐकवीत स्वारी जाग्यावर बसली.

" तूं उभा रहातोस कीं नाहीं रे ? का मी येऊं तिथं ? " मास्तर शान्तपणें म्हणाले.

बराच वेळ विचार केल्यानंतर स्वारी उठून उभी राहिली. झोंपेंतून उठलेल्या माणसाप्रमाणें अंग झटकून टाकलं आणि " काय बुवा त्रास ! कांहींहि केलं नाहीं तरी म्हणे उभे रहा. " म्हणून तोंडानें पुटपुटत एकदांचे रावसाहेब बांकावर उभे राहिले. पण पुन्हां काय अडलें कुणास ठाऊक; कांहीं तरी आठवल्यासारखी मुद्रा करून तो सावकाश खालीं उतरला.

" मास्तर, घरांत वडिलांनीं सांगितलं आहे कीं शाळेमध्यें पायांतल्या वहाणा काढूं नकोस. मला वहाणा हरवण्याची खोड आहे म्हणून त्यांनीं मला बजावलेलं आहे. आणि वहाणा काढून उभं नाहीं राहिलं तर तुम्ही रागावतां—" इतकें बोलून तो मास्तरांच्या निकालाची वाट पहात राहिला.

मास्तरांनीं मुकाट्यानें स्थानत्याग केला आणि—!

मला शाळेचा वीट येण्यास हें दृश्य कारणीभूत झालें. लहान लहान बालकांच्या स्वभावाचें ज्ञान करून घेण्याचा बिलकुल प्रयत्न न करतां एखाद्या क्षुल्लकशा अपराधाकरतां बांकाखालीं मुंडकें जाईपर्यंत ठोकून मोकळें करायचें हें शिक्षण. मास्तर हा मनुष्य आहे. इतर मनुष्यजातीप्रमाणें मास्तरालाही मानापमानाची चाड असते हें मला कबूल आहे. पण मुलानें अपमान केला कीं सूडाच्या भावनेनें प्रेरित होऊन त्याला होता कीं नव्हतासें करून टाकणें माणुसकीला धरून नाहीं. या बाबतींत मास्तरांच्या जातबिद्दल माझें मन फारच कलुषित आहे. लहान मुलांची आवडनिवड पाहून त्यांना प्रेमानें, गोडीगुलाबीनें वळवून घेऊन आपल्या म्हणण्याप्रमाणें करण्यास लावावयाचें तें सोडून देऊन 'मरेनात कां कार्टीं—मला काय त्यांच्याशीं करायचं आहे' ही वृत्ति केव्हांहि अश्लाघ्यच ठरेल. घरच्या लोकांची मुलाशीं वागण्याची सर्वसाधारण वृत्ति माझ्या उदाहरणावरून कळून येण्यासारखी आहे. पोरगें दिसलें रे दिसलें कीं साप भेटल्याप्रमाणें काठी घेऊन धांवायचें हा एक पालकांचा प्रकार आहे. नाहीं तर दुसरा बन्याच्या पालकांचा. पोर म्हणजे थोरांहून

थोर--तो करील तें प्रमाण. ‘मला च्यांगला शडा डे कीं ग’ ही भाषा बन्याच्या तोंडून मीं हजारों वेळां ऐकली असेल. या पाद्री पद्धतीच्या भाषेचें त्याच्या मातापितरांना कौतुक वाटत असेल पण मला राग येई. घरीं ही मुलांची दशा--आणि शाळेंत ती दशा!

त्या मुलाचे होत असलेले हाल पाहून माझ्या अंगाला दरदरून घाम सुटला. माझ्या पायांवर मला धडपणें उभेंसुद्धां रहातां येईना. मास्तरांची दहशत मनांत नसती तर मी सपशेल भुईवर पालथा पडून मोठमोठ्यानें रडलों असतों. आतां ह्याचा परिणाम काय होणार हें कांहीं मला नीटसें समजेना. एक वेडा विचार डोक्यांत येऊन गेला कीं मास्तर त्या मुलाला ठार मारतील का? अन् मग मी काय करूं? माझ्या जिवांत जीव आला. मास्तरांचा विचार त्याला ठार मारण्याचा नव्हतासें दिसलें. मास्तरांनीं आपल्या अपमानाचें उट्टें काढण्याचें समाधान करून घेतलें खरें, पण माझ्या हृदयाला केवढी थोरली जखम केली होती त्याची त्यांना कल्पना येणें शक्य नाहीं. माणुसकी माणुसकी म्हणून आपण गप्पा मारतों, उदार हृदयाची थोरवी गातों, प्रेमाच्या आणि शान्तीच्या लंब्या लंब्या गप्पा मारतों—पण थोडेंसें मनाविरुद्ध झालें कीं एकमेकांच्या नरडीचा घोट घेण्याकरितां एखाद्या रानटी, क्रूर जनावराप्रमाणें एकमेकांवर तुटून पडतों. प्रसंगीं मनुष्य किती कठोर अंतःकरणाचा, दगडासारख्या वृत्तीचा होतो हें मला कळून आलें. त्या मुलाची चूक माझ्या दृष्टीसमोर होती, पण शिक्षेचें रूप इतकें भयंकर होतें कीं त्या चुकीचें मला कांहींच वाटलें नाहीं. मनांतल्या मनांत मी मास्तरांना शत्रु समजूं लागलों. मास्तरांनीं आज या मुलाचा कांटा काढला, उद्यां आपल्यावर तीच पाळी कशावरून येणार नाहीं, या विचारानें मला सतावून सोडलें. माणसाच्या माणुसकीवरचा माझा विश्वास पार उडाला.

शाळा सुटण्याच्या सुमारास मी त्या मुलाकडे पाहिलें, तों मला आश्चर्यच वाटलें—मास्तरांशीं गप्पा मारण्यांत तो चूर होता! दोन तासांपूर्वीं अगदीं जिवावर उठलेल्या कसाबाप्रमाणें कृती करणाऱ्या मास्तरांशीं हा इतक्या सलोख्यानें बोलतो तरी कसा हें एक मला गूढच होतें.

त्यांचें बोलणें संपल्यानंतर मी त्या मुलाच्या जवळ जाऊन उभा राहिलों.

" अंः ! त्यांत काय आहे ! मास्तरांनीं मुलांना मारायचं नाहीं तर करायचं तरी काय ! " ह्या शब्दांनीं त्यानें माझी बोळवण केली. मनुष्य-जातीच्या विचित्र स्वभावाचें आश्चर्य करीत मी घरचा रस्ता धरला.

घरीं गेल्यावर पहिली वार्ता कानीं पडल्याबरोबर मला कसेंसेंच झालें.

" अहो सदुभाऊ, आम्ही आपल्या घरीं जाणार उद्यां. काय करतां ! तुम्हांला आमचा कंटाळा आला. आम्ही पुण्याला आलों तुमच्याकरितां अन् तुम्ही आपले आमचा त्रास नको म्हणून शाळेंत जाऊन बसायला लागलांत. आतां तुम्ही हाताला धरून बाहेर काढण्यापेक्षां आपण होऊनच बाहेरचा रस्ता धरावा हें चांगलं. " म्हणून शान्तामामी हंसत हंसत म्हणाली.

" पण मामी, तूं आणखी रहाण्याचं कबूल केलंस तर मी उद्यां-पासून शाळेंत जाणार नाहीं. " मी म्हणालों.

" मग काय घरीं बसून भाकऱ्या भाजणार ? एखाद्या नकट्या साळु-बाईप्रमाणं पहांटे उठून केरपोतेरं करणार ? "

मीं कांहींच उत्तर केलें नाहीं. शान्तामामी होती तोंपर्यंत मला कांहीं तरी करमणूक होती. निदान शान्तामामीकरितां म्हणून मी शाळा सुटल्या-बरोबर तडक घरीं येत असें. पण उद्यां शान्तामामी मुंबईला निघून गेल्या-वर मी काय करणार ? ' मामी—मामी ' करून तिच्याशीं इकडच्या तिक-डच्या गोष्टी बोलत मी झोंप आली म्हणजे तसाच तिच्या बाजेवर निजत असें. उद्यांपासून बाबांचें सगळें उरकेपर्यंत मला दिव्याशींच पेंगत बसावें लागणार, नाहीं तर जमिनीवरच पडावें लागणार. शान्तामामी होती म्हणून मला बराचसा मार चुकवतां येत असे. पूर्वींच्या काळीं मराठे सरदार ज्याप्रमाणें किल्ल्याभोंवतीं उंच उंच तट बांधून आपल्या सुरक्षिततेची तयारी करीत त्याप्रमाणें मी शान्तामामीचा त्या तटाप्रमाणें उपयोग करीत असें. बायकांच्या पाठीमागें दडण्याची कल्पना कांहींजणांना पटणार नाहीं हें मी जाणून आहें; पण आयुष्यामध्यें कांहीं वेळा तरी अशा येतात कीं त्या वेळीं स्त्री हें एक अमूल्य शस्त्र वाटतें. निदान मला वाटतें, आपल्याला

नको असलेल्या मित्रांना न भेटतां परत धाडायला स्त्री हें एक अजब अस्त्र आहे हें कोणीहि कबूल करील.

सांगायचा मुद्दा हा कीं, शान्तामामी मुंबईला निघून गेल्यावर मी आयताच शत्रूंच्या हातीं सांपडणार होतों. इतर मुलांना आईच्या पाठीमागें दडण्याची सोय असते. पण माझ्या बाबतींत आईच्या पाठीमागें दडणें आणि एखाद्या भुकेलेल्या वाघापाठीमागें दडणें यांत फारशी तफावत नव्हती. शान्तामामीनें माझा विचार ताडला असावा. मला प्रेमानें जवळ ओढून घेत ती म्हणाली,

" सदू, तुझा माझा फारसा संबंध नसतांना देवानं तुला माझ्यावर माया करायला शिकवलं. त्याच देवानं मला तुला जीव कीं प्राण करायला शिकवलं. मी आतां जातें म्हणतांच तुला वाईट वाटायला लागलं—अन् मलासुद्धां बघ कसं पोटांत तोडल्याप्रमाणं होतं आहे. पण ह्या गोष्टी आपल्या हातच्या का आहेत ? पुष्कळ तुला न् मला वाटतं, पण उपयोग काय ? देव ठेवील तसं नको का रहायला ? वेड्यासारखं रडून काय होणार ? मी लौकर परत येईन. तुझ्यासाठीं म्हणून तरी माझा सगळा जीव इकडे लागून राहील. जशी मला सुलोचना, तसाच तूंहि मला आहेस. पुढल्या खेपेला मी आलें म्हणजे मग तूं मोठा होशील—अगदीं मला ओळखूंसुद्धां यायचा नाहींस. अन् मग तूं इंग्रजींत माझ्याशीं बोलूं लागशील. पण मला कुठं इंग्रजी येतं आहे ? माझ्याशीं तरी तूं आपला मराठींत बोलशील ना ? केव्हांहि माझ्याशीं बोलायचं, आपल्या आवडत्या मामीशीं दोन गोष्टी करायच्या तें अगदीं शुद्ध मराठी भाषेंतच बोलायला नको का ? पूस ते डोळे—नाहीं तर मी रागवेन हं—"म्हणून म्हणत शान्तामामीनें पदरानें माझे डोळे पुसले आणि त्याच पदरानें स्वतःचेहि डोळे पुसले. माझ्या रडण्यानें शान्तामामीला वाईट वाटत असावें व म्हणून तीहि रडत असावी, ह्या विचारानें मीं तोंड दाबून धरलें तरी हृदयानें मोकळें करून दिलेल्या वाटेला ही अडवणूक कशी बांधूं शकणार ? मी शान्तामामीच्या मांडीवर डोकें ठेवून मुक्तकंठानें रडूं लागलों.

एरवीं जर शान्तामामीनें मला तसें धरून ठेवलें असतें तर मी तिचा

निषेध केला असता. पण आज शान्तामामीनें माझें डोकें दोन हातांनीं धरून माझ्या गालांवरचे अश्रू आपल्या गालांवर ओढून घेतले तरी मी बोललों नाहीं.

" सदू, तूं लहान होतास–तुला समजत नव्हतं त्या वेळेस, मला कित्ती वाटत होतं कीं तूं माझ्याजवळ येऊन असं मला धरून बसावंस. पण त्या वेळीं तुला माझा रागच येत असे; मी जवळ आलें कीं तूं एकदम रडायला लागत असस. पण आतां तुला समजायला लागलं अन्—" म्हणून अर्ध-वट पुटपुटत तिनें पुन्हां माझ्या डोक्यावर आपलें डोकें टेंकविलें. इतक्या लहानपणीं मला शान्तामामीच्या रूपाची कल्पना असणें मुळींच शक्य नव्हतें. तरी पण तिच्याविषयीं एकंदर ग्रह माझा फार चांगला होता हें मला नक्की आठवतें. आईच्या तोंडापेक्षां शान्तामामीच्या तोंडाचें मला त्या वेळींसुद्धां कौतुक वाटे हें अजून मला आठवतें आहे. अर्थात् जास्ती मला वाटण्याचें कारण शान्तामामीचा गोड स्वभाव हेंच होय. मी तसाच किती वेळ तेथें होतों मला आठवत नाहीं.

" हा कोण ? सदू का ? बाई ! शर्थ झाली ह्याच्या नादीपणापुढं. कोट-टोपीसुध्दां काढून ठेवण्याचं याला सुचलं नाहीं वाटतं ? अग, कसलं आलं आहे ? नादी आहे तो. एक तर एकच धरून बसतो. जा रे बाहेर; कपडे-बिपडे तसेच घालून मिरवायला तूं काय नवरदेव आहेस का ?" म्हणून म्हणत आईनें मला बाहेर ढकललें. मी बाहेर बसलेल्या मामांच्याकडे पाहिलेंसुद्धां नाहीं.

जरा वेळानें मामी बाहेर आली. मामांनीं सामानाकडे बोट दाखविलें.

" म्हणजे ? इतका वेळ बसायचं तें भरून नसतं का झालं सामान ?" मामी म्हणाली.

" सामान वाहाण्याचं काम माझं आहे; भरण्याचं नाहीं. तें तूं करणार. जेणो काम तेनो थाय, बिजा करेसो गोता खाय ! मी भरलं सामान, धरून चल कीं मीं माझ्या मनाप्रमाणं भरलं सामान. अन् तुझ्या मनाची काय वाट ? सामानाप्रमाणं तुझं मनहि मला दाबून ठेवतां आलं असतं तर गोष्ट निराळी—"

" अगदीं खरंच वाटेल एखाद्याला ! नाहीं तरी पुरुषांना सामानाच्या बांधाबांधींतलं कांहीं कळत नाहीं हें मात्र कबूल करावं लागेल—" मामी ट्रंकेंत सामान भरीत म्हणाली.

" त्याचं असं आहे—पुरुषांना संवय नसते. नवऱ्याला बांधून टाकण्याची बायकांना नेहमींच संवय असल्यामुळं—अहो, जिथं सजीव पदार्थाला बांधून टाकण्याची तयारी तिथं निर्जीव पदार्थांना कोण विचारतो ? थांब, बोलूं नकोस. कळलं मला. माझ्या जिभेवर बृहस्पति बसला आहे हें मी पुष्कळदां ऐकलेलं आहे. आतां नवीन एखादा ग्रह जागा झाला असेल तर बोल—" म्हणून म्हणत मामांनीं सिगारेट बाहेर काढली.

" तो पांढरा ग्रह आहे कीं जागा झालेला. आणखी नवीन कशाला ? " मामी जरा रागानें म्हणाली.

" ग्रह म्हणून तूं कितीहि टिंगल केलीस तरी तुला त्याची काय चव ? रागावूं नकोस, घर माझ्या बहिणीचं आहे. ह्या घरांत मी काय वाटेल तें बोलेन. तुझ्या माहेरी तुझे कायदे. माझ्या माहेरीं माझे कायदे. याला तूं ग्रह म्हणतेस ? ऐक." मामांनीं घसा साफ करून व्याख्यानाची पूर्वतयारी केली.

" मी कांहीं म्हणत नाहीं, अन् कांहीं ऐकत नाहीं. पण हा थिल्लरपणा जरा सोडला तर बरं नाहीं का होणार ! "

" अरे हो ! आतां मी मोठा झालों नाहीं का ? खरंच, विसरलोंच कीं ! चांगलं बजावून सांग मला कीं, एका पोरीचे बाप आतां आहांत तुम्ही—निदान पोरीकडे पाहून तरी—" मामा हंसत म्हणाले.

" इश्श् ! काय हें कांहींच्याबाहींच बोलणं ! हें असं बोलून मिळतं तरी काय ? " मामी म्हणाली.

" तुझी पसंति मिळते हें काय कमी आहे ? बोलूं नको—बोलूं नको. माझं ऐक. आतां पूर्वींचे दिवस गेले. त्या वेळीं पुरुषांनीं एखादा अश्लील शब्द उच्चारला कीं बायका लगेच एक फेरी तुळशीला जास्त घालीत असत. अलीकडच्या मुलींना अश्लील आवडूं लागलं आहे. मी ही पदरची गोष्ट सांगत नाहीं. तुम्ही आणखी कितीहि घाबरल्याचं सोंग आणलंत

तरी, खरं सांगा, तुम्हाला मनापासून हें पटतं कीं नाहीं ? तूं कबूल करणार नाहींस हें मी आधींच सांगतों—" मामा म्हणाले.

" मला मदत करायची आहे कीं नाहीं ? मला हें व्याख्यान नको." मामी मुकाट्यानें म्हणाली.

" हातभार लावायला माझे हात गुंतलेले आहेत म्हणून मी हाताला हात लावण्याच्या ऐवजीं हाताला—" मामा अर्धवटच वाक्य ठेवून मामी-कडे वारक्या नजरेनें पाहूं लागले. मामीनें चटकन् कानांत बोटें घातलीं.

" आतां मात्र अति झालं. माती करण्याची इच्छा नसेल तर कुठं तरी बाहेर जाऊन यावं. मी तोंपर्यंत मला काय करायचं तें करतें—" मामी म्हणाली.

" हा सिगारेटचा फायदा बघ. पुरुषांना बायकांनीं अशीं 'नाहीं मी बोलत—'चीं फर्मानं सोडलीं असतां गृहसौख्याची थोडीबहुत तरी कल्पना आणून देण्यास ही वल्ली फार उपयोगी पडते. जगांतील ब्रह्मचारी लोकांची ही कायद्यांच्या कचाट्यापलीकडील सखी आहे. आणि म्हणून कॉलेजां-तल्या मुलांना हिच्यावांचून करमत नाहीं. 'एक सिंगल चहा आणि वर पिवळा हत्ती ' हें तर कोणाहि मोटारहांक्याचं ब्रीदवाक्यच असतं. इंग्लंड-मधल्या एका उदारहृदयी तरुणानं हिला दक्षिण अमेरिकेच्या पंक्कांतून वर काढलं. इंग्लंडला आणून तिला 'मिणमिण' ( मडमीणचा अपभ्रंश ) करून सोडलं. ग्लॅडस्टनबरोबर तिनं राजकारणामध्यें लुडबुड केली. टेनिसनला 'इन् मेमोरिअम्' लिहितांना हिनं मदत केली. आजपर्यंत किती तरी लोकांना तिनं नुसतं झुलवत ठेवलं आहे. हिच्याकडे नुसतं पाहिलं कीं मन एकाग्र होतं—तुझ्याकडे पाहिलं कीं मन व्यग्र होतं. हिच्या-कडे पाहिलं कीं बहात्तर जन्मांपूर्वीचा इतिहास डोळ्यांपुढं उभा रहातो; पण तुझ्याकडे पाहिलं कीं मी आत्तां सांगितलेली गोष्ट विसरून जातों. आतां तूं जा म्हणून सांगितलंस ना ? बघ मी विसरलों कीं नाहीं तें. तें असं होतंच. तुला वाटतं मी उगीच कांहीं तरी तोंडदेखलं बोलतों. पण आतां देखलं तोंड—आली भोंड व्हायला मी कांहीं स्त्रीदाक्षिण्याच्या कल्पनेनं मारून गेलेला आजकालचा गुंड तरुण नाहीं. बरं जातों मी. तूं नको

उठूं. हो, पण मुद्दा राहिलाच. हे राजेश्री मघापासून तोंड खेटरं मारल्या-सारखं करून इथं उभे आहेत. यांना काय कोणत्या तरुणीनं गगनींचे तारे मोजायला लावलं वाटतं ? कायरे सदू, तुला मी इतका वेळ काय काय बोललों तें समजलं नाहीं ना ? नाहींतर कर लेका माझी नक्कल वडलांच्या समोर. बाकी हें ज्ञान त्यांच्यापासूनच आम्हांला मिळालं म्हणा. एवढंच कीं आमची आवृत्ति जरा सुधारून आर्ट-पेपरवर काढलेली आहे."

"आपल्याला वाटतं खरं, पण मुलं फार चाणाक्ष असतात हो—" मामी म्हणाली.

"असतील. कांहीं आम्हांला फांशीं तर देणार नाहींत. अग, सगळींच मुलं लहानपणीं चाणाक्ष असतात. पण बायका आल्या म्हणजेच काय तें तीं एकाक्ष बनतात. मग त्यांना सबंध विश्वाची काळजी नसते. प्रेम हाच त्यांचा परमेश्वर. आणखी तुला काय काय माहिती सांगूं ? कांहीं नको ? बघ ! मग मला शिव्या देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मग मी मेल्यासारखा थंड होईन—" मामा म्हणाले.

"इडापिडा टळो. जा तुम्ही एकदांचे इथून. पण जरा मला ही ट्रंक उचलूं लागायची." मामी म्हणाली.

"आतां कां ? आतां दाम दिला तर काम इल्ला !" मामा बाहेर जाण्याच्या तयारीनें उठले. मामींनें एकवार हंसून मामांच्याकडे पाहिलें. आणि स्वतः ओंठ घट्ट आंवळून, मोठ्या कष्टानें ती ट्रंक उचलून बाजूस ठेवली.

"कां ? बायकांनींहि कांहीं हातांत बांगड्या—" म्हणून मामी पुढें कांहीं तरी म्हणणार होती, पण तिला आपली चूक कळून आली.

"बांगड्या हा अलंकार अबलांचाच असतो. नाहीं म्हणण्यांत काय हंशील आहे ?" म्हणून हंसत मामा बाहेर निघून गेले.

दुसऱ्या दिवशीं सकाळच्या एक्स्प्रेसनें मामी जाणार होती. मी रात्रभर तिच्या उशाशीं निजून राहिलों होतों. मामीनें जातांना मला बऱ्याच वस्तु दिल्या. पण मला तिच्यापासून कांहीं नको होतें. सुलोचनाला एक नवीन फ्रॉक वगैरे जिनसा आईनें दिलेल्या पाहून मला बरोबर नेऊन सुलो-

चनाला आईजवळ ठेवायला काय हरकत आहे म्हणून मीं मामांना विचारलें. मामांनीं मुकाट्यानें माझ्या डोक्यावर हात ठेवला. टांगा आल्यावर तर मला जास्तच उबळून आलें. 'रडायचं नाहीं हं' म्हणून शान्तामामीनें मला बजावून ठेवलें होतें म्हणून मी इतका वेळ अगदीं कांहीं एक न बोलतां स्तब्ध होतों.

" बरं आहे. रघुनाथ, गेल्यावर पत्र वगैरे धाड हं. नाहीं तर गेलास एकदां कीं तिकडचाच होतोस. तसं करूं नकोस. वहिनीला फारसं पाण्यांत जाऊं देऊं नकोस—अन् वाऱ्यांत हिंडूं देऊं नकोस." आई म्हणाली.

" ताई, अग मुंबईला पाणी आणि वारा या गोष्टी उभ्या जन्मांत सांपडायच्या नाहींत. त्याची काळजी वहायला आमच्या शहराचे अनुभवशीर वृद्ध गृहस्थ समर्थ आहेत. आमच्या मुंबईला कावळ्यांनासुद्धां महिना महिना आंघोळीला पाणी मिळत नाहीं—आतां त्रासून त्रासून पोरीच्या डोळ्यांना पाणी आणलंन् हिनं तर माझा इलाजच नाहीं." म्हणून मामांनीं हलकेच मामीकडे पाहिलें. मामींनीं डोळ्यांनींच मामांना 'आतां शहाणपण बस्स् झालं' या अर्थाचा इशारा दिला. बाबा डोक्याला टोपी ठेवून टांगेवाल्याशीं हुज्जत घालीत उभे होते. एक आण्याच्या मतभेदाकरतां बाबा तीनतीनदां 'मीहि पुण्यांतलाच आहे' म्हणून त्या टांगेवाल्याला हडसून खडसून सांगत होते. मामींनीं आईला नमस्कार केला, बाबांना नमस्कार केला, आणि माझ्याकडे पाहून 'येतें हं, सदू' म्हणून म्हणत सुलोचनेला उचललें. मामींनीं त्या वेळीं दिलेले दोन रुपये अजून माझ्याजवळ आहेत. मामीचा टांगा हालतांच मी आपल्या हृदयावरचा बंधारा बाजूस केला.

# प्रकरण ७ वें

## शिक्षणाचा वैरी !

कोणत्याही परिस्थितींत मनाचा समतोलपणा कायम ठेवण्याची शक्ति माझ्या अंगांत नव्हती म्हणूनच मला अतिशय त्रास होत असे. शान्तामामी गेली त्या दिवशीं आप्तजनांचा वियोग म्हणजे काय कठीण प्रसंग असतो हें मला समजलें. आवडत्या माणसांनीं एकाएकीं सोडून जाणें किती त्रासदायक असतें हें मला त्या दिवशीं पटलें. मला कांहीं सुचेना. कांहींहि रुचेना. कांहींहि पटेना. शान्तामामी मला टाकून कां गेली हा प्रश्न मी विचारीत होतों. पण माझ्या प्रश्नाला उत्तर कोण देणार ! आईनें माझी पुष्कळ समजूत घालण्याचा प्रयत्न केला. बाबांनीं माझ्याकडे थोडेंसें आश्चर्यानें पाहिलें.

" कां ? ह्याला जायचं होतं का काय तिच्याबरोबर ! " म्हणून बाबांनीं आईला विचारलें.

" माहिती आहे पुळका मामीचा. एक तर एकच नाद. गप बसरे. गोडीनं सांगितलं, लोभानं सांगितलं तरी याचं आपलं भोकाड पसरलेलंच आहे. आम्ही कोण तुला मारायला बसलोंत का इथं ? आई-बापाची माया नको. मामीनं करून ठेवला आहे लाडोबा. थांब, तुझं बरेच दिवसांचं तुंबलं आहे. एकदां तुझ्याकडे मला पाहिलंच पाहिजे. त्याशिवाय तूं कुठला वठणीवर यायला ! " म्हणून म्हणत आईनें मला घरांत ढकललें, आणि वठणीवर आणण्याची पूर्वतयारी म्हणूनच कीं काय मोठ्या दरवाजाला दण्दिशीं लाथेनें तोंड मिटवायला लावलें. तरी पण बाबांना माझ्या या कृतीचा थोडाबहुत सुगावा लागला असावा हें त्यांच्या वारंवार माझ्याकडे बघण्यानें स्पष्ट दिसत होतें. एखाद्याच्यावर इतकी माया दाखविण्याजोगा मनुष्यपणा माझ्या अंगांत होता याचें त्यांना राहून राहून आश्चर्य वाटत असावें. 'कदाचित् भास असावा' अशीहि त्यांना शंका आली

असावी. कारण त्यांनीं मला उद्देशून म्हटलें, " अरे, मुंबईला काय आणखी जास्ती आहे ? इथं तुला वन्या खेळायला आहे. शाळेंत जावं, वन्याशीं खेळावं, खावं, प्यावं, मौज करावी. मुंबईला काय करायचं आहे जाऊन? "

मी रडत रडत कसाबसा म्हणालों, " मला मामीकडे जायचं आहे. मला मामी पाहिजे."

आईनें रागानें माझ्याकडे पाहिलें. पण बाबा जास्तच घोटाळ्यांत पडल्यासारखे दिसले. बराच वेळ विचार केल्यानंतर पुन्हां ते पूर्वपदावर गेले. " त्याला घरांत घेऊन जा. मामीकडे जायचं आहे ! आज तूं रड तर खरा. ना चामडी लोळवीन तर—" म्हणून आपल्याशींच पुटपुटत बाबा घरांत निघून गेले.

बाबांच्या आणि आईच्या धमकावण्यांना धाब्यावर बसवून मी त्या दिवशीं मनसोक्त रडून घेतलें. मामीनें दिलेल्या वस्तु पाहिल्या कीं मला पुन्हां आठवण होई. आणि आठवणीचा आवेश ओसरेपर्यंत मला रडण्याशिवाय दुसरें गत्यंतरच नव्हतें. त्या दिवशीं मी शाळेंतसुद्धां गेलों नाहीं.

अशक्य वाटणारी गोष्ट कांहीं काळानें शक्य वाटूं लागते. दिवसामागून दिवस जाऊं लागले, त्याप्रमाणें मला हळूहळू विसर पडूं लागला. शेवटीं एक दिवस असा उगवला, कीं त्या दिवशीं माझें मलाच हंसूं येऊं लागलें. शान्तामामीच्या आणि माझ्या जिवाभावाच्या स्नेहाबद्दल मी हंसत नव्हतों. मला हंसूं आलें तें माझ्या वर्तणुकीबद्दल. शान्तामामी गेली म्हणजे कांहीं पार, अगदीं लांब लांब थोडीच गेली होती ? मुंबईला तर गेली होती. अन् पुन्हां कधीं परत येणार नाहीं असें थोडेंच होतें ? मग त्यांत इतका टाहो पिटण्याजोगें काय होतें ? या रीतीनें मी आपल्या मनाची समजूत करूं शकलों. आणि मधून मधून मामांच्या पत्राबरोबर शान्तामामी मुद्दाम माझ्याकरतां अंकालिपींतल्या अक्षराएवढें अक्षर काढून माझी चौकशी करीत होतीच.

मास्तरांच्या कृपादृष्टीमुळें म्हणा अगर माझ्या हुषारीमुळें म्हणा मी लवकरच 'दसरा उजाडला. मोरूचा बाप मोरूला म्हणाला—' इत्यादि ग्रंथांचा समाचार घेऊं लागलों. मला प्रथम हंसूंच आलें. मी जर बाबांना

उद्देशून 'बाप' म्हणालों असतों तर चाललें असतें का? आणि पुस्तकांतून तर 'मोरूचा बाप' उद्धारायला मागेंपुढें पाहिलें नव्हतें. भाषा-विषयाच्या बाबतींत माझें फारसें नडत नसे. उलट एखादे वेळेस वाटे कीं, हा असाच अभ्यास शेवटपर्यंत असेल तर मग मी उद्यां भराभर सगळ्या परीक्षा पास होईन. पण माझी नांगी तोडायला दुसरे वीर समर्थ होते. आंबे, पेरू वगैरे संतसज्जन रुचीला मोठे गोड, पण प्रत्येकाच्या अंगांत कांहीं ना कांहीं तरी खोड. कधींहि म्हणून फुकटाची बात नाहीं. जगांतलीं भुतें जमवायला शितें सांडावीं लागतात तेंच खरें. प्रत्यक्ष व्यवहारांत आंब्याच्या खरेदी-विक्रीपायीं नाण्याचा झंकार होत नसेल तितका आम्हां लहान मुलांच्या कोंवळ्या मेंदूवर होत असतो. घरांत बाबांनीं मला पैशाची कोथिंबीर आणण्यास सांगण्याइतका कधींच विश्वास ठेवला नव्हता. पण मास्तर मला खुशाल आठदहा आण्यांपर्यंत आंबे आणण्यास सांगत होते. एखादे वेळीं जीव त्रासला म्हणजे वाटे, कीं ह्या हिशोबाच्या कट-कटीपेक्षां जगामध्यें फळझाडेंच उगवलीं नसतीं तर? पण मग आंबा खायला फार चांगला लागतो, हा विचार मनांत येतांच पूर्वींचा भयंकर विचार पळून जाई. आंकड्यांची मानमोडी टाळायला दुसरी तोड नव्हती. हिशोबांची पाळी आली कीं मी हात जोडून स्वस्थ बसत असें.

याच सुमारास शान्तामामीचें पत्र आलें. बन्याच्या मदतीनें मी तें सर्व वाचून टाकलें.

"सदू यास,

तूं पास झालास हें मला कळलं. मला फार फार आनंद झाला. तूं परीक्षा पास झालास कीं मला कोण आनंद वाटतो म्हणून सांगूं? असाच शिकलास कीं मला आनंद वाटेल. मला तुझी फार आठवण होते. आपली छोटी 'सू' आतां उभी रहाते. परवां ती भिंतीला धरून बराच वेळ उभी होती. 'सू'ला नवीन बूट आणणार आहे. तुला काय आणूं? तूं लिहीत कां नाहींस? मी हंसेन होय? कधींच नाहीं. तुला येईल तसं लिही. मी कधींहि

हंसणार नाहीं. बघ, तुला आज समजेल असंच मी लिहिलं आहे. विसरूं नकोस. तुला काय हवं तें कळीव.

तुझी,

शान्तामामी "

पत्र अगदींच सोप्या भाषेंत लिहिलें होतें तरी दोन भाषा-शास्त्रज्ञांचीं डोकीं फुटण्याच्या बेतांत आलीं. लहान मुलांना अनुस्वाराचें मोठें कोडें पडत असतें. लहानपणीं अनुच्चारित अनुस्वार तर राहिलेच बाजूला, पण उच्चारित अनुस्वारसुद्धां देशोधडीला लावण्यांत माझा हातखंडा होता. लहान मुलांच्या पद्धतीवर जर मराठी भाषा लिहिली गेली तर काय काय अनर्थ ओढवतील हरी जाणे. कदाचित् एखादी निराळीच भाषा निर्माण करण्याचें श्रेय पदरांत पडेल. शान्तामामीच्या पत्राला उत्तर धाडण्याचें माझ्या मनांत होतें. पण बाबांच्या दृष्टीला ती गोष्ट इष्ट वाटेल कीं नाहीं हा प्रश्नच होता. पुन्हां पत्र लिहिण्याचें काम अति क्लिष्ट. हें सर्व डोळ्यां-पुढें उभें रहातांच मीं तो नादच सोडून दिला.

अखेर शाळेच्या जाचाला माझा जीव अगदीं कांचून गेल्यासारखा झाला. शान्तामामीनें जरी मला 'असाच शीक' म्हणून सल्ला दिला होता तरी तिचा फैसला मला कांहीं केल्या पटेना. मी जों जों विचार करूं लागलों तों तों मला शाळेचें हिडिस स्वरूप जास्तच भेसूर दिसूं लागलें. मनाची खळबळ ओकून टाकण्यास बन्याशिवाय दुसरें कोणीच नव्हतें. आणि बन्या शाळा या संस्थेचा पक्का हाडवैरी. बन्यानें आणि मीं पुष्कळ विचार केला. विकारवश बन्या बोलण्याच्या भरांत काय लागेल तें बडबडत असे—

"सगळ्या शाळा मोडून टाकाव्यात; आणि त्या जागेवर मुलांना भोंवरे खेळायची परवानगी द्यावी. मुलांना शाळेंत घालून त्यांना छड्या मारणें पाप आहे. आई म्हणते, मी लहान आहें म्हणून देवाचा अंश आहे. लहान मुलं देव असतात तर मग देवांना मारणं चांगलं का? सदू, मी तुला सांगतों, एके दिवशीं आपण सगळ्या मुलांनीं एकजूट करावी आणि शाळेंतच जाऊं नये. अकरा वाजतां मास्तर येतील. मुलं कुठं आहेत?

अशी जिरेल कीं नाहीं सगळ्या मास्तरांची. मारायला पाहिजे काय!" बन्या प्रसंगीं दांडगा वक्ता होता हें सांगावयाला नकोच. न कळत सत्याग्रहाचीं तत्त्वें बन्याच्या अंतःकरणांत भिनलीं होतीं. त्याच्या सूचना होत्या परिणामकारक, पण त्या अमलांत आणणार कोण हाच प्रश्न होता. सगळीं मुलें एकदम गैरहजर रहाणार कशीं? त्यांच्यांत मास्तरांचीं कांहीं तरी मुलें असणारच. त्यांना कोण वळवणार! तें शक्यच नव्हतें.

"बन्या, मला शाळेचा अगदीं कंटाळा आला आहे." मीं सपशेल कबुली जबाब लिहून दिला.

"मला वाटलंच होतं. म्हणूनच मी तुला पहिल्यापासून सांगत होतों कीं नशिबानं तुझ्यापासून हें शाळेचं संकट दूर आहे. तूं गडबड करूं नकोस. पण माझा तुला विश्वास आला नाहीं. मोठ्या लोकांची ही नेहमींचीच तऱ्हा आहे. गोड गोड बोलून मुलांना ते फसवतात; शाळेंत अडकवतात अन् आपण बाजूला होतात. मीं तुला आधीं सांगितलं होतं. आधीं विचार केला नाहीं म्हणजे असा घोंटाळा होतो." बन्या म्हणाला.

बन्याच्या सर्वज्ञानीपणाचें मला कौतुक वाटलें. पण आतां काय उपयोग!

"बन्या, उद्यां आपण शाळेंत गेलों नाहीं तर?" मी थोडासा विचार करून म्हणालों.

"नाहीं गेलों तर तुझे बाबा तुला अन् माझे बाबा मला विटीप्रमाणं शाळेपर्यंत कोलवीत नेतील." बन्या म्हणाला.

"पण घरांत बसायचंच नाहीं मुळीं—" मी थोड्याशा कांपऱ्या आवाजानें म्हणालों. बन्यानें माझ्याकडे डोळे फाडून पाहिलें. मी त्याच्या दृष्टीला दृष्टि न भिडवतां दुसरीकडेच पहात खालच्या मानेनें म्हणालों.

"उद्यां शनिवार आहे. सकाळीं शाळेंत जावं लागणार! आपण शाळेच्या वेळेला म्हणून निघूं—अन्—" मी थांबलों. बन्या माझ्याकडे सारखा टक लावून पहात होता. त्याच्याहि डोक्यांत तेच विचार घोळत असावे.

"अन् पाटीदप्तराची काय वाट?"

बन्याची शंका साधार होती. मी विचारांत पडलों.

"पाटीदप्तर घरींच ठेवूं. विचारलंच कुणी तर सांगूं, 'विसरलों' म्हणून." मी म्हणालों.

"मला विचार करावा लागेल. मी तुला रात्रीं सांगेन." म्हणून गंभीर मुद्रेनें तहनाम्यावर सही ठोकणाऱ्या परराष्ट्रीय मंत्र्याच्या अवसानांत बन्यानें उत्तर केलें.

रात्रीं जेवण झाल्यावर मी ओसरीवरच बन्याच्या निकालाची वाट पहात बसलों होतों. बराच वेळ झाला तरी बन्याचें एकमत होत नव्हतेंसें दिसलें. साहजिकच आहे. मनुष्याच्या डोक्यांत किती कल्पनांचें जाळें विणलेलें आहे हें त्याचें त्यालासुद्धां माहीत नसतें. त्या सर्व कल्पनांची संमति मिळणें फार दुर्घट असतें. बाबांनीं मला झोंपेचा आग्रह केला; पण झोंपेपेक्षां मला राष्ट्राच्या एकमताची जास्त काळजी होती.

शेवटीं बन्यानें आपलें डोकें खिडकीबाहेर काढलें. मोटारच्या आवाजाची निशाणी फडकतांच मी धांवतच बाहेर गेलों. बन्यानें इकडे तिकडे पाहिलें.

"यस्" म्हणून इंग्रजी भाषेच्याद्वारें त्यानें आपली संमति जाहीर केली. लढाई बंद पडल्याची वार्ता ऐकतांच आनंदानें वेडें झालेल्या युरोपखंडासारखी माझी स्थिति झाली. मी आनंदाच्या भरांत कटाचें सारें बेंड फोडण्याच्या बेतांत होतों; पण बन्यानें सावधानपणा कमालीचा दाखवला.

"तुमच्या ओसरीवर आतां एक काळं मांजर गेलं आहे त्याला हांकलून लाव." म्हणून बन्या ओरडला. मीं मागें वळून पाहिलें तों बाबा दारांत उभे होते. माझ्या अंगावर कांटाच उभा राहिला.

"रात्रींचं अंगणांत काय आहे रे? सारा दिवसभर उनाडक्या करून पुन्हां रात्रीं तुमचं शिल्लक रहातंच का! चल ये घरांत, बाहेर काय चाललं होतं!" बाबांनीं प्रश्न केला.

"मांजर पहात होतों." म्हणून बन्याच्या इशाऱ्याचा मीं आधार घेतला.

दुसऱ्या दिवशीं शाळा सकाळची होती. भर थंडींत लोकांनीं झोंपा

काढायच्या आणि आम्ही शाळेंत जायचें—अन्यायाची परमावधि दुसरी कोणती असणार? प्रत्यक्ष भगवान् सूर्यनारायणानें (ही अगदीं जुन्या पद्धतीची सुरुवात झाली. पण जुन्या लोणच्याचा मासला म्हणून कांहीं हरकत नाहीं.) अजून अंथरुणांतून बाहेर डोकें काढण्याचें ठरविलें नव्हतें. डोंगराच्या पलीकडच्या बाजूला कुठें तरी लांब लांब अगदीं रानांत सूर्य निजत होता, म्हणून मला आमच्या मामीनें सांगितलें होतें. आणि अजून सूर्य उगवला नाहीं, आपण तरी कशाला उठा, असा विचार करून तोहि पांघरूण लपेटून निजला असावा. पण त्याचा सूर्य कोणता? पृथ्वीवरच्या नारायणांनीं रस्ता नीट करण्याकरितां म्हणून रस्त्यावर विहिरी खणण्याचा घाट घातल्याप्रमाणें दिसत होतें. खडीचे ढीग, इतस्ततः खणलेले चर इत्यादि जागाबिगा पाहून रस्ता नीट करणारांची कल्पना तरी काय असावी हाच प्रश्न पडत होता. कीं रस्ता नीट करायचा म्हणजे अगदीं थेट शेषाच्या फणीपर्यंत जावें लागतें ही तर त्यांची कल्पना नसावी? मी बन्याला बोलूनसुद्धां दाखविलें. रस्ता दुरुस्त करण्यापेक्षां होता तोच फार चांगला होता हेंच बन्याचेंहि मत पडलें. पण लहान मुलांना ह्या बाबतींत कुणीच विचारीत नाहींत म्हणून हा असा गोंधळ उद्भवतो हेंहि बन्यानें ठासून विधान केलें. पण म्युनिसिपालिटी आणि तज्जन्य सुधारणा हा आमचा प्रस्तुत विषय नसल्यामुळें मला त्याचें कांहीं एवढेंसें कौतुक वाटलें नाहीं.

आम्ही दोघेहि शाळेच्या वाटेनें चाललों होतों, पण शाळेची वाट हें आमचें ध्येय नव्हतें. शत्रुसैन्याला हुलकावणी ( Bluff ) देण्याकरितां म्हणून ज्याप्रमाणें चालण्याची दिशा निराळी आणि इष्ट स्थलाची दिशा निराळी हा प्रकार चतुर सेनानी उपयोगांत आणतात त्याप्रमाणें आम्हीहि मोठ्या लोकांचें अनुकरण करीत होतों. आमच्या वयाच्या मानानें विचार केला तर आम्हांला कोणीहि याबद्दल दोष देणार नाहीं असेंच मला वाटतें. दररोजचा त्रास—पाटी पहा, पुस्तक पहा, विजारच कुठें पडली शिंची कुणास ठाऊक?—एक ना दोन, हजारों संकटांशीं नित्य झटापट. आणि भानगडींतून शीरसलामत बाहेर पडायचें कशाला, तर मास्तरांच्या

रुळाचें संगीत ऐकायला. शिकलें म्हणजे ज्ञान मिळतें, ज्ञान मिळालें म्हणजे सत्ता हातीं येते, आणि सत्तेपोटीं द्रव्यसंचय लपलेला असतो हें मामांचें बायकी तत्त्वज्ञान समजण्याइतकी अक्कल माझ्या अंगांत बिलकूल नव्हती म्हटलें तरी चालेल. उलट 'घरीं त्रास होतो; कार्टे शाळेंत मरूं दे' हें आईचें वचन मला सारखें जाचत होतें. इतकेंहि करून मातृ-देवता प्रसन्न होईल तर काळ्या दगडावरची रेघ.

चालतां चालतां शिष्टाचार पाळणें कर्तव्य आहे म्हणूनच कीं काय बन्यानें रस्त्यांत साष्टांग नमस्कार घातला. मीं बन्याकडे पाहिलें. बन्या धीराचा यांत संशय नाहीं. "एँ! उडी मारली!" म्हणून उगवत्या सूर्य-नारायणाला बजावीत बन्या चटकन् उभा राहिला. मला धार्मिक कर्मे करण्याची तितकीशी आवड नसल्यामुळें मी नमस्कार घालण्याचा विचार बाजूस केला.

झाल्या गोष्टीचा विचार न करतां बराच वेळ आम्ही हातांत हात अडकवून रस्ता चालत होतों. सहवेदना सुरू झाल्या. बन्यानें मागें वळून पाहिल्याबरोबर मीं ओळखलें.

"सदू—" बन्या रस्त्यांतच एकदम उभा राहिला. मी त्याच्याकडे पहात उभा राहिलों.

"आपण जाणार कुठं?" बन्यानें श्रोतृवर्गापुढें आवेशानें प्रश्न टाकला. मी नुसताच पहात राहिलों. सबंध जग पुढें पडलें असतां 'जावं कुठं' हा प्रश्न निघेल ही मला कल्पना नव्हती. आतां मला पटलें कीं, शाळा चुकवूं म्हटलें तर जगसुद्धां लपायला लहान पडतें. 'शाळेंत जाऊं' म्हण-ण्याचें धैर्य माझ्यांत नव्हतें.

"सदू, आमचे मास्तर कधीं काळीं रात्रीच्या वेळेला अंधरांत आपल्या घराकडे आले कीं मीं त्यांना चाट मारून पाडून टाकीन, त्यांचा फेटा हिसकावून घेईन, कोटाच्या गुंड्या तोडून टाकून गटारांत फेंकून देईन—अन्—अन् त्यांची छडी मोडून टाकून जाळून टाकीन—" बन्या आवेशानें म्हणाला. बन्याच्या दोन तंगड्या फांकून उभें राहाण्याचें मला कौतुक वाटलें. त्याच्या भाषणाला 'पुनश्च' म्हणण्याचा विचार कंठ

सद्गदित झाल्यामुळें राहून गेला. हेंच म्हणणारा बन्या जर थोडासा मोठा असता तर मला वाटतें अधिकाऱ्यांना आमची शाळा बंद करण्यांतच फायदेशीर पडलें असतें. बन्याचे विचार क्रान्तिकारक होते. अंतःकरणाची तळमळ शब्दाशब्दांतून दृग्गोचर होत होती. बन्याचे विचार मला पूर्णपणें मान्य होते पण—हें सगळें जमावें कसें ? बोलतांना तोंडाला आलेली ओली वायां जाऊं नये म्हणूनच कीं काय बन्यानें सदऱ्याच्या बाहीचा सढळ उपयोग केला. प्रत्यक्ष शंकराचा अवतार पहातांच अजून कलि-युगांत देवांनाहि मधून मधून जाग येत असते असें वाटल्यास नवल तें कसलें ! पण आमचें हें असें रस्त्यांत उभें रहाणें एका सायकलस्वाराला खपलें नाहीं. घंटी वाजवीत वाजवीत बन्याच्या पुढ्यांत येऊन तो ठाकला; आणि बन्याला मोठ्या तावातावानें, रस्ता कुणी तुझ्या वडिलांनीं बांधला आहे का म्हणून विचारूं लागला. बन्या शुद्धीवर आला. पण बन्याला त्या रस्त्याचें काम करणाऱ्या सद्गृहस्थाची बिलकुल माहिती नव्हती. वडिलांनीं अजून रस्ता बांधायला सुरुवात केली नाहीं, केल्यावर मला समजेलच इत्यादि उत्तरें मोठ्या नम्रभावानें दिलीं. सायकलस्वार या उत्तरानें फारसा शहाणा न होतां रस्त्याच्या कामदाराविषयीं पूर्वींइतकाच अज्ञानी ( अडाणी ) राहून चालता झाला. मात्र बक्षिसी म्हणून ' कां, फार तोंड सुटलं आहे ! अजून कायदा माहीत नाहीं वाटतं !' इत्यादि कायद्याचें ज्ञान आम्हांला पुरविण्यास तो बराच उत्सुक होतासें दिसलें. पण कायद्याच्या कलमानें लादलेलें व्याह्यांचें तट्टु इतक्या लहान वयांत घेण्याचें आमच्या मनांत चुकूनसुद्धां आलें नाहीं. बन्यानें तर त्याची संगीताच्या सुरानें बोळवण केली. " साहेबाचं पोर लई अकली रे अकली रे ! बिनपायाची गाडी हांकली रे " म्हणून बन्यानें खड्या सुरांत म्हटलें. सायकलस्वार मुकाट्यानें चालता झाला. बन्यानें विजयी मुद्रेनें सभोंवार पाहिलें " कायदा सांगतो आहे म्हणे ! अरे जा, गमजा काय दाखवतोस ? मीसुद्धां मोठा झाल्यावर सायकल घेईन." म्हणून म्हणत बन्यानें माझा हात धरला.

" आपण पर्वतीच्या बाजूला गेलों तर ! " म्हणून बन्यानें चालतां

चालतां मला उद्देशून प्रश्न केला. मीं मुकाट्यानें मान हलवून संमति दिली. आज बन्या म्हणजे प्रतिपरमेश्वर होता. पेंढारी वृत्तीचा बन्या माझा पुढारी होता. नेता, प्रणेता, विधाता—सर्व कांहीं कर्ता-करविता तो होता. मी उगीच त्याच्या शेंपटीप्रमाणें त्याच्या पाठीमागें जात होतों. कोणतेंहि कार्य धडाडीनें पार पाडण्याची हिंमत बन्याजवळ होती हें मला आज कळलें. प्रसंगाशिवाय मनुष्याची योग्य पारख होत नसते म्हणून म्हणतात तेंच खरें. बन्याच्या आवडीच्या विषयांत तो जिवंत वाघ होता. एरवीं बन्या वाघाचें नांव धारण करणारा—सर्केशींतला, चाबकाच्या फटकाऱ्या-सरशीं उड्या मारायला तयार असणारा शेळपट जीव होता. पण तोच बन्या आज म्होरक्या बनला होता! वाटेंत आमचें बन्याच मुद्दयांवर चर्चा-त्मक व्याख्यान झालें. खरें सांगायचें म्हटलें म्हणजे बन्याच भाषणाचें बघत होता; मी प्रसंगानुसार 'हो'-'नाहीं' इत्यादि पूरणार्थक शब्दांनीं त्याच्या विधानांना पुष्टि देण्याचें पहात होतों.

"सदू, शाळा म्हणजे मुलांना शिकण्याची जागा नसून मुलांनीं मास्तरांना शिकविण्याची जागा असली पाहिजे. मास्तर लोक एवढे मोठे झाले तरी त्यांना बन्याचशा गोष्टी अजून माहिती नसतात. आमच्या मास्तरांना गोट्यांमधले 'अग्गल,' 'पग्गल,' दुग्गल' हे शब्दसुद्धां सम-जत नाहींत. आट्यापाट्यांत आपण 'डोरलं' म्हणतों तेंसुद्धां त्यांना माहीत नाहीं. असा मास्तर मुलांना काय शिकवणार? तूं कांहींहि म्हण सदू, पण शाळेंत शिकून आपल्याला काय मिळणार आहे?" बन्या म्हणाला.

"आपल्याला मोठीं मोठीं पुस्तकं कशीं वाचतां येतील?" मीं शंका पुढें मांडली.

"पण पुस्तकं वाचून काय मिळणार आहे? अन् मोठीं माणसं तरीं कुठं पुस्तकं वाचतात? बाबांना तर मीं कधींहि पुस्तक वाचतांना पाहिलेलं नाहीं." बन्या म्हणाला.

"पण त्यांनीं लहानपणीं वाचलेलीं असतात, असं त्यांचं म्हणणं असतं." मी म्हणालों.

" निव्वळ थाप ! तुम्हाआम्हांला फसवण्याकरितां मोठे लोक नेहमींच असं खोटं बोलत असतात. तुला शंका वाटते ? सांगतों तर तुला. माझ्या आईला मीं परवां सहजच विचारलं कीं, तुला झाडावर चढतां येतं का ? 'लहानपणीं झाडावर चढण्याकरितां मीं कितीदां तरी बोलणीं खाल्लीं ' म्हणून आई म्हणाली. सदू, मला हें तिचं म्हणणं खरं वाटलं नाहीं. मी लगेच म्हणालों कीं, आतां एकदां तरी मला चढून दाखव तर खरं ! नाहीं. अरे तिला चढतां येतच नाहीं तर ती काय चढणार ? " बन्या म्हणाला.

" मोठीं माणसं झाडावर कधींच चढत नाहींत. " मी म्हणालों.

" चढतां येईल तर चढणार कीं नाहीं ? इतकीं झाडं असतात, चढलं एकाद्यावर तर त्यांत काय आहे ? मी नाहीं का चढत ? तूं नाहीं का चढत ? मग आमच्या आईला चढायला काय हरकत आहे ? " बन्या म्हणाला.

बन्याचा हा निकाल बिनतोड होता यांत शंका नाहीं. मुलांना खरें करून दाखविण्याकरितां म्हणून वडील माणसांनीं एखादे वेळेस झाडावर चढलें तर काय हरकत आहे ? मुलें येऊन जाऊन मागणार तें काय ? चढून दाखवा, येवढेंच. कांहीं तिथेंच बसून राहा, खालीं याल तर खबरदार, असा तर धाक कुणी घालीत नाहीं ना ? पण मग लहान मुलांचें यांनीं ऐकून घेतल्यावर हीं मोठीं माणसें तीं कसलीं ?

" मोठ्या माणसांना सारखं वाटत असतं, कीं हीं एवढींशीं पोरं यांनीं आमचं ऐकलंच पाहिजे ! पण आपण एकदां तरी लहान मुलांचं ऐकावं म्हणून यांच्या डोक्यांत चुकूनसुद्धां येत नाहीं. " मी बन्याला जोड देण्याकरितां म्हणालों.

मला इतिहास हें काय असतें तें बिलकुल माहीत नव्हतें; पण बन्याला सबंध पुण्याचा इतिहास अथपासून इतिपर्यंत माहीत होता. आजपर्यंत पुष्कळच लोकांनीं इतिहासावर पुस्तकें लिहिलेलीं आहेत. इतिहास म्हणजे सत्यकथन हा पहिला वर्ग, दुसरा वर्ग सत्याच्या पायावर कल्पित कथानकाची उभारणी करणाऱ्यांचा आणि तिसरा वर्ग बन्याचा. अर्थात् लहानपणीं मीं त्याचें म्हणणें खोडून काढण्याचा कधींच प्रयत्न केला

नाहीं. कारण एक तर मला ऐतिहासिक माहिती फारच थोडी होती, आणि दुसरें तो सांगायला लागला कीं, मला मोठी मौज वाटे. बन्याच्या वर्गाची मुख्य खूण ही कीं, कोणतेंहि कथानक सत्य आहे म्हणजे इतिहास आहे असें भासवण्याचा प्रयत्न करणें. यालाच कोणी थापेबाजी म्हणतात, कोणी गप्पेबाजी म्हणतात, कोणी कांहीं म्हणतात, कोणी कांहीं म्हणतात—पण नांवाचा फरक मूळ मुदलांतल्या गोष्टीला धक्का पोहोंचवूं शकत नाहीं. सत्यदेवालासुद्धां लोक निरनिराळीं नांवें देतात, म्हणून देवता कांहीं बदलणें शक्य नाहीं.

हें इतकें प्रवचन मांडण्याचें कारण पर्वतीचें तळें. बन्यानें मोठ्या अभिमानानें या प्रसिद्ध स्थळाशीं माझी ओळख करून दिली. मीं साशंक मुद्रेनें तो मान स्वीकारला.

" हें तळं पुष्कळ दिवसांपूर्वीं पुण्यांत राज्य करणाऱ्या पेशव्यांनीं बांधलं आहे. त्या वेळीं ते या तळ्यांत होडींत बसून मजा करीत. बाबांनीं मला सांगितलं—"

शेवटचें वाक्य जोडण्याचें बन्याला माझ्या संशयी मुद्रेनें भाग पाडलें. बाबांचा आधार दिला म्हणजे मी गप्प बसेन ही त्याची समजूत ! ज्यांत पाण्याचा थेंबसुद्धां दिसत नाहीं त्याला तळें म्हणावें तरी कसें ? अन् पाणीच नाहीं तर होडीला काय मोटारगाडीसारखीं चाकें लावून फिरवणार ? अन् हे पेशवे कोण ? अन् बिन पाण्याचें तळें ह्यांनीं बांधलें तरी कसें ? यावर बन्याचें आपलें एक उत्तर—" काय वेडा आहेस रे ! तुला इतिहास समजत नाहीं. पेशवे हा एक इतिहास आहे; तळं हा एक दुसरा इतिहास आणि होडी हा तिसरा इतिहास ! इतिहास म्हणजे सगळं खरं. तूं इतिहास. मी इतिहास. " बन्याची इतिहासाची कल्पना मला कांहीं निटशी समजली नाहीं. त्याचीं उदाहरणेंसुद्धां कांहीं मला स्पष्ट वाटलीं नाहींत. मीं जरा वेळानें हलकेंच प्रश्न केला,

" तळ्यांत पाणी असतं हें तुला माहीत आहे ना ? मग या तळ्यांतलं पाणी काय झालं ? "

बन्याचा इतिहास जरा लंगडा पडल्यासारखें दिसलें. पण जरा वेळानें

बन्यानें चापून उत्तर दिलें, " त्याचं असं आहे—आपण पाण्याची चूळ जमिनीवर टाकली म्हणजे तें पाणी कुठं जातं?—जमिनीच्या पोटांत. तसंच हेंहि पाणी जमिनीच्या पोटांत गेलं असावं. "

बन्याच्या इतिहासाचा मला लवकरच कंटाळा आला. मीं सहजच एक धोंडा उचलून घेतला. ' कैऱ्या पाडूं या आपण ' म्हणून बन्यानें खिशांत दगड भरायला सुरुवात केली. कैऱ्या पाडणें हें वेळ जाण्याचें उत्तम साधन आहे असें आमच्याचप्रमाणें बागेच्या रखवालदाराला वाटेल कीं नाहीं हा प्रश्न असल्यामुळें मी बन्याला हाताला धरून मनाई केली. मीं माझ्या जरीच्या टोपीकडे बोट दाखवून बन्याला मागें परतविलें. त्याच वेळीं बन्यानें मला थोडासा उपदेश केला,

" तूं जरीची टोपी कधींहि घालत जाऊं नकोस. जरीची टोपी जवळ असली कीं कैऱ्या पाडायला असं मन भितं. माझी टोपी बघ. जरी रखवालदार आला तरी मी मुकाट्यानं त्याला त्रास पडूं नये म्हणून टोपी खालीं ठेवीन आणि कैऱ्या उचलून पळून जाईन—" बन्याचें दूरदर्शित्व कौतुकास्पद नव्हतें असें कोण म्हणेल ?

त्या दिवशीं तुळशीबागेंत जाण्याची आम्हाला कुठून बुद्धि झाली राम जाणे. मला वाटतें, बन्यानेंच तें नांव सुचविलें असावें. पण गांवांतल्या इतर देवांना सोडून रामरायाच कां बन्याला आवडला हें कांहीं मला माहीत नाहीं. आम्ही पुन्हां तंगड्या तोडीत गांवांत आलों. बन्याच्या मनांत त्या दिवशीं मला इतिहासाचे पाठ देण्याचें निश्चित झालें होतें. बन्यानें एकवार रामप्रभूच्या निवासस्थानाकडे पाहून मला विचारलें,

" सदू, या देवळाचा इतिहास तुला माहीत आहे ? "

हें इतिहाससंशोधनाचें कार्य जरी स्तुत्य असलें तरी त्याच्या योगानें दुसऱ्याची गळचेपी होत होती याची वाट काय ! मी बन्याकडे घाबरून पाहिलें, आणि वाघ पाठीमागें लागल्याप्रमाणें लागेल तें बोलत सुटलों,

" हें देऊळ रामाचं आहे. इथं एकादशीला मातीचीं चित्रं मिळतात. देऊळ कुणीतरी माणसांनीं बांधलं असावं—आपल्याला त्या माणसांशीं कांहींएक कर्तव्य नाहीं. "

माझ्या या मेलगाडीकडे पाहून बन्या 'आ' करून पहातच उभा राहिला. माझ्याजवळसुद्धां इतिहासाचा सांठा बराच आहे हें पाहून बन्या आश्चर्यचकित झाला. बन्यानें पुन्हां म्हणून माझ्याजवळ इतिहासाची प्रौढी मिरवली नाहीं. मीं बन्याकडे अभिमानानें पाहिलें.

त्या दिवशीं वेळ घालवण्याकरतां म्हणून तुळशीबागेंतल्या सर्व देवांना आमच्या अस्तित्वाची आम्ही जाणीव करून दिली. बन्यानें घंटा वाजवून देवराजांना उठवण्याचें काम चोख बजावलें. देवराज वरून शांत दिसत होते तरी मनांतल्या मनांत आमच्या या आगमनाबद्दल आश्चर्यच करीत असावे! घंटा झाल्यानंतर देवांना नम्रपणें हांक मारून बन्या तोंडानें कांहीं तरी पुटपुटत साष्टांग नमस्कार घालीत असे. थोडा वेळ आमचें आणि देवराजांचें संभाषण होई. नंतर बन्या 'बरं आहे—येईन पुन्हां कधीं तरी' म्हणून पुढच्या स्वारीची सूचना देत अंगारा वगैरे लावून बाहेर पडत असे. बन्याचश्या देवांना माझी ओळख नव्हतीसें दिसलें. कारण बन्या मध्येंच आठवल्यासारखें करून माझी ओळख करून देई. "हा माझा मित्र आहे. सदू ह्याचं नांव. हुषार मुलगा आहे; पण अजून तितकासा तरबेज नाहीं." ह्या रीतीनें माझी ओळख करून देण्यांत येई. एके ठिकाणीं बसलेल्या वृद्ध बाईनें कलियुगांत दिसून येणाऱ्या या आमच्या देवभोळेपणाकडे पाहून कौतुकानें मान डोलवली. "आम्ही रोजच देवाला येत असतों. दर्शन झाल्याशिवाय जेवायचं नाहीं अशी आम्ही शपथ घेतली आहे." म्हणून बन्यानें तिला शान्तपणें सांगितलें. "बाबा, हल्लीं कोण देवाला विचारतों आहे? बायकांनासुद्धां देव नकोसा झाला आहे. बूट घालून साहेबाच्या मडमिणी होण्याचं त्यांना आवडायला लागलं आहे. कली फिरला, बाबा! असेंच रोज देवाला येत जा बरं का—देव तुम्हांला कधींहि विसरणार नाहीं." इत्यादि धार्मिक उपदेशाची गठडी कांखोटीला मारून आम्ही दरवाज्याशेजारीं असलेल्या छोटेखानी मारुतीला नमस्कार करायला गेलों.

"सदू, मला जर कुणी देव करून इथं असं लहानसं घर बांधून दिलं तर काय गंमत होईल? मग मला सगळे लोक नमस्कार करायला येतील.

लहान मुलांशीं कसं वागावं हें मी आमच्या आईला सांगेन, मास्तरांनाहि बजावून सांगेन—पण मला देवच कुणी करत नाहीं रे ! ” बन्या खिन्न मुद्रेनें म्हणाला. बन्यानें मुकाट्यानें देवाचा प्रसाद म्हणून मारुतीच्या पुढें पडलेली खडीसाखर उचलून घेतली. मींहि पण थोडीशी उचलली. ती तोंडांत टाकणार इतक्यांत पाठीमागें मी सहजच वळून पाहिलें. माझें अवसान गळलें.

---

# प्रकरण ८ वें

## मुंबईस बदली

मला पाठीमागें पाहण्याची कां लहर आली हें नीटसें सांगतां येणार नाहीं. कदाचित् असेंहि असावें, कीं माझीं कर्णेंद्रियें बाबांच्या परिचित चालीला तात्काळ ओळखीत असत. बाबांचा जोडा माझ्या चांगलाच परिचयाचा झाला होता. ( वाक्यांत श्लेषार्थ काढूं नये ! ) पुढें येणाऱ्या प्रसंगाची आगाऊ हुरहुर लागणें हा नेहमींचाच व्यवहारांतला प्रसंग आहे. मी मागें वळून पाहिलें तों, बाबा प्रभू रामरायाला मनोभावानें नमस्कार करण्यांत गुंतलेले दिसले. पण बाबांची दृष्टी किती तीव्र आहे हें मी जाणून होतों. तरी पण जमलंच तर कां सोडा, म्हणून मी झटकन् मारुतीच्या मागच्या बाजूस लपलों. देवापाठीं लपलेल्याला अभय असतें ही माझी भोळीभाबडी समजूत.

पण ती समजूत चुकीची ठरली. हल्लीं जगांत सगळीकडेच उलटापालटा कारभार होऊं लागला आहे, तर देवांनीं तरी काय म्हणून सरळ वागावें ? ‘शरणागताला अभय’ हा कायदा त्रेतायुगांतला. हल्लींचा कायदा म्हणजे हात बांधून आलेल्याचे हातच कलम करण्याचा आहे. नमस्कार वगैरे

यथासांग कर्मे उरकल्यानंतर बाबांनीं मला हलकेच हांक मारली. पुढें उद्भवणाऱ्या वादळाची ती शान्तता होती.

" सदू, घरीं यायची वेळ झाली. चल आतां—" म्हणून बाबांनीं माझ्याकडे रोंखून पाहिलें. बन्या इतका धीराचा; पण तोसुद्धां दचकला आणि इतका वेळ ज्ञानाच्या गोष्टी सांगणारा महंत कान खाजवूं लागला. काय बोलावें हें मला सुचेना. मीं बन्याकडे पाहिलें. बन्यानें माझ्याकडे उलट उत्तरीं पाहिलें. आतां मुकाट्यानें शरण जाण्यांतच मतलब आहे हें आमच्या ध्यानांत आलें.

मी मुकाट्यानें बाबांच्या बरोबर चालू लागलों. बन्या खालीं मान घालून मागोमाग येऊं लागला. आईनें मला आणि बाबांना घरांत शिरतांना पाहिलें. अर्थात् तिला यांतलें कांहींच माहीत नसल्यामुळें तिनें आमच्याकडे लक्षच दिलें नाहीं. घरांत गेल्यावर बाबांनीं आपले कपडे व्यवस्थितपणें काढले. मला त्यांची ही वृत्ति फारच जाणवूं लागली. एकदां चारदोन चपराका, दहाबारा मानपत्रें उरकून गेलीं म्हणजे मग माझा जीव खालीं पडला असता. पण बाबा तर, कांहींच झालें नाहीं अशा थाटानें सर्व व्यापार सुरळीतपणें उरकीत होते. शेवटीं जानव्यांतून हात फिरवीत बाबा हलकेंच म्हणाले,

" काय शिकवतात रे हल्लीं शाळेंत ?" मीं कांहींच उत्तर केलें नाहीं. बाबांच्या अंगचे इतर गुण मला पूर्णपणें ओळखीचे होते; पण हा गुप्त पोलीसबाणा मीं आजच पाहिला. त्यांनीं मला मास्तरांच्याविषयीं प्रश्न विचारले, शाळेच्या हेडमास्तरांचें नांव विचारलें, शाळा आवडते का म्हणून विचारलें. मी मात्र ताबडतोब फसलों. कदाचित् बाबांना मी आज शाळा चुकवल्याचें माहितीहि नसेल अशी भोळी अंधुक कल्पना माझ्या डोक्यांत खेळूं लागली. आणि ती कल्पना जसजशी बलवत्तर होऊं लागली तसतसा मी निर्भय मनानें उत्तरें देऊं लागलों. शेवटीं तर माझा पक्का ग्रह झाला कीं बाबा उगीचच प्रश्न विचारीत असतील. त्यांना आजचें कांहींच माहिती नाहीं ! आणि याच वेळेला बाबांनीं अगदीं शान्तपणें प्रश्न केला, " सदू, कोणत्या देवानं तुला खोटं बोलायला शिकवलं ?

जिवाला थोडी तरी शरम? आज शाळेंत काय काय शिकवलं म्हणून विचारलं तर तूं शाळा चुकवून वर बेरडासारखा सपशेल खोटं बोलतोस?" मीं एकदम खालीं मान घातली. सोंगाची बतावणी करण्यांत माझ्याकडून कसूर झाली नव्हती. पण बाबांनीं प्रत्यक्ष पाहिल्यावर मी काय करणार? इतक्यांत आईहि लुगड्याला हात पुशीत बाहेर आली.

" काय केलंन् आणखी? इतकं करावं तरी याचं कांहीं तरी निघतंच-" आई म्हणाली.

" काय मागच्या जन्मीं आम्हीं पापं केलीं असतील त्या पापांची फेड म्हणून हीं कार्टीं जन्माला आलीं आहेत. खोटं बोलायला यांच्या जिभा वाहवतात तरी कशा? परमेश्वरा, यापेक्षां निपुत्रिक झालों असतों तरी बरं झालं असतं! शुद्ध शिवराळ कार्ट्यांशीं प्रसंग नको रे देवा—!" बाबांनीं विलापिका काव्याच्या तारा छेडण्यास सुरुवात केलेली पाहतांच आई सरसावून पुढें आली.

" काय केलंस रे? धनगरा, बोल कीं? नाहीं तर नेहमीं जिभेला खळ पडेल मेल्याच्या तर शप्पत! काय रे, काय केलंस? आतां कां वाचा बसली?" आईच्या या तडफदार ताना ऐकून माझें धाबें दणाणलें.

" आतां बोलायला त्याला तोंड असेल तर कीं नाहीं?" बाबा म्हणाले. बराच वेळ हा खेळ चालला होता. पण कुणाचा कुणाला मेळ नव्हता. बाबांचा निराशावाद जसजसा वाढत्या प्रमाणावर धांवूं लागला तसतशी आईच्या उत्सुकतेची तार ताणली जाऊं लागली. शेवटीं बाबांनीं एकदांचें सांगून टाकलें.

" म्हणजे? देवाच्या पुढचं का हा खाऊं लागला? बाई, बाई, बाई, बाई—! अन् घरीं मेल्यांनो दुष्काळ का पडला आहे तुमच्या? काय रे, घरीं काय तुला खायला मिळत नाहीं का—? दम धर तूं, चांगला जिभेला डाग देतें आज. देवापुढचं खातोस काय? तुला आतां शिकवणारा मूर्ख ठरेल—" आई म्हणाली.

" हें हल्लींचं शिक्षण बत्र. मी तुला पहिल्यापासून सांगत आलों आहें कीं या शिक्षणानं पोरं बिघडतात. धर्माचा धरबंद मुळींच राहात नाहीं.

माझ्या लहानपणीं सूर्याला बारा नमस्कार हे झालेच पाहिजेत, त्याशिवाय जेवण नाहीं. देवाच्या पुढची खडीसाखर चोरून खातो! देव नको, धर्म नको—नुसत्या उनाडक्या करीत वणवण फिरायला पाहिजे. आपलंच नशीब खोटं—लोखंडाची कुऱ्हाड मिळाली—त्यांत लोकांकडे काय दोष! जय दत्तराज माउली—सोडीव रे बाबा या भवतापांतून—" म्हणून बाबांनीं वळकटीवर अंग टाकलें. इतक्यांत—'काय भाऊसाहेब आहेत का घरांत?' म्हणून बाहेरून रामभाऊंची आरोळी आली. रामभाऊ आंत येतांच आई चटकन् घरांत निघून गेली. मी मुकाट्यानें पुस्तक काढून वाचूं लागलों.

"काय भाऊसाहेब, काय नवीन गपसप?" म्हणून म्हणत रामभाऊंनीं बैठक मारली.

"नवीन गपसप? हुंः! तांदुळाचा भाव तिसांनीं—" बाबांनीं उत्तर केलें.

"तांदूळ जाऊं द्या हो. बाजारभाव बाजारांत. महाराष्ट्रांतल्या प्रत्येक घरांतून आतां शारीरिक भुकेपेक्षां मानसिक भुकेची जास्त तळमळ लागली पाहिजे. घरांतील मुलंबाळं म्हणजे उद्यांचे वृक्ष आहेत. त्यांच्या शिक्षणाची योग्य काळजी घेणें हाच आपला धर्म—" रामभाऊ तपकिरीच्या तारेंत बडबडूं लागले.

"उद्यांच्या वटवृक्षांची काळजी घेतां घेतां आज आमचीं पाळंमुळं उखणलीं जात आहेत त्याची काय वाट? रामभाऊ, तुम्ही कांहींहि म्हणा, पण माझं एक आपलं ऐका. हल्लींचं शिक्षण मुलांना अगदीं उपयोगाचं नाहीं—" बाबा पुन्हां आपल्या आवडत्या विषयावर बोलण्यास सरसावून बसले.

"मग माझं तरी काय म्हणणं आहे, भाऊसाहेब? हल्लींचं शिक्षण अगदीं अपुरं पडतं आहे हें माझंहि मत आहे. हिंदुस्थानची राजधानी दिल्ली ही फक्त भिंतीवर टांगलेल्या चित्रावरूनच दिसणार! मुलांना भूगोलाचें ज्ञान प्रत्यक्ष रीत्या करून दिलं पाहिजे; तर तें मनावर ठसेल. अमेरिका या बाबतींत आमच्या पुढं आहे. आतां तर कुठलीशी शिक्षणसंस्था

मुलांना जलपर्यटनाच्या सहाय्यानं जगाची माहिती करून देणार आहे म्हणून ऐकतों. याला म्हणावं कळकळ ! भाऊसाहेब, जाळाशिवाय कड नाहीं म्हणतात तेंच खरं. आपल्याकडे मुलांच्या शिक्षणाची हौस आहेच कुणाला मुळीं ? जो तो आपआपल्या व्यवसायांत निमग्न. भाऊसाहेब, लहान मुलांचं शिक्षण सुधारणं हें माझं ध्येय आहे " रामभाऊ म्हणाले.

" रामभाऊ, तुमचीं ध्येयं आणि तुमचीं मतं मला एका कागदावर टिपून द्या." बाबा चिडून म्हणाले. पण रामभाऊंना ह्या बोलण्याचा अर्थ समजला नाहींसें दिसलें.

" अहो, मी त्याचीं टांचणं करून पुस्तकच प्रसिद्ध करणार आहे." रामभाऊ म्हणाले.

" फार छान ! " म्हणून बाबांनीं तुसडेपणानें उत्तर दिलें. कदाचित् या शिक्षणापायीं दोन शिकलेल्या माणसांमध्यें जन्माचें वांकडें येण्याचा प्रसंग आला असता पण—इतक्यात दत्तूनें 'अंघोळीला पाणी उपसलं आहे. आईनं सांगितलं आहे कीं आत्तांच्या आत्तां घरीं चला ' म्हणून पकड वॉरंट आणलें; यामुळें तो प्रसंग टळला. रामभाऊंचें येणें माझ्या पथ्यावर पडलें. नाहीं तर त्या दिवशीं मला बाबांनीं काय शिक्षा केली असती याची कल्पनाच करवत नाहीं. माझ्यावरचा राग त्यांनीं रामभाऊंवर काढला—रामभाऊंचा जोडा दरवाजाबाहेर पडण्याचा अवकाश कीं बाबा एकदम उठून उभे राहिले—

" बेअकली, गाढव, मूर्ख ! आचरट—अक्कल नाहीं फुटक्या कवडीची अन् मुलांच्या शिक्षणाच्या गप्पा मारतो ! कारकुनी करतां करतां काळ्याचे पांढरे होण्याची वेळ आली तरी तोंडाची लाळ कांहीं आवरतां येत नाहीं ? शहाणपणाच्या गोष्टी करतो आहे ? एक दिवस असं मुसकट रंगवीन कीं नाहीं—" जेवतांना बाबांनीं आईलासुद्धां बोलायला कमी केलें नाहीं.

" हे तुझे लाड. लाडानं पोरगा बिघडून टाकलास. याला शिकवायला मीच पाहिजे. बायकांच्या नादानं वागलं कीं अशीच फसगत व्हायची. बायकांच्या नादानं वागणं म्हणजे भिकेचे डोहाळे लागल्याचीं पूर्वचिन्हं आहेत. आपला पोरगा तरी सुधा आहे का ? माझं तरी काय जातं आहे ?

कचरा वाहून नेण्याच्या पेटीवर जरी त्याला नेऊन बसवलास तरी माझी कांहीं हरकत नाहीं. मुलगा तुझा आहे." बाबा म्हणाले.

"माझे लाड ? खरंच ! माझे लाड ! मी त्याला पदराखालीं झांकून ठेवतें. त्यानं मागायचा अवकाश कीं चांदोबा खेळायला आणून देतें. तेंच-सांगतें काय ? आईचं पाप. पोरगं चांगलं निघालं कीं वडिलांची पूर्व-पुण्याई. वाईट निघालं कीं आहेच पुढं आई! मी सांगून ठेवतें—तो तुमचा मुलगा अन् ते तुम्ही त्याचे वडील, काय वाटेल तें करा. माझा त्याचा अर्था-अर्थी संबंध नाहीं, पुन्हां मला बोलाल तर पहा मग आपला विचार !"

मी मनांत विचार करीत होतों कीं कोणी माझे जास्त लाड पुरवले ? बाबा म्हणणार मुलगा तुझा, आई म्हणणार मुलगा तुमचा—मग मी मुलगा कुणाचा ? माझ्याबद्दल कोणीच जबाबदारी घ्यायला तयार नाहीं! मी त्याच वेळीं मनांत पुन्हां प्रतिज्ञा केली; 'बरं आहे, पाहून घेईन. या गोष्टीची आठवण द्यायला मीहि विसरणार नाहीं. मी कुणाचाच मुलगा नाहीं काय ?'

"पुत्रजन्माचा आनंद म्हणे ! पुत्राचा कुणाला आनंद होत असेल तो होवो !" बाबा म्हणाले.

"सगळी भाकरी ताटाखालीं गेली—जेवायचं तरी नीट !" आईनें बाबांना उद्देशून म्हटलें.

"जाऊं दे. अन्नांत माती कालवणारा हा राक्षस बसला आहे कीं इथं—" बाबा भाकरी ताटांत घेत म्हणाले. दुसऱ्या दिवशीं रविवार असल्यामुळें कांहींच त्रास नव्हता. दुपारच्या वेळीं मी बन्याच्या घरांत गेलों.

"अरे, कांहीं नाहीं झालं. तुझ्या आईनं माझ्या आईला सांगितलं. माझी आई थोडा वेळ देवापाशीं जाऊन रडली, अन् काल जेवली नाहीं. बाबांनीं मला थोडासा शब्दांनीं उपदेश केला—खलास !" बन्यानें आदल्या दिवशींचा वृत्तान्त कथन केल्यावर मीं त्यांस आमची हकीकत सांगितली.

"पण बन्या, उद्यां कसं करणार ? उद्यां बाबा शाळेंत येणार आहेत." मी खिन्न मुद्रेनें म्हणालों.

"हीं मोठीं माणसं अशीं अवसानघातकी असतात. मग काय कर-

णार ! गेलं पाहिजे शाळेंत." बन्या म्हणाला.

मीं बन्याच्या पुष्कळच विनवण्या केल्या. पण बन्या कांहींच मार्ग शोधून काढीना.

"हें बघ सदू, वडिलांनीं मास्तरांना चिठ्ठी दिली तर ती चिठ्ठी वाटें-तल्या वाटेंत दडपून टाकतां येते. पण बरोबर येणाऱ्या वडिलांना वाटेंत कसं दडपून टाकावं हें कांहीं मला माहीत नाहीं. त्याला मार्ग आहे. जोडे लपवून ठेवावेत, नाहीं तर टोपी लपवून ठेवावी. पण त्यांत एक अडचण आहे. आमचे बाबा वेळ पडली कीं अनवाणी तरी जातात नाहीं तर आई-चाच जोडा घालून फाडून टाकतात. टोपीच्या ऐवजीं रुमाल गुंडाळतात. म्हणून म्हणतों, कीं देवावर विश्वास ठेवून तुला उद्यां शाळेंत गेलंच पाहिजे. नाहीं तर पोट दुखतं आहे म्हणून निजून राहिलास तर ? पोट म्हण, डोकं म्हण, कांहीं तरी दुखतं आहे म्हणून म्हण—"

तें शक्यच नव्हतें. पोट दुखण्याची सबब सर्वसाधारण असल्यामुळें ती बाकीच्या सर्व रोगांवर चालणारी असली तरी शाळेच्या बाबतींत ती स्वतःच लंगडी पडते. विचार करण्याचे सर्व उपाय थकले होते तरी मी थकलों नव्हतों. बन्यानें जरी शाळेचा हवाला दिला होता तरी मी मनांत निश्चय करून टाकला. यापुढें शाळेंत पाऊल टाकायला माझी तयारी नव्हती. बाबांनीं मला मारलें तरी चालेल. मी मेलों म्हणजे मग त्यांना कदाचित् वाईट वाटेल. मग आई रडूं लागेल, बाबासुद्धां रडतील. बाबांना आणि आईला वाईट वाटायला लावण्याच्या नादांत मी स्वतां कोणता त्रास सोसायला तयार झालों होतों हें मी अजिबात विसरलों.

रात्रीं स्वप्नामध्यें मला तेंच दिसलें. मी आईला स्वप्नांत तिच्या रड-ण्याचें कारण विचारलें. आईनें रडत रडत उत्तर केलें, सदू मेल्यामुळें सर्वांना वाईट वाटत होतें. बाबा डोक्याला हात लावून बसले होते आणि दुखानें मला परत येण्याविषयीं माझ्या विनवण्या करीत होते. "तूं वाटेल तितकं खेळ—शाळेंत जाऊं नकोस. मी तुला बोलणार नाहीं—" म्हणून मधून मधून म्हणत होते. शान्तामामीला रडतांना पाहिल्याबरोबर मला 'आपण उगीच मेलों' असें वाटूं लागलें. पण झाल्या गोष्टीला इलाज नव्हता.

मी दचकून जागा झालों. आपण खरोखरच मेलों तर नाहीं ना, ही शंका डोक्यांत आल्याबरोबर मी हातपाय चांचपून पाहूं लागलों. उजव्या पायानें डाव्या पायाला अढी घातली. डाव्या पायानें उजव्या पायाला खाजवून पाहिलें. हातानें टाळ्या वाजवून पाहिलें. इकडे तिकडे हाताच्या कोंपरानें ढोंसून पाहिलें.

" तूं रात्रींसुद्धां छळायचं सोडूं नकोस मला ! अन् वेड का लागलं टाळ्या वाजवायला तुला ? नीज त्या कुशीवर. पुन्हां हललास तर सैंपाक घरांत कोंडून टाकीन." म्हणून आई त्रासून म्हणाली.

" आत्तां काय झालं ? " म्हणून बाबांनीं अंथरुणाबाहेर तोंड काढून विचारलें. आईनें 'कांहीं नाहीं' म्हणून तुटकपणानें उत्तर भिरकावलें. तेवढ्या उत्तरावर आणखी दुसरातिसरा प्रश्न विचारण्याच्या भानगडींत न पडतां बाबांनीं या जागत्या जगांतलें आपलें अंग काढून घेतलें. मी मात्र आईच्या हाताला घट्ट धरून निजलों.

दुसऱ्या दिवशीं मी भूक लागली म्हणून पुष्कळसा रडलों. आईनें जेवायला वाढल्यानंतर मी बाबा दुकानांतून येण्याची वाट पहात बसलों. आशेचा अंधुक किरणसुद्धां दिसेना. शाळेंतल्या मास्तरांची मूर्ति कांहीं केल्या डोळ्यांपुढून जाईना. बाबा मास्तरांना कांहीं तरी (च) सांगणार. अन् बाबा गेल्याबरोबर मग 'ये म्हणावं लेका !' छेः ! शाळेंत जाणं शक्यच नाहीं. माळ्यावर लपून बसायचा विचार माझ्या डोक्यांत कसा शिरला मला आठवत नाहीं, पण तो विचार मी अमलांत आणला येवढें मात्र खरें. अडचण काय ती आईची होती. आईच्या डोळ्यांतून माझ्याएवढा पदार्थ सुटणार कसा ? जरी झटकन् निघून गेलों तरी ती पटकन् येऊन धरील त्याची काय वाट ? शेवटीं मी सावकाशपणें आंत जाऊन म्हणालों, " आई, मला माहीत नाहीं तुला कशाला बोलावलं आहे तें, पण बन्यानं मला आतां सांगितलं कीं तुला त्याच्या आईनें आत्तांच्या आत्तां उभ्या उभ्या बोलावलं आहे. मांजर आलं तर मी हांकलून लावीन. बाबा आले तर मी तुला सांगायला धांवतच येईन. त्यांचं काय काम आहे तें मला

माहिती नाहीं." माझ्या इतक्या या विनयशील भाषणाचें आईला कौतु-कच वाटलें. तरी जातांना 'दूध मांजर प्यायलं तर मग बघ—' म्हणून धमकावण्या देत ती निघून गेली. मी चटकन् माळ्यावर चढून बसलों. माळे बांधतांना या माळ्यांचा शाळा चुकविण्यांत लहान मुलांना उपयोग होईल, ही कल्पना मुळांत नसते. ह्यामुळें अडीअडचणीच्या प्रसंगीं अशी अडचण होते. पण शाळा चुकविण्यास वाटेल तें दिव्य करायला तयार असल्यामुळें मी त्या माळ्याच्या आरासेकडे फारसें लक्ष दिलें नाहीं.

मनुष्याला घरांत राहायचें म्हणजे भाडें म्हणा, कर म्हणा—कांहीं तरी कारणानिमित्त पैसे हे द्यावे लागतातच. पण माळ्यावर वस्ती करून राहाणाऱ्या जीवांना कांहीं द्यावें लागत नाहीं. वर आपलें म्हणून ज्या हक्काच्या भावनेनें आपण घरांत प्रवेश करतों, त्याच हक्काच्या भावनेनें इतर किती तरी जीव एक दमडीहि न देतां त्या आसऱ्याला येत असतात. मी त्या कोळ्याच्या कुटुंबाकडे पहात बसलों. 'शत्रू आला आहे, सावध राहा' अशा अर्थाची त्या घरांत जाहीर नोटीस निघाली असावी. मला पाहिजे होती तितकी जागा पादाक्रान्त करून मी बसून राहिलों. जरा वेळानें आई मला हांका मारीत घरांत शिरलेली मला ऐकूं आलें.

"गेला तरी कुठं हा? आत्तां मला सांगितलन्, काय ऐकलंन् कुणास ठाउक! बन्याच्या आईनं मला कशाला बोलावलं? त्याचं लक्ष ठिकाणा-वर असेल तर शपथ. कांहीं तरी ऐकतो, कांहीं तरी सांगतो. सदू— ए सदू—" आईनें मोठमोठ्यानें हांका मारण्यास सुरुवात केली. खुशाल हांका मार म्हणून मी मनांत म्हणालों.

बाबांनीं आल्यावर माझी चौकशी केली, पण माझा पत्ता नाहीं. मी कुठें तरी निघून गेलों असेन हीहि आईनें शंका काढली. बाबा आई-वरच संतापले.

"निघून जायला मी काय त्याला मारणार होतों? आतां तूंच असं बोलूं लागलीस तर घरांत रहायची मुळीं सोयच उरली नाहीं. जातो कुठं! येईल, चट घरीं येईल." बाबा माळ्याखालीं येऊन उभे राहिले. आणीबाणीचा प्रसंग होता. आणि याच वेळीं माझ्या पायाला डांस

चावला. मी पाय लांब केला त्यासरशीं खालीं माती पडली. बाबांना संशय येण्यास पुरेशी माती पडली होती.

"सदू, माळ्यावरनं खालीं ये. नाहीं तर माळा पाडून टाकीन." बाबा ओरडून म्हणाले. आपल्या पायीं बाकीच्या जीवांना घराला मुकावें लागेल या पोक्त विचारानें मी मुकाट्यानें खालीं उतरलों.

"तुझ्यापुढं---बाबा, आतां आम्ही हात टेंकले. तुला चार वागणुकीच्या गोष्टी शिकवायला जाणं म्हणजे स्वतःच त्या गोष्टी शिकून घेण्यासारखं आहे. तूं थोर आहेस, आम्ही चोर ठरलों. आज शाळेंत जाण्याचं कांहीं कारण नाहीं. तुमचा मामा मुंबईहून आला आहे. तो शाळेंत जाऊन तुझा दाखला घेऊन येणार आहे. तुम्ही तिकडे मुंबईला जा, नाहीं तर निलगिरीला जा. तुमचं पुण्यांत जिणं व्यर्थ आहे. आईबापांचं ऋण तुम्ही छान फेडलंत---बरं का ग---तुझा भाऊ आला आहे आत्तां एक्स्प्रेसनं. त्याला कालच मीं बोलावलं होतं—" बाबा म्हणाले. मामा आले हें कळतांच मला हर्षवायु होण्याची वेळ आली. त्या भरांत मी वेळ कोणती आणि बोलतों काय याचें भान न राहून ओरडलों—

"मी मुंबईला जाणार—तिकीट काढून कां हो द्याना."

बाबांनीं रागानें माझ्याकडे पाहिलें. आईनें मान हालवून म्हटलें, "आपल्या हाताला यश नाहीं हेंच खरं. कुणाचंहि सारं यथास्थित केलं तरी तरी त्याची आपली 'तेरी उप्पर मेरी' असतेच. पोराला मामा मामी आमच्या-पेक्षां जास्त वाटूं लागलीं आहेत. आमचंच नशीब खोटं झालं—"

बाबांना आणि आईला नशिबाला दोष देण्यास अवसर मिळाला या हेतूनें मी एकटाच बाहेर गेलों. मी खुंटीवरच्या दप्तराकडे तिरस्कारानें पाहिलें. मनांत सारखा विचार घोळत होता, कीं एका पाटीचे चार तुकडे करून एक मास्तरांना, एक बाबांना, एक आईला अन् एक भुताखेताला अशी चौफेर वांटणी करून टाकावी. पण असें करायला लागलों तर कदाचित् पुन्हां बाबा बेत बदलतील—गाडींत बसल्याशिवाय कोणत्याहि गोष्टींत आपण बोलूं नये—स्टेशनवरूनसुद्धां बाबा घरीं आणतील. तेव्हां सध्यां घरांत अगदीं चूप बसायचें असा मीं निर्धार करून टाकला.

आनंदाची बातमी कुणाला सांगावी--? बन्या ! पण बन्या शाळेंत ! मला आठवलें कीं रामभाऊंच्या दत्तूची आज कसल्याशा मॅचकरतां सकाळची शाळा होती. मी लगेच दत्तूकडे धांवलों.—मी दिंडींतून आंत शिरतांच—'काय रे सदू—' दक्षिण बाजूचा कोंपरा घुमला.

"काय रे सदू—" उत्तर, पूर्व, आणि पश्चिम हे तिन्ही कोंपरे एकापेक्षां एक चढत्या आवाजीनें गरजले.

दक्षिण बाजूचा कोंपरा—रामभाऊंचें सर्वांत लहान कन्यारत्न. बाकीच्या तीन दिशांना तीन पुत्ररत्नें जणूं काय दिग्विजय करण्यासाठींच धाडलीं होतीं. रामभाऊंच्या शिक्षणाकरतां तळमळणाऱ्या आत्म्यानें आपल्या चार रत्नांना देशोधडीला लावण्याचें मात्र श्रेय मिळवलें होतें. बापाच्या या खुळाला कंटाळलेलीं मुलें कोणीहि इसम दिंडींतून आंत आला कीं त्याच्याभोंवतीं गर्दी करून सोडीत. नक्राच्या तडाख्यांतून सोडविणाऱ्या श्रीविष्णूची वाट पाहातां पाहातां बिचाऱ्यांचा जीव मेटाकुटीला आला होता. कुणीहि नवीन मनुष्य घरांत आला कीं त्यांना तेवढीच विश्रान्ति वाटायची !

मी तडक दत्तूच्या बैठकीकडे गेलों. दत्तू कांहीं तरी लिहिण्याच्या गडबडींत होता; किंवा घरांत रामभाऊंना तसा भास उत्पन्न करून देण्याच्या गडबडींत होता.

"काय रे सदू," दत्तूनें वर मान करून म्हटलें. बाकीच्यांनीं 'काय रे सदू'ची री ओढली.

"मी मुंबईला जाणार आहें आज--" मी शक्य तितक्या निर्विकार मुद्रेनें म्हणालों. जणूं काय मुंबईला दिवसांतून दोनदां माझ्या फेऱ्या होत असतात.

"मुंबईला !" दत्तू आश्चर्यानें ओरडला. बाकीच्यांनीं आपआपल्या पिंगाण्या ठराविक पट्टींत वाजवल्या. जेवढें मला फायदेशीर पडेल तेवढेंच मीं त्यांना सांगितलें. आणि मुंबईला गेल्यानंतर मी काय काय करीन याचेंहि अंदाजपत्रक त्यांच्यापुढें ठेवलें. दररोज समुद्राला भेटायला जाण्याचें मी जाहीर करतांच धाकट्या मुलीनें 'आम्हाला दाखवायला थोडासा समुद्र आणशील का ?' म्हणून मला विचारलें. त्यासरशीं दत्तू किंचित्

हंसून म्हणाला, "मूर्ख आहेस! समुद्र कधीं उचलून नेतां येतो का?" बाकीच्या दोघांनींहि गंभीर चेहरा करून "मूर्ख आहेस! समुद्र कधीं उचलून नेतां येतो का?" म्हणुन 'दादावाक्यं प्रमाणम्' केलें. अर्थात् तिची समजूत पटली नाहीं. "मौज आहे बुवा तुझी—" म्हणून दत्तूनें म्हणतांच त्रिवर्गांनीं 'मौज आहे बुवा तुझी' म्हणून मला त्रिवार बजावून सांगितलें.

चौघांनाहि तसेंच सोडून मी घरीं आलों. अंगणांत मामा हातांतल्या दगडानें कशावर तरी नेमबाजी करीत होते. मला पाहातांच मामांनीं माझ्यावर हात उगारून म्हटलें—

"शाळा चुकवणाऱ्या मुलांना मी दगडानं मारत असतों. ये असा पुढं—तुझं टाळकंच फोडतों." मला दगडानें मारायला छप्पन मामा आले पाहिजेत ही माझी खात्री असल्यामुळें मी हंसत हंसत पुढें गेलों आणि चटकन् मामांच्या अंगावर झेंप घेतली. 'अरे अरे, पडशील—नाहींतर मला पाडशील,' म्हणत मामांनीं मला हातावर घेतलें.

"सद्या, तूं अगदींच अर्वाच्य निघालास अं! मला कल्पना नव्हती तुझ्या नादीपणाची. तूं मुंबईला चल तर खरा; शान्तामामी तुला लोखंडाच्या फुंकणीनं मारणार आहे! लांकडी फुंकणी तूं जाळून टाकशील म्हणून तिनं मुलेश्वराजवळून नवीन लोखंडाची फुंकणी आणली आहे." मामा म्हणाले.

"मला नाहीं मारणार मामी, तुम्हांलाच मारील ती. त्या दिवशीं नाहीं का तुम्हाला चापटी मारली तिनं?—" म्हणून मीं मामांना त्या दिवसाची आठवण करून दिली. मामांनीं माझ्या तोंडावर हात ठेवला.

"ही तुझी कुशाग्र बुद्धि अभ्यासाकडे लावशील तर उद्यां बी. ए. होशील. असं बोलूं नकोस बरं का? अन् वेड्या, तिनं मला मारलं नाहीं कांहीं—माझ्या हातावरचा डांस उडवला—!" मामा म्हणाले. मामांची तोंडचलाखी मीं ओळखली. पण मामा मुंबईला नेणार आहेत, त्यांना चिडवून उपयोगी नाहीं म्हणून मी गप्प बसलों. मामांनीं मला हलकेंच कानांत सांगितलें.

" आतां कांहीं बोलूं नकोस घरांत. वाईट वाटतं आहे असं रडकं तोंड कर. बाबा अन् आई तुझ्यावर फार रागावले आहेत. अन् मी पण तुझ्यावर फार रागावलें आहें. लक्षांत ठेव—"

जेवतांना बाबांनीं मामांना सर्व कांहीं सांगितलें. मामा मुकाट्यानें ऐकून घेत होते. मधून मधून—" चालायचंच; संसार हा असा आहे; काय करतां ?" वगैरे अनुभवाचीं वाक्यें ते यथास्थित पसरून देत होते. मध्येंच एकदां बाबा थोडेसे संतापले:

" चालायचंच, काय चालायचंच ? म्हणे संसार असा आहे. तुम्हांला काय अनुभव आहे ? असल्या कार्ट्यांना जन्म द्यावा अन् मग संसाराचं सुख पाहावं !"

मामांनीं या वेळीं मौनव्रत पत्करलें. शेवटीं दुपारच्या गाडीनें जाण्याचें आमचें नक्की ठरलें. गप्प बसण्याचें मीं मामांना वचन दिलें होतें तरी पण मला रहावेना. जातां जातां आईशीं दोन गोड शब्द बोलण्याच्या इराद्यानें मीं तिच्याशीं बोलण्याचा प्रयत्न केला.

" आई, तुला मुंबईहून मी छानदारसा खाऊ धाडून देईन अं !" मी म्हणालों. आईला माझा खाऊ नको होता, तर तिनें गोडींत तसें सांगितलें असतें तर नसतें का चाललें ? पण नाहीं. ' चल चालता हो—सुडकरी मेला—' म्हणून तिनें हांकून लावलें. मामा तोंडावर हात ठेवून हंसत उभे होते.

तरी पण मी टांग्यांत मामांच्या शेजारीं जाऊन बसलों तेव्हां आईचें तोंड गोरेंमोरें झालें. जनलज्जा झुगारून तिनें मामांना मोठ्यांदा ओरडून सांगितलें, " त्याला हिंडूं वगैरे देऊं नकोस. त्याचा हूडपणा जाईपर्यंत त्याला जपलं पाहिजे—!" मला एक वेळ वाटलें, कीं टांग्याखालीं उतरून आईचा हात धरावा. पण तोच हात थोबाडांत बसणार नाहीं कशावरून ? तेव्हां ह्या क्षणिक लहरीला बळी न पडतां होईल तें मुकाट्यानें पाहाण्यांतच शहाणपणा होता. बाबांनीं दुकानांतूनच आम्हाला " बरं आहे, या—" म्हणून निरोप दिला.

गाडी हालली अन् मीं चटकन् मामांच्या टोपीला हात घातला.

मामांनीं 'अरे अरे' करायला सुरुवात केली. "माझी टोपी तुम्हा घाला अन् तुमची टोपी मी घालतों" म्हणत मी टोप्यांची अदलाबदल केली. मामा हंसूं लागले. "असं वेड्यासारखं वागूं नये. आपण सेकंडमध्यें बसलों आहोंत. कुणी आलं तर तुला काय म्हणतील? हा तुझ्या आईनं फराळाचा डबा दिला आहे—पाहिजे का?"

मामांना उत्तर देण्याच्या भानगडींत न पडतां मीं डब्याचा यथेच्छ समाचार घेतला.

हें माझें बालपण. यांत सभ्यपण कुठें आहे तें समजणें महाकर्म कठिण. बालपणींचा काळ मोठा सौख्याचा असतो असें कोण म्हणत असतील ते म्हणोत बिचारे. मी मात्र तसें म्हणण्यास केव्हांहि तयार होणार नाहीं. 'जैसी सृष्टि, तैसी दृष्टी' या न्यायानें मला बालपण म्हटलें कीं भीति वाटते. मला वाटतें, मनुष्यमात्रामध्यें ही एक खोडच लागून राहिलेली आहे. जो उठतो तो लहानपणाचें पुराण गात सुटतो. 'मी लहानपणीं यंव केलं, मीं लहानपणीं त्यंव केलं—मी असा बोललों—मी तसा बोललों—' फार छान केलेंत! जन्मभर तुम्ही लहान राहिलांत तरी मला त्याची परवा नाहीं.

लहानपणीं मुलाला अनेक शत्रू असतात. माझीं मातापितरें माझे मित्र नव्हते हें कोणीहि कबूल करील. मानपानाची कल्पना जरी क्षणभर बाजूला केली तरी इतर त्रासाची बाजू काय कमी असते? मनांत बिलकुल इच्छा नसतांना वाटेल त्या देशांत, वाटेल त्या गांवांत आणि वाटेल त्याच्या पोटीं जन्म—पुढें निव्वळ जन्म दिला म्हणून आईबापांचे निष्कारण गोडवे गायचे, मोठें होईपर्यंत बापाच्या (अक्षरशः) हाताखालीं दिवस काढायचे, तो सांगेल त्या दिशेनें मुकाट अभ्यासास प्रारंभ करायचा—हेंच का रम्य बालपण? यांत समाधान मानायला जागा उरतेच कोठें? मग ही दिशाभूल कां? का खोटें बोलण्यांत पुरुषार्थ आहे?

लहान मूल झालें तरी त्याला जीव आहेच कीं नाहीं? उनाडक्या हा पोरांचा धर्म आहे. माझ्या म्हणण्याचा अर्थ असा नव्हे कीं, सारींच मुलें दोन्ही वेळेला जेवायला घालून मोकळीं सोडावींत. बिलकुल नाहीं. पण त्यांच्या आवडीनावडींचा थोडातरी विचार नको का करायला? मुलांच्या

नाजुक मनावर त्याचा काय परिणाम होत असेल ही कल्पना नको काय? छेः! नकोच तो विचार. कुबेराच्या संपत्तीच्या कोठाराचे दरवाजे खुले केले तरी मी पुन्हां लहान व्हायला तयार नाहीं.

---

## प्रकरण ९ वें

## कोर्टाचें काम

मामांची शिस्त फार कडक होती. मामांचें घर म्हणजे लष्करी तळाची orderly room होती. सर्व व्यवहार नोटिशींच्या मार्फत चालत असे; मात्र नोटिसांना किंमत तितकीच देण्यांत येत असे.

मामांनीं माझ्याकरितां वागण्याचे नियम तयार केले—

१. शाळेंत जातांना गाडी, मोटार, ट्रॅम इत्यादि वाहनें शत्रू समजून शक्य तोंवर हमरस्ता टाळणें.

२. रस्त्यांतून जातांना कुडमुडे जोशीबुवा, बुड्ढीके बाल विकणारे संत-सज्जन आणि दारू पिऊन आपल्या हिमतीची हमी देणारे हंबीरराव— इत्यादि प्रकारच्या लोकांना देव समजून दुरूनच नमस्कार करणें.

३. शाळेंत कोणाहि पोराबरोबर दोन शक्तीचे प्रयोग करण्याची इच्छा झाल्यास आधीं घरांत त्याप्रमाणें शान्तामामीला चोवीस तासांची नोटीस देणें.

४. 'सू' ला 'ऊं' करायला लावण्याइतकें तिच्याशीं प्रेमानें न वागणें.

५. कधींकाळीं पाणी नळाला आलेंच तर, प्रथम आपण तो जाऊन धरणें आणि त्याप्रमाणें शान्तामामीला तोंडीं नोटीस देणें.

मीं यांतला एकहि नियम पाळला नाहीं.

शान्तामामीकरितां बरेचसे नियम होते त्यांपैकीं माझ्या कानांवर आले ते मी सांगतों—

१. सुलोचनेच्या तोंडांत तोंड घालून घटकान् घटका न बसणें. जर

यदाकदाचित् ती लहर आलीच तर त्याप्रमाणें. निदान बारा तासांची नोटीस देणें.

२. मामांशीं उगीच वितंडवाद घालीत न बसणें. जगांत कसें वागायचें हें त्यांना स्वतःपुरतें पूर्णपणें कळतें आहे. तरी त्यांना तत्त्वज्ञान शिकविण्याच्या भरीस न पडणें.

३. स्त्रियांच्या असेंब्लीशीं फटकून वागणें. आणि घरांतला पतिपत्नी-कलहप्रसंग उठावदारपणें दुसऱ्यांना वर्णन करून सांगण्याच्या भरीस न पडणें.

४. दोन महिन्यांकाठीं एकदां नाटक. नाटक कंपनी नसल्यास परगांवाहून तिला बोलावण्याची आम्ही जबाबदारी घेणार नाहीं. मात्र नाटकाच्या वेळीं सुलोचनेच्या तोंडांत बोळा घातला पाहिजे.

५. मनांतला राग वस्त्रप्रावरणांशीं झोंबाझोंबी खेळून प्रदर्शित न करणें. ( उ० रागानें लुगड्याला दांडीवरून खसकन् ओढणें, धुतांना चार धपाटे जास्त देणें, इत्यादि. ) राग प्रदर्शित करण्याचें काम लेखनद्वारें करावें. कागदांचा खर्च समाईक.

अशा प्रकारचे पुष्कळच नियम होते, पण ते सर्व शान्तामामी धाब्यावर बसवीत असे. या नियमबद्ध घरांत मी शिरलों आणि त्या दिवसापासून नियमांना पोटनियम देण्याची नवीन पद्धत अमलांत आली. शान्तामामीचा नियम होता कीं घरांतल्या मोरींत पुरुषांनीं केव्हांहि हात धुतां कामा नये. आणि ओले हात लोकांच्या अंगावर उडवतां कामा नये. मी गेलों त्या दिवसापासून त्या नियमाकडे दुर्लक्षच करण्यांत आलें. 'ती पाटी पाहिली का' म्हणून शान्तामामीनें मामांना 'येथें हात धुऊं नयेत' अशा अक्षरांची पाटी दाखवली. मामांनीं मुकाट्यानें पाटी उचलून चुलींत घातली. मामी थोडीशी रागावल्यासारखी दिसली. पण मामा हंसत म्हणाले, "सर्वांना सारखा कायदा पाहिजे. हा पोरगा आतां इथं हात धुऊन गेला. तूं त्याचं तोंड पुसलंस. कायदेभंग केल्याबद्दल तोंडांत का मारली नाहींस त्याच्या? तो तुला गद्दा देणार आहे आणून अन् मी तुला लुबाडणार आहें? पंक्तिप्रपंच करणाऱ्या स्त्रीला पाप लागतं—"

मामी कांहींच बोलली नाहीं. लांकडावर लांकूड जोरानें घांसलें गेल्याचा भास झाला असेल कदाचित्.

मामामामीच्या या सरकारी दरबारी संसारांत मी येण्याचेपूर्वी चांगल्या सज्ञान न्यायाधीशाच्या अभावीं सुलोचना न्यायनिवाड्याचें पवित्र काम करीत होती. पण हा लाळ्या न्यायाधीश बऱ्याचशा बाबतींत अगदींच कच्चा होता. आणि दोन्ही बाजूंच्या पक्षकारांनीं आपआपलीं विधानें ठांसून मांडण्याची तयारी दाखवली कीं तो गोंधळून जाई. शेवटीं निकाल जाहीर करण्याच्या वेळीं तो अगदीं रडकुंडीस येई. कधीं कधीं या लोकांच्या मूर्खपणाविषयीं अनुकंपा उत्पन्न होऊनच कीं काय तो रडत रडत निकाल जाहीर करी. आणि न्यायाधीशानें रडत रडत दिलेला निकाल बहुत करून निकालांतच निघे ! त्यांतून न्यायाधीशाला पगार मिळे शान्तामामीकडून; आणि मधून मधून खाऊची लांच होतीच. त्यामुळें मौज ही होई कीं, शेंकडा नव्वद केसिस शान्तामामी जिंके. एकंदरीनें जगांतल्या सडेतोड न्यायनिर्णयाच्या कामांत मुरलेल्या न्यायाधीशाची दरबारला अत्यंत गरज वाटत होती. शान्तामामी न्यायाधीश बदलायला मुळींच तयार नव्हती. पण मामांनीं तिला छट् करून उडवून लावलें.

आतां सांगायला हरकत नाहीं. मीसुद्धां सुलोचनेप्रमाणें लांचखाऊ होतों. प्रथम प्रथम मीं अगदीं परमेश्वराला साक्ष ठेवून निकाल देत होतों. मामांचा माझ्यावर विश्वास बसला हें दिसतांच मी शान्तामामीकडे पारडें झुकतें ठेवूं लागलों. सुलोचनेला मात्र ज्या जागेंत न्यायाधीशाचें काम मिळत होतें त्याच जागेंत कधीं कधीं आरोपी म्हणून उभें राहावें लागे. पण पोरगी मोठी धीराची. जगामध्यें हे असे चढउतार कधीं ना कधीं तरी यायच्चेच, शहाण्या माणसानें काळ येईल तसें फिरलें पाहिजे, हें तत्त्व तिला पटलेंसें दिसलें. उलट जडजोखमीची कामगिरी परस्पर गेली ह्यांतच तिला आनंद वाटूं लागला. एके दिवशीं एक मजेचा खटला कोर्टापुढें आला.

फिर्यादीचें म्हणणें साद्यंत देतों—" मी काल संध्याकाळीं ऑफिसचें काम करीत होतों. ऑफिसचें काम घरीं न करण्याचा कोठेंच कायदा

नाहीं, पण आमच्या घरांत तसला एक विलक्षण कायदा आहे. तो कायदा अन्यायी, जुलमी आणि अप्पलपोटेपणाचा आहे हें माझें ठाम मत आहे."

"माझं मत तसं नाहीं"–आरोपी. "आरोपीनें मध्येंच तोंड घालण्याचं कांहींच कारण नाहीं. साहेबांनीं माझं आधीं ऐकून घ्यावं"–फिर्यादी. "मीं गैरकायदा वर्तन केलं असं मला मुळींच वाटत नाहीं. मी काम करीत होतों. हिनं—आरोपीनं ह्या मुलीला टेबलावर आणून ठेवली. मीं तिला—आरोपीला—बजावून सांगितलं कीं हें माझ्या व्यक्तिस्वातंत्र्यावर नियंत्रण आहे. हा अन्याय आहे. मी फिर्याद ठोकीन. आरोपी माझ्या म्हणण्याकडे लक्ष न देतां 'आहे माहिती' म्हणून म्हणत हंसूं लागला. मला त्रास व्हावा म्हणून आरोपीनं माझे डोळे हातानं झांकून टाकले. ( इश्श्—आरोपी. हा चावटपणा न्यायाधीशासमोर करणं म्हणजे न्यायाधीशाचा अपमान करण्यासारखं आहे—फिर्यादी. ) अर्थात् कामाच्या वेळेला मला ही थट्टा मुळींच रुचली नाहीं. मी कोर्टांत जाण्याची आरोपीला धमकी दिली. महाराज, न्यायाधीशसाहेब, आरोपीचे शब्द टिपून घेण्याजोगे आहेत. आरोपी चक्क म्हणाला कीं, 'आहेत तुमचे न्यायाधीशसाहेब माझ्या ओळखीचे. अहाऽरे न्यायाधीश! रात्रीं झोंपेंत बडबडतात. अंगणांत एकटे जायला भितात. लंगोटी नेसवायलासुद्धां दुसऱ्याची मदत '—साहेब, माझ्या मतें हा धडधडीत कोर्टाचा अपमान आहे. कोणत्याहि न्यायाधीशाला हे शब्द ऐकवणार नाहींत—( कानांत बोटं घालून बसा मग—आरोपी. ) हें वर्तन अत्यंत गर्हणीय आहे. याचा मी बुद्धिपुरःसर निषेध करतों—"

मी मध्येंच म्हणालों, " ए मामी, भूक लागली. जेवायला वाढ ना—"

" इश्श्! ते निषेध कां कायसंसं करीत आहेत त्याला टाळी द्या, न्यायाधीशसाहेब! म्हणे भूक लागली?—" शान्तामामीनें माझे हात धरून टाळी वाजवायला मला भाग पाडलें. मामांनीं आपली जबानी पुढें चालू केली—

" हा अतिप्रसंग गर्ह्य आहे. ही कोर्टाशीं लढालढी उपयोगाची नाहीं. कुठल्याहि कोर्टांत आरोपीनं न्यायाधीशाकडून बळजबरीनं टाळी वाजवून

घेतलेली नाहीं. मी निषेध करतों हें टिपून घ्यावं." जबानी पुढं चालू. "बराच वेळ आरोपी आपल्या आपल्याशींच पुटपुटत होता. पण मला त्रास होत होता. मी शेवटीं आरोपीला पाठींत धमकलाडू देण्याच्या अगदीं बेतांत होतों. हं! खबरदार! बोलूं नकोस मधें. साहेब, इतक्यांत एक अचानक गोष्ट घडून आली. या पोरीनं—पण जाऊं द्या. तसल्या गोष्टी सभ्य लोकांत बोलण्याच्या नसतात म्हणून मी त्याचा उच्चार करीत नाहीं. माझा वेळ मोडला. कागद खराब झाले. मला दुप्पट त्रास झाला. कोर्टानं काय तो योग्य निकाल देऊन या एका गरीब हळहळणाऱ्या जीवाचं समाधान केल्याचं श्रेय घ्यावं. आणि आजपर्यंत कोणत्याहि कोर्टांत न घडलेली अशी ही गोष्ट असली तरी मी न्यायाधीशाच्या मायाळू वर्तनाचा फायदा घेऊन सूचना करतों कीं, आठवण राहील अशी शिक्षा आरोपीला फर्माविण्यांत यावी. मला वाटतं, आरोपीला माहेरहून दहा रुपयांची दिवाळींत ओवाळणी आलेली आहे ती जप्त करण्यांत यावी. त्याचा उपयोग न्यायाधीशांच्या सल्ल्याबरहुकूम मी गंधर्व नांवाच्या गृहस्थाला द्यायला उद्यांच्या रविवारीं एका पायावर तयार आहें—"

"तर तऽर" म्हणून मामीनें तोंड फुगवून या टोंकापासून त्या टोंकापर्यंत मान हालवली.

"कोर्टानं आरोपीची जबानी घ्यावी—" मामा हंसून म्हणाले. पण कोर्टाला जबानीची गरजच नव्हती.

"मामी, जेवायला वाढत असलीस तर बरं आहे. नाहीं तर मी झोंप घेईन." कोर्टानें निकाल दिला. पण हा निकाल न्यायाधीशाला आवडलेला असला तरी दोन्ही पक्षांना पसंत नव्हतासें दिसलें. टेबलावरच पोटाशीं पाय घेऊन पसरलेल्या कोर्टाला जागें करीत मामी आपली जबानी त्याला ऐकवूं लागली.

"सदू, तूं माझं ऐकून घेतोस का—?" मामीनें हंसत सुरुवात केली.

"हं. ह्याला मी हरकत घेणार. कोर्टाला नांवानं हांक मारण्याची पद्धत नाहीं. कोर्टाच्या नांवानं हांका मारण्याबद्दल माझं कांहींच म्हणणं नाहीं." मामा म्हणाले.

" हें पहा, मला तें कांहीं समजत नाहीं. त्याला लागली आहे भूक. चल रे, मी तुला जेवायला वाढतें." म्हणून म्हणत शान्तामामीनें कोर्टाला कडेवर घेतलें. मामांनीं पुन्हां मला जाग्यावर बसवलें आणि हातानें शान्तामामीला धरून माझ्यासमोर तिला उभें केलें.

" कोर्टाचा 'मंगलमूर्ति मोरया' करतेस काय ? निदान हिंदुस्थानांत तरी कोर्टाची अशी गठडी आम्ही वळूं देणार नाहीं."

" सदू , तूं रड रे मोठ्यांदा; म्हणजे मग पहातें यांचं कोर्टन् फिर्ट—" मामीनें मला उपदेश केला.

" हें असं सांगून तूं पूर्वीच्या न्यायाधीशाला चिथवून सोडीत होतीस म्हणून हा न्यायाधीश मी मुद्दाम पुण्याहून मागवला आहे. सदू , तूं रडलास तर तोंडांत खाशील बघ. " मामा म्हणाले.

" हं; काय बोलूं ?" म्हणून म्हणत मामीनें हंसायला सुरुवात केली.

" जबानी दे—अन् टेबलावर पाय ठेवलास तर तंगडं तोडून टाकीन—" मामा म्हणाले.

" माझा गुडघा दुखतो आहे. मी मधाशीं नळावर पडलें म्हणून मी आधार घेतें आहें. " मामी म्हणाली.

" तुझा गुडघा दुखतो त्याला न्यायाधीश काय करणार ? मी कांहीं चोळणार नाहीं. " मामा म्हणाले.

" इश्श् !" म्हणून म्हणत मामीनें चटकन् स्वयंपाकघरांत पलायन केलें. त्या दिवशीं मी झोंपेंतच जेवलों. मधून मधून मामी कांहीं तरी बोलत होती. मला वाटतें, न्यायाधीशाच्या झोंपेचा फायदा घेऊन आपण स्वतःच न्याय देत असावी. जेवतांना एकदम धक्का बसल्यासारखें झाल्या-मुळें मीं डोळे उघडले.

" कोणाची चूक आहे ? हिची ना ? हिच्याजवळून दहा रुपये घ्यायचे ना ?" मामा मला विचारीत होते.

" सदू , भात नाहीं वाढणार बघ. खरं सांग—हापिसचं काम घरीं करणं बरं का ? यांनींच दहा रुपये द्यायला पाहिजेत ना ?" म्हणून म्हणत मामी माझ्या पानापुढें उभी होती. शेवटीं ह्या त्रासाला कंटाळून मी मामांच्या-

कडे बोट दाखवलें. त्याचा अर्थ मामा दोषी आहेत असा झाला. मामा चटकन् माझा पाट ओढून म्हणाले.

" अरे चोरा ! ऊठ—ऊठ इथनं. इतकी तुझी बाजू धरली तरी शेवटीं तूं उलटलासच—" मामा म्हणाले.

मामीनें " हें काय हें—? जेवतांना काय त्याला उठवायचं " म्हणून म्हणत मला उचलून चुलीपाशीं नेलें. मी मुकाट्यानें तिचा हात तोंडाशीं आला कीं, 'आ' करीत होतों. बाकीचें काम ते ते अवयव उरकीत होतेच.

कोर्टाचें काम सुरुवातीस रात्रीं नऊच्या पुढें भरत असे. पण न्यायाधीश फार झोंपाळू असल्यामुळें कैक वेळेला न्यायाधीश झोंपेंतच न्यायदानाचें काम करीत असत. तेव्हां उगीच अनर्थ ओढवयाला नको, जें करायचें तें शिस्तवार झालेलें बरें, या विचारानें कोर्ट मग संध्याकाळीं सात वाजतां भरूं लागलें.

या खटल्याच्या निकालानंतर दोनतीन दिवस मामा अगदीं विचारांत गढून गेल्याप्रमाणें दिसत होते. मी कारण विचारतां त्यांनीं 'गंधर्वाचं देणं द्यायचं आहे' असेंच कांहींसें उत्तर केलें. मला त्यांत कांहींच कठिण दिसेना. बोलवावें त्या मनुष्याला घरीं अन् घे म्हणावं तुझे पैसे ! त्यांत काय आहे ?

रविवारीं सकाळीं मामा हंसत हंसत मामीला म्हणाले, "तुझ्याजवळचे दहा रुपये देतेस का ? मी तुला उद्यां त्याच्यावर एक आणा व्याज देईन. पहा, व्याज-बट्टयाचा व्यापार करायला तुझी तयारी असेल तर ?" मामीनें मान हालवून म्हटलें, " माझ्या ट्रंकेला कुणी हात लावलेला मला खपणार नाहीं. अन् आज नाटकाला यायची माझी मुळींच तयारी नाहीं—"

" अन् मग हीं तिकिटं ?—ह्याची काय वाट ? " म्हणून मामांनीं खिशांतून तीन रंगीत चिठ्या काढल्या. मला आश्चर्यच वाटलें. मामांनीं माझी समजूत घालण्याकरितां 'अरे पैसे पोहोंचल्याच्या ह्या पावत्या दिलेल्या आहेत त्यानं' म्हणून म्हटलें. मीं त्या बाबतींत विचार करण्याचा नादच सोडून दिला. त्या दिवशीं मीं बरेचसे शोध लावले. जें थोडेसें आठवत आहेत तें देतों—

१. गंधर्व नांवाचा गृहस्थ बुवा नसून बाई आहे. २. मामा म्हणतात कीं तो फार चांगलें गाणें म्हणतो. मला नाहीं तसें वाटत ! मला तर त्याच्या गाण्याचा कंटाळा येतो. शान्तामामी म्हणते तोंडानें, कीं गाणें आवडतें म्हणून, पण गाणें चालू झालें कीं पिस्ते खायला सुरुवात करते. ३. ह्या गाण्याला आणि थोड्याशा बोलण्याला नाटक म्हणून म्हणतात. पण नाटकांतलें गाणें काढून टाकलें तर नाटक पहाण्यांत मौज असते.

मी त्या दिवशीं प्रथमच नाटकाला जाणार असल्यामुळें मला बरीचशी मौज वाटली. शान्तामामीनें मामांनीं नवीन आणलेली फरकॅप माझ्या डोक्यावर ठेवली. नाटकाला जाणें म्हणजे कुठें तरी लग्नाला जाणें हीच माझी कल्पना. चार मंडळींत जायचें, तेव्हां गैदीपणा उपयोगाचा नाहीं या विचारानें मी वाहाणा जास्त काळ्या दिसण्याकरितां त्यांना शाई फांसून ठेवली. पण हात मात्र काळे झाले. 'सू'चा थाट कांहीं विचारायला नको. मीं तिला एकीकडे नेऊन बजावून सांगितलें, "सुले, आपल्याला नंगनाला जायचं आहे. बघ, तुला तोपी पाहिजे का ? तिथं रडूं बिडूं नकोस. कुणाजवळ खायला मागायचं नाहीं,—अन् माझं बोट सोडायचं नाहीं." तिला यांतलं काय समजलें देव जाणें. उत्तराऐवजीं तिनें माझ्याकडे पाहून हातानें टाळ्या मात्र वाजविल्या. आमच्या सर्वांच्या वस्त्रप्रावरणांत थोडा फार फरक होताच. मामीनें कपड्यांत फारसा बदल केला नव्हता तरी पण लुगडें कलाकुसरीनें, काळजीनें नेसलेलें होतें यांत शंका नाहीं. फक्त मामांनीं मात्र कांहीं बदललेलें नव्हतें.

आम्हांला बसायला खुर्च्या—विशेषतः मला सबंध खुर्ची मिळाल्या-कारणानें मला त्या गंधर्व गृहस्थाविषयीं आदर वाटूं लागला. फिरत्या पंख्यांपैकीं एखादा जर आपल्याला घरीं नेतां आला तर—? मला घरीं नेण्याजोगें बरेंचसें सामान तेथें दिसून आलें. बऱ्याच वेळानें आमच्या शेजारीं एक पगडीवाले गृहस्थ आणि त्यांच्या शेजारीं एक शाल पांघरलेली बाई इत्यादि मंडळी येऊन बसली. इतक्या लोकांना गंधर्व गृहस्थाचे पैसे देणें आहे—तेव्हां तो गृहस्थ बराच श्रीमंत असला पाहिजे हा तर्क मीं मनाशींच बांधून ठेवला. माझी अन् त्याची गांठ पडली तर मीं निदान

ती घंटा आम्हांला खेळायला मागून घेण्याचें ठरविलें. नाटक सुरू झालें. पडद्याचीं घरें पाहून आपणहि तसेंच पडद्याच्या घरांत रहायला काय हरकत आहे, म्हणून मीं शान्तामामीला विचारलें. पण त्या पगडीवाल्या गृहस्थानें 'शूः' करून माझ्याकडे डोळे वटारून पाहिलें. मी मनांत त्याला शत्रु समजूं लागलों; अन् गंधर्वाला सांगून त्याला हांकलून लावण्याचें ठरवून टाकलें.

मला त्या दिवशीं बरेचसे प्रश्न शान्तामामीला विचारायचे होते. 'तूं कां ग असं गाणं म्हणत नाहींस?' या माझ्या प्रश्नाला 'बोलूं नये; नुसतं पुढं पहावं' हें उत्तर आलें. 'तुला गाणं आवडतं का?' या प्रश्नाचीहि 'तुला बोलूं नको म्हणून सांगितलं ना!' या उत्तरानें वासलात लागली. माझ्या कोणत्याच प्रश्नाचें धड उत्तर येईना हें पाहून मी संतापलों. "ए हे रे नाटक!—हें कसलं नाटक?" म्हणून मी चिडून ओरडलों. आजूबाजूच्या चारदोन लोकांनीं माझ्याकडे दुर्बिणी लावून पाहिलें. कांहींनीं माझ्या ह्या विधानाचें कौतुक केलें. कांहींनीं 'काय विलक्षण कार्टे आहे पहा' म्हणून माझ्या अस्तित्वाबद्दल खेद प्रदर्शित केला. आमचे पगडीवाले गृहस्थ माझ्याकडे लाल डोळ्यांनीं पहात, बरोबरच्या शालींतल्या बाईला उद्देशून मला ऐकूं जाईल अशा बेतानें पुटपुटले, "अन् तूं म्हणतेस मुलं पाहिजेत? आपण सुखी नाहीं त्यापेक्षां? सारखा मघागसून राक्षसासारखा ओरडतो आहे?" 'बरं आहे बच्चंजी!' मी मनांत पुटपुटलों.

मामांना अन् मामींना नाटक आवडलें असलें तरी मी खरें सांगतों मला नाटक मुळींच आवडलें नाहीं. माझ्याप्रमाणें सुलीलादेखील नाटकांत कांहींच मजा न वाटल्यानें तिनें मामीच्या मांडीवर घोरायला सुरुवात केली होती. लोक टाळ्या कां देतात हें कांहीं मला समजलें नाहीं. मीसुद्धां टाळी वाजवणार होतों, पण त्या पगडीवाल्याला कदाचित् पुन्हां फेंफरें यायचें या भीतीनें तो विचार मीं अमलांत आणला नाहीं.

घरीं आल्यावर मामांना माझा अभिप्राय मीं कळवला. मामांनीं गंभीर मुद्रा करून मामीला म्हटलें,

"हा बघ, पुणेरी भटजी काय म्हणतो आहे तें."

" गाजरपारखी आहे तो. त्याला काय त्याची चव ! " मामीनें लुगड्याला हात पुशीत म्हटलें.

" अन् तुला मात्र पिस्त्यांचा खुराक चालू ठेवला म्हणजेच नाटकाला यावंसं वाटतं ? " मामा म्हणाले. मामी हंसत हंसत आंत निघून गेली. मामा आंत जाऊन पाटावर बसले.

" बाकी सगळेचजण नाटक पाहाण्यासाठीं थिएटरांत जातात असं नाहीं. कांहीं कांहींजण स्वतःचं नाटक लोकांना दाखवण्याकरतांहि जात असतात. माझ्या लहानपणीं, म्हणजे आमचे पिताजी हयात होते तेव्हां, मी नाटकाला त्यांच्याबरोबर जात असें तें विदूषकाचं काम पाहाण्याकरतां जात असें. नाटकाला जाणाऱ्या लोकांमध्यें बरेचसे गायनप्रेमी असतात— निदान आम्ही तसें आहोंत असं दाखवण्याचा प्रयत्न करतात. आतां तुझा एक प्रश्न सोडून दिला तर, शेंकडा नव्वद बायका नाटकाला जातात तें नवऱ्याच्या खिशाला भोंक पडावं म्हणून किंवा शेजारच्या कमलाविमलांपुढं शेखीनं मिरवायला यावं म्हणून ! मी म्हणतों तें खरं कीं नाहीं ? "

" माझा एक प्रश्न सोडून देण्याचं काय म्हणालांत ? " मामींनीं विचारलें.

" तें होय ? अग ती तुझी स्तुति केली. म्हटलं तुला स्तुति आवडते— अन् स्तुति बाजारांतून पैसा टाकून आणावी लागत नाहीं—तेव्हां—" म्हणून म्हणत मामा हंसूं लागले.

या सुखाच्या संसारांत मी शिरलों होतों. चार वर्षें कशीं निघून गेलीं तें मला कळलेंसुद्धां नाहीं. मधून मधून बाबा माझ्या शिक्षणाची चांचणी परीक्षा घेण्याकरितां मुंबईस येत असत. त्यांच्या पसंतीस मी कधींच उतरलों नाहीं. आई एकदां आली होती. तिनें मामीस माझ्याविषयीं विचारतांच—मामीनें सरळ उत्तर दिलें, " कांहीं नाहीं बाई त्याचा त्रास. उलट सुट्टी म्हणा, सण म्हणा, कांहीं असलं कीं उलट त्याची मला करमणूकच होते. रडत नाहीं. हट्ट घेत नाहीं. कांहीं नाहीं— "

माझ्याविरुद्ध कोठेंच कांहीं दिसेना म्हणून आई गोंधळांत पडल्यासारखी दिसली.

" दैव झालं आपलं. मला पाहिलं कीं त्याच्या अंगांत वेड येतं. त्याला आई म्हणजे दुस्मन् वाटते. गांवांतल्याशीं तो अगदीं सरळ वागतो. माझेच काय ऋणानुबंध असतील पूर्वजन्मींचे, देवजाणे! आपलंच पोर—उरापोटीं बाळगून खस्ता खाल्ल्या—पण त्याला त्याचं काय? कुठं का राहीना, खुशाल असला म्हणजे मिळवली. मला त्याच्यापासून कशाचीसुद्धां इच्छां नाहीं!"

मामी कांहींच बोलली नाहीं. आई गेल्यावर मात्र तिनें मला धरून म्हटलें, " सदू, गुलामा, तुला इतका कां रे मामीचा ळळा? चांगली सोन्यासारखी आई असतांना मामीच्या मायेची तुला कां आवड? सदू, तुझी आई मीच. तुला नांवारूपाला आणीन तेव्हांच राहीन."

---

# प्रकरण १० वें

## नाटक मंडळी

मुंबई फार दिवस मला लाभली नाहीं. आपुलकीची भावना वाटायला सुरुवात होण्यापूर्वींच मामांची बदली पुण्यास झाली. अर्थात् त्यांच्याबरोबर मीहि समुद्रकिनाऱ्याच्या हवेला रामराम ठोकून आपली घाटमाथ्यावरची, जन्मभूमीची हवा खायला आलों. पुण्यांत असतांना आईच्या धाकामुळें बहुतेक मी, सर्व शहर हेंच माझें पटांगण, या मोकळ्या भावनेनें वावरत होतों; पण मुंबईला जाऊन मी अगदीं घरकोंवडा बनलों होतों. शाळेमध्यें बहुतेक मुलें दूरचीं येणारीं असत—त्यांना गाडीच्या अन् ट्रॅमच्या टाइमटेबलापुढें दुसरें सुचत असेल तर ना मैत्रीची गोष्ट काढायची? चार दिशांहून, चार तऱ्हांच्या वाहनांतून, आणि चार तऱ्हांचे पक्षीगण सकाळीं एके ठिकाणीं जमत आणि संध्याकाळीं चौफेर उडून जात! त्यांचें माझें कसें पटणार?

त्यांतून माझा स्वभाव मला जिथें तिथें नडे. ‘पुण्याचा तात्या’ म्हणून मला पारशांचीं मुलें चिडवीत. ‘हा बघ मुलगा पुण्याचा—’ म्हणून इतर मुलें माझ्याकडे अजबवस्तुसंग्रहालयांतील वस्तूकडे पाहाण्याच्या दृष्टीनें टवकारून बघत. मुंबईमध्यें ‘पुण्याचा मुलगा’ हा एक शिवीचा भाग समजला जातो. लहानपणापासून मुलें प्रांतिक अभिमान कसा उचलतात हें पाहाण्यासारखें आहे. या कारणानें मी त्या मुलांशीं कधींच मिळून मिसळून वागलों नाहीं.

मुंबईची हद्द संपल्याबरोबर मी समाधानाचा श्वास सोडला. बाबा आणि आईची मूर्ति जर डोळ्यांपुढें नसती तर, पुण्याला जाणें म्हणजे स्वर्ग हातीं येणें अशी कल्पना बांधायला मीं कमी केलें नसतें ! तरी पण आतां मामा, मामी बरोबर येणार असल्यामुळें पूर्वींइतका कांहीं त्रास होणार नाहीं या विचारानें मला थोडेंसें बरें वाटलें. शेलारवाडीच्या पुढें गेल्यावर तर मला सारखी उत्कंठा लागून राहिली.

पुण्यांत गेल्यावर काय काय करायचें ह्याची तपशीलवार यादी मीं मनांत करून ठेवली. प्रथम बन्या, नंतर चंपी आणि कंपनी. नंतर दत्तू आणि मंडळी. नंतर उद्यां सकाळीं सबंध गांवभर कुठें कुठें नवीन घरें बांधलेलीं आहेत, कुठें कुठें नवीन रस्ते पाडलेले आहेत—एक लांबलचक चक्कर मारायची. पण सर्वांच्या आधीं माझें लहानपणचें खेळ ठेवण्याचें कपाट शोधून पाहायचें. नंतर ग्राउंडवर जाऊन सगळ्या सोबत्यांना ‘रामराम’ करायचा.

टांग्यांतून जातांना मी सुलीला बरींच ऐतिहासिक ठिकाणें सविस्तर माहिती देऊन दाखविलीं. मामांनासुद्धां मी ‘हा पहा आमचा बुधवारचौक’ म्हणून तें रम्य ठिकाण त्यांना आळेंबळें दाखवलें.

“अस्सं का ! अरेच्या ! ह्याला बुधवारचौक म्हणतात काय ?” म्हणून म्हणत मामांनीं हंसायला सुरुवात केली.

मी घरीं जाण्याचा अवकाश, कीं बन्या ताबडतोब धांवत आला. बन्या बराच मोठा झाला होता. पूर्वींचा त्याचा तो मळका सदरा, ढिगळांची विजार—इत्यादि थाठ आतां पार बदलला होता.

बन्यानें मी टांग्यांतून उतरतांच इहवृत्त सांगण्यास सुरुवात केली— " आपली चंपी मेली. तिचा मोत्या अन् शित्याच काय ते शिल्लक राहिलेले आहेत. बाकीचीं पिलं लोकांना देऊन टाकलीं. आमच्या विहिरींत परवां एक पाणबुड्या उतरला होता. मीं स्वत: त्याला उतरतांना पाहिलं—" इत्यादि सटरफटर वृत्तान्तानंतर मला त्यानें मुंबई शहराच्या रचनेची माहिती करून देण्यास सांगितलें. चंपीच्या ह्या अकालीं मृत्यू-मुळें जीव होरपळलेला असल्यामुळें आणि मुंबईची रचना दोन वाक्यांत सांगतां येण्याचें साधेलसें न दिसल्यामुळें, मी त्याला ' उद्यांचा ' हवाला देऊन घरांत गेलों. तरी पण 'मुंबई आपल्या पुण्याच्या येवढी मोठी आहे का ?' म्हणून विचारीत बन्या माझ्या पाठोपाठ आला.

लहानपणीं बन्या ज्याप्रमाणें इतिहासाची कसरत करीत असे त्याप्रमाणें मी बन्याला आतां भूगोलाच्या ज्ञानानें दिपवून टाकूं लागलों. मुंबईच्या रचनेसंबंधानें लिहितांना कोणत्याहि भूगोलज्ञाला फार फार तर दहा मिनिटांच्यावर वेळ लागला नसेल—पण मी बन्याला शब्द-मित्राच्या सहाय्यानें दहा दिवस सारखा मुंबईत खेळवत होतों.

" अरे, कांहीं विचारूं नकोस. आपल्या पुण्यासारखीं शंभर गांवं एके ठिकाणीं ठेवलीं म्हणजे एक मुंबई होईल. पुण्यांतलीं शंभर घरं एकावर एक ठेवलीं म्हणजे मुंबईचं एक घर होईल. आपल्या मुळामुठा नदी-सारख्या हजारों, लाखों नद्या एके ठिकाणीं वाहायला लावल्या म्हणजे एक मुंबईचा समुद्र होईल. पुण्याला शंभर दिवसांत जेवढ्या गाड्या येतात तितक्या मुंबईला एका दिवसांत येतात. अन् पुण्याला ट्रॅम कुठं आहे ? आमच्या मुंबईला तर रस्त्यावरसुद्धां आम्ही डांबर टाकतों! " मी म्हणालों.

" मग तुम्हीच भिकारी व्हाल. आमचं काय त्यांत जाणार आहे ?" बन्या म्हणाला.

" अरे जा ! मुंबईला आम्ही कधींच भिकारी होणार नाहीं. अन् मामा तर म्हणतात कीं मुंबईला आपल्या लोकांच्या बायका लुगड्यानं रस्त्याचा केर काढीत जातात. आतां मी प्रत्यक्ष तसं पाहिलं नाहीं पण

मामा सांगतात तें कांहीं खोटं असणार नाहीं. बोल, तुमच्या पुण्याला आहे असं ? " मी म्हणालों.

" आमच्या पुण्याला विजेचे दिवे आणले आहेत आतां आम्ही—" बन्या मोठ्या आशेनें म्हणाला.

" त्यांत काय आहे ! मुंबईला तर आम्ही मौज म्हणून दिवसांसुद्धां विजेचे दिवे लावतों. मामांच्या हपिसांत तर सारखे दिवे लागलेले असतात. " मी जोरानें म्हणालों. बन्या अगदीं नामोहरम झाला. जयाची म्हणून कुठेंच बाजू दिसेना तेव्हां तो अगदीं निराश झाला. शेवटीं माझी मलाच लाज वाटून त्या दुःखी जीवाचें मी सान्त्वन करूं लागलों— " जाऊं दे रे बन्या. खरं सांगायचं म्हटलं म्हणजे मुंबई कितीहि चांगली असली तरी ती तुला नि मला कांहीं उपयोगाची नाहीं. मला तर मुळींच करमत नव्हतं मुंबईला. मुंबई ही इलाख्याची राजधानी आहे; पण पुणें ही आपली—तुझी अन् माझी—राजधानी आहे. आपल्या पुण्याला पर्वती आहे. मुंबईला पर्वती नाहीं. पुण्याला शनवारवाडा आहे—मुंबईला शनवारवाड्याची एक वीटसुद्धां दृष्टीस पडणार नाहीं ! "

बन्याला हे मुद्दे पटले. याच धर्तीवर त्यानें पुण्याला आपल्या घरांत विहीर आहे, मुंबईला कुठं आहे विहीर ! इत्यादि बरेचसे खोचदार प्रश्न विचारले. आम्ही एकमतानें पुण्यनगरी श्रेष्ठ ठरवून तो विषय दप्तरीं दाखल करून टाकला. " तरी पण मी एकदां केव्हां तरी मुंबईला जाणार आहें." बन्या थोडासा विचार करून म्हणाला; " निदान—मुंबईतल्या लोकांना आपल्या पुण्यांतल्या गोष्टी सांगून त्यांची फजिती उडवण्याकरितां तरी एकदां जाऊन आलंच पाहिजे. " बन्यानें आपलें वाक्य पुरें केलें. पण बन्याचा हा विचार अमलांत येण्यास बराच अवधि आहे, आणि मुंबईचे लोक याचें ऐकून घ्यायचें असलें तर घेतील, आपल्याला त्या भानगडींत पडण्याचें कांहींच कारण नाहीं ! या विचारानें मी तेव्हां कांहींच बोललों नाहीं.

चारपांच दिवसांनंतर मामा डेक्कन जिमखान्याच्या बाजूस राहाण्यास गेले.

अर्थात् शाळा लांब पडेल म्हणून मला गांवांतच आमच्या घरीं राहावें लागलें. आईनें बराच आग्रह केला, पण शान्तामामीनें राहाण्याचें कबूल केलें नाहीं. ‘आधीं कडू नि मग गोड’ असंच कायसेंसें ती आईला म्हणाली. अर्थात् मला दोन्ही घरीं मुक्तद्वार होतें. शनिवार रविवारच्या सुट्टींत धांगडधिंगा घालायला मिळावें म्हणून मी मामीच्याकडे जात असें. पुढें पुढें बन्यासुद्धां माझ्याबरोबर येऊं लागला. आणि याच सुमारास आमची नाटक कंपनी निघाली. सत्यसृष्टींतल्या नाटक कंपन्यांप्रमाणें क्षणिक लहरींतून तिचा जन्म झाला आणि त्याचप्रमाणें क्षणिक लहरीपायीं, फाटाफूट वगैरे होऊन, एक दिवसाच्या मिणमिण अस्तित्वानंतर ती विलयाला गेली! मंडळी सुरू करण्याच्या वेळेचा आमचा उत्साह पाहून कुणीहि ‘ही कंपनी चिरंजीव होणार,अखिल महाराष्ट्राला वेड लावून लोकांना कंगाल बनवणार’ इत्यादि तर्क बांधले असते तरी त्यांत वस्तुस्थितीचा रेंसभरदेखील विपर्यास होत नव्हता असेंच आम्हीं म्हटलें असतें. पण परमेश्वराला महाराष्ट्राची काळजी! आधींच ‘पैसा, पैसा’ म्हणून हांकाटी पिटणाऱ्या देशांत जास्ती पिळंगुटी करण्यांत अनर्थच माजण्याचा संभव आहे, असा विचार करून देवरायानें आमच्यांत कलि आणून सोडला. आणि कलिप्रसादें करून आम्हांस तो नाद सोडून द्यावेंसें वाटलें. तत्पूर्वी नाटक कंपनी निघण्याचा मूळ उद्देश काय होता हें पाहणें श्रेयस्कर आहे.

आमचा उद्देश लोकसेवा नव्हता, लोकरंजन नव्हता, किंवा कोणत्या फंडाला मदत करून दयाबुद्धि जागृत असल्याचा जाहीरनामा देण्याचा नव्हता. आमचा उद्देश स्वतःची करमणूक करून घेण्याचा होता. अगदींच स्वार्थी विचार होता हा. स्वार्थ झांकण्याकरितां गौरवयुक्त शब्दांची योजना करण्याची मी खटपट करणार नाहीं. आमच्याजवळचा संच शिकवून घडवितां येण्याजोगा होता. आम्ही सारेच अभिजात गवई होतों. बन्याच्या गायनकलेवर माझा तितकासा विश्वास नसल्यामुळें मीं शंका प्रदर्शित केली.

“मला गाणं येत नाहीं का? दाखवूं का म्हणून?” म्हणून रागानें म्हणत बन्यानें ‘विद्येनेंच मनुष्या आलें श्रेष्ठत्व या जगामाजीं’ ही ओळ

तारस्वरांत आळवून दाखविण्यास सुरुवात केली. त्याला आंवरतां आंवरतां माझ्या नाकीं नऊ आलें. याउप्पर शंका घेणें म्हणजे केवळ दुराग्रहाचें काम होतें. मीं त्याला आमच्यांतला प्रमुख गवई म्हणून मान देण्याचें तात्काळ कबूल केलें. पण अट ही कीं नाटकाच्या वेळेसच फक्त गायचें; इतर्वी गाऊन आवाजीची खराबी करायची नाहीं. त्यानें तें उदार मनानें मान्य केलें.

त्यानंतर कोण किती ओरडतो याची परीक्षा झाली. सगळ्यांच्या आवाजानें आई जागी झाली. "काय रे मेल्यांनो, दुपारीं जरा पडेन म्हटलं तर—" म्हणून आईचा आवाज ऐकूं येतांच मीं पटकन् ओरडून सांगितलें, "कांहीं नाहीं आई. तूं नको वरती येऊंस, आम्ही मांजराला हांकलून लावतों आहोंत."

त्यानंतर अतिशय बिकट प्रश्न येऊन पडला. स्त्रियांना नाटकांत कामें द्यावींत कीं प्रेक्षकांत नुसतें बसण्याचीं कामें द्यावींत, हाच तो प्रश्न. लहान मुलांमध्यें सुद्धां कांहींजण जुन्या मताला चिकटून राहाणारे असतातच कीं! आमच्यांत स्त्रिया म्हणजे एक सुलोचना आणि दुसरी दत्तूची बहीण मनूताई. दोघीहि वयानें लहान असल्या तरी हक्कांची जाणीव दोघींनाही तितकीच तीव्र होती. यांत आपल्याला कांहींच मान नाहीं, आपण नुसतें पहायला बसायचें, हें लक्षांत येतांच सुलीनें जें आकांडतांडव केलें तें विचारतां सोय नाहीं. "आम्ही तेवढ्या नुसत्या बसणारच काय? आम्हाला तेवढं कांहीं नाहीं. सगळं आपणच करायचं. थांब, मी मामीला सांगेन. ये तर तूं आमच्या घरीं. मी बोलणारच नाहीं तुझ्याशीं." वगैरे वगैरे होत्या नव्हत्या तेवढ्या धमक्या पुढें मांडण्यास ती चुकली नाहीं. थोडक्यांत निभावलें, नाहींतर मनूताई दत्तूच्या हाताला चावणारच होती. स्त्रीवर्गानें तर अगदीं निकराची बाजू घेतली होती. आणि पुरुषवर्ग गंभीर चेहरे करून पुनः पुनः विचार करण्यांत गुंग होता. स्त्रीवर्गातर्फे मी एक सुरेखसें भाषणसुद्धां केलें. पण कांहीं केल्या दत्तू आणि त्याचे भाऊ गुडघ्यांखली मान वर करीनात.

समभाऊसारख्या सुधारणाप्रिय बापाच्या हाताखालीं राहिलेलीं हीं

त्यांचीं मुलें इतकीं अनुदार मताचीं निघतात हें मला संभवनीयसुद्धां वाटेना. मीं गोडीनें सांगून पाहिलें; बन्यानें ओरडून सांगितलें; तरी पण त्या पठ्यांचीं मनें वळण्याचें चिन्हसुद्धां दिसेना. असल्या लोकांशीं निष्कारण उरस्फोड अन् कपाळझोड करण्यांत कांहींच मतलब नाहीं. पुराणमतवादी लोकांना पुराणांच्या जीर्ण पानांप्रमाणें कोनाड्यांत धूळ खात पडूं देण्यांतच शाहणपणा आहे, असा विचार करून मीं बन्याच्या विचारानें दत्तू आणि मंडळी निकालांत काढण्याचें ठरविलें. तरी पण शेवटचा प्रयत्न म्हणून मी म्हणालों, "दत्तू, हें रे काय तुझं असं वेड्यासारखं? मुली झाल्या म्हणून त्यांनाहि आपल्यासारखं खेळावंसं वाटत नाहीं का? अन् हें बघ, सुलोचना तर अगदीं पुरुषासारखं 'मी यतों, मीं जातों' म्हणून म्हणते; तर ती पुरुषच नाहीं का मग? एक येऊन जाऊन प्रश्न राहिला तो एकस्या मनीचाच. पण इतक्या लोकांत एक मुलगी सहज चालण्यासारखी आहे. बन्या, तुला कसं काय वाटतं?"

बन्याला कसें काय वाटतें तें त्यानें सक्रिय दाखवण्यास सुरुवात केली, "ऊठ आमच्याइथनं. तुला जर आवडत नसेल तर येऊं नकोस आमच्या घरांत." म्हणून म्हणत बन्यानें दत्तूला धरून फरकटत ओढलें. मीं मध्यें पडून मारामारीचा प्रसंग टाळला. दत्तू रागानें लाल होऊन ओरडला, "बन्या, तूं पुन्हां माझ्या अंगाला हात तर लाव. तुला शक्ति दाखवायची आहे काय?" राहिलेल्या दोघां बंधूंनीं दादाचें शेवटचें वाक्य उचलून "शक्ति दाखवायची आहे काय?" म्हणून म्हटलें.

शक्ति दाखवण्याची बन्याची मनापासून इच्छा होती; पण मीं त्याला आंवरून धरलें. शेवटीं दत्तूनें अगदीं कण्हत कुंथत एकदांची कबुली दिली. पोपटपंची करायची संवय असलेल्या खालच्या भावांनीं त्या कबुलीला दुजोरा दिला. इतक्या शान्तपणें हा सलोखा घडून आल्याबद्दल मला आश्चर्यच वाटलें.

नाटकाला बोलवायचं कुणाकुणाला हा पुढचा प्रश्न. शाळेंत 'टवाळ' म्हणून प्रसिद्धीस आलेल्या उदयोन्मुख गुंडांना बोलावणें म्हणजे आपण होऊन नसती संकटपरंपरा ओढवून घेण्यासारखें होतें. बन्यानें आणि मीं

चार दिवस प्रेक्षक हुडकून काढण्यांत बरेंच डोकें चालविलें. अगदीं तोंडावरची माशीसुद्धां उठविण्याची अक्कल नाहीं असले प्रतिनिधी आम्हीं निवडून काढले. पण तोंडावरून मनुष्याच्या स्वभावाची परीक्षा होत नसते हा अनुभव आम्हांस आला. अर्थात् तें ओघानें येईलच. सगळ्यांच्यावर वचक राहावा म्हणून शान्तामामीला आमंत्रण देण्याचें ठरविलें होतें. हेतु हा कीं वेळ आहे, केव्हां काय होईल तें सांगून थोडेंच होणार आहे? शान्तताभंग, दंगाधोपा—इत्यादि गोष्टी टाळण्यास शान्तामामीसारखा पोलीस बोलावलेलें उत्तम. मात्र शान्तामामीला इतक्यांतच सांगण्याची आमची तयारी नव्हती.

बन्याला नाटकाची थोडीशी कल्पना होती अन् मला बरेंचसें माहीत होतें. बाकीच्यांना आम्हीं समजावून सांगितलें. एकंदरींत नाटकाची पूर्वतयारी आम्ही आमच्याकडून होईल तितकी केली होती. प्रथम थिएटर शान्तामामीकडे करण्याचा आमचा बेत होता. पण त्याला एक अडचण होती. ती अडचण म्हणजे आमचा प्रेक्षकवर्ग. इतक्या लांब येण्याचें निम्याअधिक प्रेक्षकवर्गानें साफ नाकारलें. तेव्हां नाटकाचा दिवस नक्की पुढें कळवतां येईल, तोंपर्यंत तुम्हीं कुठें बोलूं नका, म्हणून आम्ही त्यांना बजावून सांगितलें. आणि याच सुमारास आईला साताऱ्याला जायचें निघालें.

ज्या दिवशीं आई साताऱ्याला गेली त्या दिवशीं दोन्ही वर्गांतून बन्यानें नोटीस फिरवली. मात्र नोटीस लिहिते वेळीं आम्हांला आठवण आली कीं नाटकाचें नांव काय? पण मग मी बन्याला नोटीस लिहून दिली.

**“ नोटीस ! नोटीस ! नोटीस ! अगोदर हें वाचा !**

“ उद्यां दुपारीं सदूचे बाबा दुकानांत गेले म्हणजे मग आमच्या नाटकास सुरुवात होईल. नाटकाचें नांव त्या वेळीं सदू सांगेल. थिएटरांत सभ्य रीतीनें वागण्याची सर्वत्रांस विनंति आहे. म्हणजे थिएटरांत दंगा करील त्याला हांकलून लावण्यांत येईल.

नवीन नाटक.

**नाटकाचें नांव ठरलें नाहीं.**

अंक आम्हांला करतां येतील तितके.
तिकिटांचे दर—५॥; ४॥; वगैरे वगैरे.
( हें खरें समजूं नये. गंमत म्हणून मांडलेले आहेत )
नाटक सदूच्या घरीं होईल. तरी बोलावलेल्या मुलांनीं लवकर
यावें. कुणी विचारलें तर अभ्यासाला आलों आहोंत म्हणून
सांगायला विसरूं नये. कोणीहि यांतलें एक अक्षर
बोललें तर नाटक बंद पडेल.

मॅनेजर, मालक, व्यवस्थापक ”

नोटीस अगदीं खरोखरीच्या जाहिरातीप्रमाणें काढण्याचा माझा विचार होता. पण ह्याला अडचणी होत्या. किंमतीच्या भुताला भिऊन कुणीच उगवणार नाहींत ही भीति असल्यामुळें ती टीप घालणें भागच होतें. तेव्हां शक्य तितका फरक करून मला नोटीस लिहावी लागली. मात्र ठराविक मंडळीलाच ती नोटीस दाखवायची म्हणून मीं बन्याला बजावून ठेवलें होतें.

पुण्यासारख्या सुधारलेल्या शहरांतल्या मुलांना नोटीस काढली तरी तोंडानें सांगावें लागतेंच. दिवसांतून छप्पन वेळां मला तेंच तेंच सांगतां सांगतां पुरेवाट झाली. तरी पण शंकाकुशंका संपल्या नाहींत.

“ ए, पण तुम्ही पडदे कुठले रे आणणार ? ” एकानें प्रश्न केला.

“ तें आम्हीं आधीं कसं सांगावं ? ” म्हणून मीं धंदेवाईक माणसासारखें आढ्यतेनें उत्तर केलें.

“ पण मग तुम्ही गोरे कसें होणार ? ” दुसऱ्या एकानें प्रश्न केला.

“ आम्ही साबण लावून गोरे होऊं. तो तुमचा प्रश्न नाहीं. ” मीं पूर्वीच्याच थाटांत उत्तर केलें.

“ अन् पेटी, अन् तबला—इतकं तुम्ही कुठनं आणणार ? ” तिसऱ्यानें विचारलें.

“ हें पहा, आम्ही सर्व कांहीं तयारी केली आहे. तुम्ही नुसतं पाहा. ” म्हणून मीं त्रासिक मुद्रेनें उत्तर केलें.

नाटकाचा दिवस उजाडला. त्या दिवशीं बाबांना आणि मला करून घालायला म्हणून शान्तामामी गांवांत आली, पण दैवाचे खेळ पाहा! आम्हींच तिला करून घातलं. बाबांनीं चरफडत चुलीशीं कांहीं तरी वाद खेळण्यांत पुष्कळसा वेळ घालवला. मी तिखट–मीठ पुरवण्याचें काम करीत होतों. इतक्या गडबडींत आमटीचें पातेलें थोडेंसें कलंडलें. मामी दारांत उभी होती. ती तोंडाला पदर लावून हंसूं लागली. बाबा जास्तीच चिडले. तरी पण चिडून ओरडणार कुणाच्या अंगावर?

"हंसायला लाजहि वाटत नाहीं. ही आमची सोय पाहायला आली आहे—" म्हणून पुटपुटत बाबांनीं पुन्हां पातेलें नीट केलें. शान्तामामी एखाद्या सेनापतीप्रमाणें दूर उभी राहून मला हुकूम सोडीत होती आणि नवशिक्या शिपायाप्रमाणें मी डोळे झांकून कांहीं तरी करीत होतों.

शेंकडा नव्वद नाटक मंडळ्यांच्या वांट्यांस येणारा पिठलें–भात ह्या दिवशीं मीं शक्य तितक्या निमुटपणें पोटांत ढकलला. सैंपाकघर म्हणजे एक लोहाराची भट्टीच झाली होती.

तिखट-मिठाचे डबे एकमेकांशीं अगदीं सलोख्याच्या नात्यानें गप्पागोष्टी करीत होते. मधून मधून हळदबाई काय चाललें म्हणून डोकावून पाहात होती. अमावास्येच्या काळोख्या रात्रीं आकाश-अंगणांत झिम्मा खेळणाऱ्या तारकांप्रमाणें भाताचीं शितें एकमेकांच्या गळां मिठी मारून नाचत होतीं. पळी एक टोंक भाताच्या तपेल्यांत आणि दुसरें टोंक आमटीच्या पातेल्यांत या 'एक पाय तळ्यांत, एक पाय मळ्यांत' अशा थाटानें आडवी पडली होती. हातांत धरायचे कागद दर भांड्यागणिक चारपांच इतकें इतस्ततः वावरून आमच्या या करामतीचें कौतुक करीत होते. इतके कागद जवळ असतांना बाबांची कागदाची मागणी सारखी चालूच होती. तुपाचें बुद-कुलें खरकटें न होण्याविषयीं मामीनें हळूच सुचवलें. पण—"काय करूं मग तुझं म्हणणं आहे! लांबून हुकूम सोडायला काय जातं आहे!" म्हणून बाबांनीं म्हटल्यावर मामी कांहींच बोलली नाहीं.

जेवण झाल्याबरोबर बाबांनीं तडक दुकानचा रस्ता धरला. आवरा-आवरी करण्याचें काम माझ्या अंगावर पडलें. माझी आवराआवरी म्हणजे

विचारायला नको. होतीं नव्हतीं तेवढीं भांडीं मोरींत फेंकून देण्याचा मीं सपाटा चालवला. मामीच्या 'अरे, अरे' ला मीं मुळींच जुमानलें नाहीं. हातांतलीं भांडीं संपल्यावर केरसुणीच्या फटकाऱ्यासरशीं खरकट्याची व्यवस्था लावली आणि त्या जागेवर तपेलीभर पाणी ओतून दिलें.

"बाबा, तुझ्यापुढं तुझी बायको काय रडेल ? चांगला संसार करशील, माझ्या राजा !" मामी हंसून म्हणाली.

"मामा तरी काय असंच करतात." मी पाहिलेल्या प्रसंगाचा दाखला देऊन म्हणालों.

"मामा अन् भाचे, एकाच माळेचे मणि आहांत—" मामी म्हणाली. पण लगेच, मला वाटतें, लाजून तिनें खालीं मान घातली !

दुपारीं एकच्या पुढें आमचा प्रेक्षकवर्ग कावऱ्या बावऱ्या मुद्रेनें हळुहळूं येऊं लागला. बन्याच्या मदतीनें मीं त्यांना खालीं ओसरीवरच थोपवून धरलें. मामीला संशय आलाच.

"आज हीं मुलं कशाला इथं गोळा केलीं ? सुट्टींत असाच अभ्यास करतां का ?" मामी म्हणाली.

"मामी, तूं आईला सांगणार नसलीस तर सांगेन. आज आम्ही नाटक करणार आहोंत." मी म्हणालों.

"नाहीं. नाटक बिटक कांहीं तसलं घरांत मी करूं देणार नाहीं—" मामी निश्चयाच्या स्वरानें म्हणाली.

"पण मामी, माझं ऐकून घे. आम्ही मुळींसुद्धां दांडगाई करणार नाहीं. अन् सुलीला घेऊन आम्ही खेळणार आहोंत." मी सुलोचनेचें नांव पुढें करून म्हणालों. मामीनें संमति दिली.

बन्या आणि मी माडीवर गेलों. स्टेजकरितां म्हणून दोन टेबलें जुळतीं केलीं. खुर्च्यांच्या अभावीं प्रेक्षकवर्गाकरितां गाद्या अंथरल्या. पडद्याचें काम पासोड्यांतर्फें करून घेण्याचें ठरविलें. आणि घंटा म्हणून ताम्हन आणि पळी वर नेऊन ठेवलीं. स्टेजच्या बाहेरचें काम उरकतांच आम्ही प्रेक्षकवर्ग—समाजाचे सतर्षी—वर नेऊन बसविले. थिएटर चिकार भरून गेलें होतें.

पण नटवर्गाची तयारी झाली नव्हती. पडद्याच्या पाठीमागें गेल्यावर आम्हांला एकएक अडचणी सुचूं लागल्या.

गोरें कसें व्हावें ? सूत्रधार कोण होणार ? पगडी कुठली आणणार ? मिशा कशा लावणार ?

मिशांची शंका मीं सातआठ दिवसांपूर्वीच काढली होती. पण बन्याचा चालढकली स्वभाव आडवा आला.

"मिशांचं पुढं पाहूं रे. तोंपर्यंत आपल्याला मिशा येतील." म्हणून बन्यानें माझें म्हणणें उडवून लावलें होतें, पण बन्याचा हा आशावाद अनुभवान्तीं फोल ठरला.

नटवर्ग तयार झालेला पहातांच बन्यानें पडद्याच्या बाहेर जाऊन प्रेक्षक-वर्गाला शान्त रहाण्याविषयीं विनंति केली. इतक्यांत सुलोचना, चिरंजीव मोत्या आणि चिरंजीव शित्या यांना बरोबर घेऊन वर आली. या नवीन पाहुण्यांना पाहातांच दोघांतिघां प्रेक्षकसदस्यांनीं आम्ही यांच्या पंक्तीला बसणार नाहीं, म्हणून म्हणत कोंपरा गांठला. त्यांची समजूत काढायला मला बराच वेळ लागला. समजूत पडली तरी आमच्यापासून त्यांना दूर बसवा म्हणून अट घालायला ते विसरले नाहींत. आम्हीं या चिरंजीव-द्वयाला दूरच्या कोंपऱ्यांत अगदीं खालच्या दर्जाच्या दरांत बसविलें. इतक्या मोठ्या माणसांत तसें उघडें बसल्यानें आपली अब्रू जाईल हें त्या प्राण्यांना जरी उमगलें नव्हतें तरी सुलीनें त्यांना अंग झांकून घेण्या-करतां एक कोरी चादर काढून दिली. पण गांवढळ तें गांवढळ ! चाद-रीचा उपयोग त्यांनीं बसण्याकरितांच केला. आम्ही लक्ष न देण्याचें ठरविलें.

तीन घंटा होऊन गेल्या तरी पडदा कोणी उघडायचा हें आगाऊ न ठरल्यामुळें पडदा कांहीं वर जाण्याचें चिन्ह दिसेना. शेवटीं सूत्रधारानें ( म्हणजे मीं ) पुढें होऊन पडदा वर केला. पुन्हां टेबलावर चढून वहि-वाटीप्रमाणें ईशस्तवनास मीं प्रारंभ केला. बन्या तोंडानें बाजा वाजवून पेटीचें काम चोख बजावीत होता, आणि दत्तू ॲल्युमिनिअमच्या ताटावर तबल्याचे बोल काढीत होता.

"ए हे रे नाटक ! काय पण सूत्रधार ! काळ्या शाईत भिजविलेल्या

कापसाच्या मिशा, अन् त्याला पांढऱ्या दोरीनं बांधलं आहे. अन् पगडी कुठं आहे ? हुडुत् ! विजारींतला सूत्रधार ! म्हणे आम्ही नाटक करणार आहोंत. हेंच का नाटक ?" म्हणून समोर बसलेल्या एका विघ्नसंतोषी प्राण्यानें सुरवात केली. "अन् सूत्रधाराची लंगोटी तर विजारीच्या बाहेरच लोंबते आहे." दुसरा एकजण मोठ्यानें म्हणाला.

मी आपलें गाणें बंद करून प्रेक्षकवर्गानें केलेल्या सूचनेप्रमाणें पोषखांतील इष्ट त्या सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न करूं लागलों. बन्यानें पेटीवादन बाजूला करून स्टेजवर उडी मारली.

"सदू. तूं बाजा वाजव. मी आतां छान गाणं म्हणतों—" म्हणून म्हणत बन्यानें त्या दिवशीं आपल्या कलेचें लोकांना पूर्ण ज्ञान करून दिलें. कला म्हणजे कशी असते हें मला त्या दिवशीं समजलें. आणि जगांत कलावान माणसें गल्लोगल्लीं पडलेलीं असतात, पण योग्य-अनुकूल संधि प्राप्त न झाल्यामुळें त्यांच्या कलेचें त्यांच्या कलेवराबरोबरच दहन होतें हेंहि पण उमगलें. आश्चर्याची गोष्ट ही, कीं बन्यानें गाण्याला टाळी घेतली ! पाठीमागें बसलेल्या श्वानराजांनींहि आपली पसंती स्टेजपर्यंत येऊन भुभुःकाराच्या मार्गानें व्यक्त केली. बन्यानें हा जय मिळवला होता इतकेंच नव्हे तर, विजय म्हणजे विशिष्ट प्रकारचा जय मिळवला होता. कस्तुरी लपविली तरी तिचा सुवास कांहीं लपत नाहीं म्हणून पुष्कळ म्हणतात (अन् म्हणूनच हा दाखला देण्याचें मला धैर्य होतें आहे !) तेंच खरें. एका गाण्यानें बन्यानें आपलें नांव अजरामर करून टाकलें. सुप्रसिद्ध गवयांच्या पद्धतींचें अनुकरण केलें जातें यांतच त्यांच्या यशस्वितेची खूण मानण्यांत येते. बन्याच्या गाण्याचे आलाप सुमारें पंधरा दिवस शाळेंत सारखे दुमदुमत होते.

पण बन्या लाजला. मला त्याच्या विनयाचें कौतुक करावेंसें वाटूं लागलें पण बन्या माझ्याशीं धडपणें बोलेनासुद्धां. प्रेक्षक इतका भजनीं लागला असतांना हा 'थट्टा करतात' म्हणून रुसून बसतो याचेंच मला आश्चर्य वाटूं लागलें. गवयांचा लहरी स्वभाव याहून दुसरा कसा पाहाण्यास सांपडणार !

नाटकाचा संगीत भाग लांबवावा तितका लांबवितां येण्यासारखा होता. पण मग कदाचित् अतिगायन—श्रवणाचा परिणाम श्रोत्यांच्यावर होऊन तेही गाऊं लागले म्हणजे अनवस्था प्रसंग यायचा. नादशास्त्रांतला नियम हा आहे कीं, एक तार छेडली कीं आजूबाजूच्या तारा कंपित होतात. लेखनकलेंतहि हाच नमुना दृष्टीस पडतो. घरांत एक लिहिणारा असला कीं घरांतलीं पोरेंबाळेंसुद्धां लेखकाच्या धंद्याला हात घालूं लागतात. पतिराजाचें गुण वर्णन करणाऱ्या साध्वी सीतामाईचें संभाषण-पुराण ऐकतांच साऱ्या ठकूताई, अक्कूताई 'अहो, इकडे तर कांहीं विचारूंच नका' म्हणून सांगायला टपलेल्या असतात. अर्थात् हें इतकें समण्याजोगें ज्ञान मला त्या वेळीं नव्हतें.

गायन संप(वि)ल्यावर मी आंत पाहून म्हणालों, "बन्या, आतां काय रे बोलायचं?"

"मला काय विचारतोस? तूं नाटक करणार; तूं गाणं म्हणणार; अन् मला काय विचारतोस!" बन्या म्हणाला.

इतक्यांतच सुलोचना टेबलावर चढून उभी राहिली. आम्ही एकमेकांकडे पाहूं लागलों.

"बने, बने, ही बघ आमची शाळा. येथें आमचे मास्तर बसतात—"

"बोल कीं ए सूत्रधारा—" म्हणून प्रेक्षकवर्गांतील एका चाहात्यानें ओरडून सूचना केली.

"नाहीं तर बन्यासारखं गाणं म्हण म्हणावं." म्हणून एका संगीताभिमान्यानें सूचना केली.

थोड्या वेळानें प्रेक्षकवर्गच नाटक करून दाखवूं लागला आणि आम्ही नटवर्ग टेबलावर चढून त्यांना टाळ्या देऊन प्रोत्साहन देऊं लागलों. आमच्या प्रेक्षकवर्गानें नाटकाला हास्यरसाची जोड दिली होती म्हणण्यापेक्षां, हास्यरसालाच नाटकाची जोड दिली होती म्हणणें जास्त सत्याला धरून होईल. इतका खिदळणारा, शिष्टाचाराच्या नियमांना धुडकावून लावणारा प्रेक्षकवर्ग ह्यापुढें मीं कधींही पाहिला नाहीं. परिस्थितीचें आणि

स्थलकालाचें विस्मरण पडून मी ओठावरच्या मिशा हातांत घेऊन तोंडानें कुरतडूं लागलों. सुलोचना मुकाट्यानें माझा हात धरून उभी होती.

प्रयोगाच्या सोयीसाठीं आणि वेळेच्या अभावीं (कारण आम्हांला नाटक करूं देण्यास वेळ द्यायचाच नाहीं असा आमच्या प्रेक्षकवर्गाचा हेतु स्पष्ट दिसत होता.) आम्ही सूत्रधाराच्या गाण्यानंतरचे सर्वच प्रवेश गाळून टाकले. आणि मनुष्याच्या नादानपणाची किमान मर्यादा पहात स्वस्थ बसून राहिलों! सुमारें एक तासाच्या अवधीनंतर आम्ही खालीं गेलों. आमचा प्रेक्षकवर्ग आतां रस्त्यांत उभा राहून शेक्सपिअरच्या वेळेच्या फिरत्या नाटकाप्रमाणें फिरतें नाटक करून दाखवीत होता.

मेजवानीनंतर, पाहुणे मंडळी निघून गेल्यावर दिवाणखाना ओसाड दिसतो म्हणून कोणत्याशा कवीनें 'ओसाड दिवाणखान्या'वर रडगाणें लिहिलेलें माझ्या वाचण्यांत आहे. पण माझ्या मतें आमचा प्रेक्षकवर्ग गेलेलाच बरें होतें. इतकेंच काय पण पुन्हां म्हणून या नाटकाच्या फंदांत पडायचें नाहीं हा मीं निर्धार केला. तीनतीन इंचांच्या जिभल्यांनीं घुमणारे कोंपरे जितके भयप्रद असतात तितके ओसाड कोंपरे खात्रीनें सुखदायक असतात. सुलोचनेच्या सहाय्यानें मीं सामानाची आवराआवर केली. इतकें झाल्यानंतर मीं बन्याची वास्तपुस्त करण्याकरतां म्हणून त्याला हांक मारली.

" तूं पुन्हां माझ्याशीं बोलूं नकोस. बोललास तर मग बघ—" म्हणून बन्यानें भविष्यकाळाची बारिकशी चुणूक दाखविली.

---

# प्रकरण ११ वें



## संपादकीय जबाबदारी.

" भातुकलीसारख्या क्षुल्लक खेळामध्यें रमून जाणाऱ्या चिमुरड्या पोरीची कांहीं काळानें पोराबाळांना 'काऊ, चिऊ' करीत कडेवर घेऊन हुटुकलींत शिजवलेल्या भाताचे घास भरवणारी सुगृहिणी बनते. पाळण्यांत पडून स्वतःच्या करमणुकीकरितां म्हणून हातांतलीं सोन्याचीं वळीं चोखणारा दंतविहीन जीव कांहीं काळानें न्यायाधीशाला कांहीं तरी काम मिळावें म्हणून लोकांच्या हातांतलीं सोन्याचीं वळीं गिळंकृत करण्याचा विचार करणारा तंट्या भिल्ल होतो. एकंदरींत मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात हेंच खरें!"
—प्रसिद्धीकरितां लोकांचींच वाक्यें स्वतःचीं म्हणून दडपणारा माझा एक लेखक मित्र.

संपादकीय जबाबदारी ही काय गफलत आहे हें मी इंग्रजी चौथीच्या सुमारास शिकलों. मी तिसरींतून चौथींत गेलों आणि हें नवीन पिल्लूं माझ्या दृष्टिपथांत आलें. वर्गाचें मासिक बहुतेक नापास झालेल्या वीरांकरवीं चालविण्याचा त्या वेळेचा प्रघात होता. हल्लीं ती पद्धत मोडली असल्यास आनंदच आहे.

सुरुवातीस मीं सांगितलेंच आहे कीं, बन्या माझ्यापुढें दोन वर्षें होता. आतां फक्त वयानेंच काय तो वडिलकीचा अधिकार गाजविण्याचें त्याच्या हातांत राहिलें होतें. या त्याच्या अपूर्व स्वार्थत्यागाचें कारण म्हणजे चेंडूफळीचा विलायती खेळ. तें पुढें येणारच आहे.

आमच्या वर्गाचे मासिक—संपादक वर्ग सुरू झाल्यानंतर सातआठ दिवसांनीं माझ्याकडे आले.

" देव, आपल्या वर्गाच्या मासिकाचा तूं वर्गणीदार झालंच पाहिजे.

मी त्या मासिकाचा संपादक आहे." एवढ्या जाहिरातीवर गिऱ्हाईक खास गटेल या विश्वासानें स्वारी पुढें निघून गेली. मीं बन्याचा सल्ला घेतला. पण वाङ्मय हा बन्याचा आवडता विषय नसल्यामुळें त्यानें सपशेल अज्ञान कबूल केलें. मीं शेवटीं मामांना विचारलें. मामांचें उत्तर म्हणजे अतिव्याप्ति दोष आणि अव्याप्ति दोष दोन्हीहि एकमेकांशीं संलग्न स्थितींत कसे खुलून दिसतात याचा एक नमुना होता.

"मासिक म्हणजे जानेवारी महिन्याला मार्च या हिशोबानें नियमित निघणारें एक चोपडें. शस्त्रांचा खणखणाट, चिलमीचे दीड फूट जाळ, श्रमानें क्लान्त झालेला तेजस्वी घोडेस्वार, भयाण, ओसाड अशा स्थितींत कोणातरी आचरटानें बांधलेलें मारुतीचें जीर्ण देवालय, छप्पन्नशें साठ कट, त्याच्या दुप्पट मारामाऱ्या, त्याच्या चौपट खून, अन् त्याच्या आठपट वाचकवर्गाची हत्या—, इत्यादि आश्चर्यकारक प्रसंगांनीं सजवलेल्या गोष्टींचा संग्रह म्हणजे मासिक. नाहींतर सासूनं सुनेला डागलं, सुनेनं गळफांस घेऊन जीव दिला म्हणून तिच्या मृतात्म्यास शान्ती देण्याकरितां म्हणून खरडलेल्या गोष्टींनीं भरवलेलं जें पुस्तक त्याला मासिक म्हणतात. त्यांत आणखी 'दमेकऱ्यांस इशारा!' 'असे खिन्न कां होतां!' 'सोय झाली!' 'अमक्या रोगावर अमूक घेऊन पाहा' म्हणून परोपदेशे पांडित्य शिकवण्याचा प्रयत्न करणारीं जाहिरातींचीं पानें. कांहीं पानें संपादकाचीं असतात. त्यांत तो आपल्या ज्ञानाचें आविष्करण करीत असतो. राजकीय चळवळ, सामाजिक कळकळ, अंतःकरणाची तळमळ—इत्यादि संपादकाचीं स्फुटें पाहिलीं म्हणजे वाचकांना मळमळ सुटावी यांत नवल तें कसलं ? बरं, पण आत्तां तूं हें विचारलंस त्याचा उद्देश काय ? तूं मासिक काढणार आहेस कीं काय ? मग माझा सल्ला घे. आईबापाचा एकुलता एक मुलगा आहेस तूं. प्रकरण अंगावर आलं तर आत्महत्त्या करण्यापूर्वीं माझा सल्ला घेण्यास विसरूं नकोस. त्यापेक्षां तूं आपला अभ्यास कर. यांत तुझं कल्याण आहे." हें मामांचें उत्तर.

यांत त्यांनीं मला मासिकाच्या विषयीं पुष्कळच ज्ञान करून दिलें होतें. पण मला त्यांतलें एका अक्षराचें सुद्धां ज्ञान झालें नाहीं ! आणि विचार-

णारानें विजापूरच्या गोलघुमटाची माहिती विचारावी अन् सांगणारानें विसापूरच्या तुरुंगाची माहिती चटकदारपणें वर्णन करून सांगावी, त्याच्या इतकाच हाहि हास्यास्पद प्रकार होता. मला वर्गाच्या मासिकाची माहिती पाहिजे होती अन् मामा व्हीलर स्टॉलवर खपणाऱ्या मासिकांची माहिती सांगत होते ! आणि वर आत्महत्त्येविषयीं कायसेंसें सांगत होते !

शेवटीं बन्याला हाताशीं धरून मीं आमचें पहिलें प्रसिद्धिपत्रक बाहेर काढलें—

"केवळ वाङ्मयसेवा आणि तदनुषंगिक लेखन हाच आमचा उद्देश आहे. आम्हांला पक्षाभिमान बाळगून शारदेची हत्त्या करावयाची नाहीं. सध्यांची मराठी वाङ्मयाची चाललेली हेळसांड पाहून मनाला जो कांहीं विषाद वाटतो तें कांहीं सांगून समजण्यासारखें नाहीं. नितान्तरम्य वर्णनें, मधुर, सोज्ज्वल अशीं कथानकें, आबालवृद्ध सर्वांस सारखेंच प्रिय होणारें असें हें आमचें मासिक निघेल. मासिक '**बालरंजन**' चिरायु होवो अशी आम्ही अपेक्षा करतों."

हीं सगळीं वाक्यें थोड्याफार फरकानें कुठल्याहि मासिकाच्या सुरुवातीच्या अंकांत सांपडण्याजोगीं आहेत, इतकें सांगितलें म्हणजे मग चौथीच्या मुलाला इतकें ज्ञान कोठून मिळालें याचा आपोआप उलगडा होईल. आमचें प्रसिद्धिपत्रक वर्गांतून फिरून आलें, त्या वेळीं आमच्या शत्रूंनीं आम्हांला नामोहरम करण्याचे कसून प्रयत्न केले. कांहींनीं तर बन्याला त्याच्या संगीत कलेची आठवणसुद्धां करून दिली. दोन मासिकांच्या चढाओढींत व्यक्तिद्वेष आणि खासगी मत्सर कसा जागोजागीं दृष्टीस पडतो तें मला या वेळीं कळून आलें. आमच्या नाटकावर जी टीका झाली ती ऐकून कान किटून गेले तरी यांचीं तोंडें मिटेनात. एका लेखक बहाद्दरानें व्यंगकाव्य लिहिण्याचा धाक घातला, दुसऱ्या एकानें छोटेखानी फार्स लिहिण्याची धमकी दिली. एकजण तर 'नाटकाच्या धंद्यांत तुम्हांला काय काय अनुभव आला तें कृपा करून सविस्तर सांगा. आपल्यासारख्या बड्या माणसाची ही मुलाखत मी त्या दुसऱ्या मासिकांत देतों.' म्हणून आठ दिवस माझ्या पाठीमागें लागला होता. मीं त्याला मुलाखत देण्या-

ऐवजीं त्याची मुलाखत मात्र मीं चांगलीच घेतली. अन् त्यांतून बन्या-सारखा मदतनीस असल्यावर मग काय उशीर ?

हा लढा नव्याजुन्याचा होता. आमच्याबरोबर पास होऊन आलेलीं मुलें अर्थात् आम्हांला मदत करण्याचें आश्वासन देत होतीं. आणि एक-दोन वर्षांच्या अनुभवानें स्वतःला शहाणे समजून घेणारे नापासपैकीं वीर आम्हांला हाणून पाडण्याच्या वल्गना करीत होते. त्यांच्यांपैकीं एका अंग-दाची आम्हांला पुढें पुष्कळच मदत झाली. आमच्या मासिकांत सुधारणा करण्याचें आम्ही ठरवलें होतें. पहिली सुधारणा ही कीं, सर्व वर्गणी-दारांचीं नांवें पहिल्या पानावर द्यायचीं. मला वाटतें हा कित्ता जर बाकीच्या मासिकांनीं गिरवला तर मजकुराची अडचण फार करून भास-णार नाहीं. ह्यांत एक सूक्ष्म कपट आहे. वर्गणीदारांना आपल्या नांवा-करितां म्हणून तरी महिन्याकाठीं दोन पैसे देणें फारसें जड वाटत नाहीं. दुसरी सुधारणा ही कीं, मासिकावर अभिप्राय घेण्याकरितां चार कोरीं पानें राखून ठेवणें. अर्थात् कुणाहि सद्गृहस्थाला मुलांचा उत्साह मोडणें जड वाटतें आणि सहसा उलट अभिप्राय देण्याचें तो टाळीत असतो. त्यांतून भेटलाच एखादा असा खमक्या, तर तें पान फाडून टाकायला आम्ही मुळींच मागें पुढें पाहणार नव्हतों.

आमचा पहिला अंक माझ्या मतें आणि बन्याच्या मतें फारच कमालीचा सर्वांगसुंदर निघाला होता. त्यांत उगवत्या सूर्याचें चित्र होतें, पुलावरची आगगाडी कशी दिसते हेंहि चित्रित केलें होतें—थोडक्यांत म्हटलें म्हणजे निसर्गाला कुरकुर करायला मुळींच जागा नव्हती. ‘संपादकीय स्फुटें,’ ‘वार्ताविहार,’ ‘पंढरीचा विठोबा,’ ‘एक गोष्ट’ इत्यादि विविध विष-यांवर सुविचारपरिप्लुत असे गंभीर लेख लिहिण्यांत आले होते. कोडी, चुटके वगैरे गोष्टी रीतसर देण्यांत आम्हीं मुळींच कमी केलें नव्हतें.

पण जगाची दृष्टि फार निराळी असते. कोणत्याहि सत्कृत्याचा सत्या-नाश कसा होईल हें पाहाण्याकडे लोकांचीं मनें झुकलेलीं असणार. आमच्या अंकाचें परीक्षण विरुद्ध पक्षाच्या मासिकांत सविस्तर आलें—

“ अंक गचाळ आहे, टाकाऊ आहे, नीरस आहे. गुलाबाच्या फुलांचा

हार म्हणून जासवंदीच्या फुलांचा हार लोकांपुढें ठेवण्याचा हा निंद्य प्रकार जेवढ्या लवकर थांबेल तितकें बरें. संपादकीय स्फुटें केसरीच्या संपादकांनीं लिहून दिलीं असल्यास आमचें कांहींच बोलणें नाहीं. प्रश्न येवढाच उरतो कीं, ता. १२ च्या केसरींत येणारा मजकूर पुन्हां ता. १८ च्या 'बालरंजन' मासिकांत येतो याचा अर्थ काय समजावा? केसरीच्या संपादकांकडून निदान दुसरा मजकूर लिहून घेतला असता तर पुनरुक्तीचा दोष टळला असता. 'वार्ताविहार' मधल्या बातम्याविषयीं जरा थोडीशी शंका वाटते. महायुद्ध थांबून चार वर्षांच्यावर अवधि झाला असल्यामुळें महायुद्धविषयक बातम्या आतां देण्यांत कांहींच स्वारस्य उरलेलें नांहीं. 'पंढरीच्या विठोबा'ची माहिती यापेक्षां रा. पांगारकरांच्या कोणत्याहि पुस्तकांत चांगली देण्यांत आली आहे असें आढळून येतें. 'एक गोष्टी'चा अजून धागादोरा लागत नाहीं याबद्दल आम्ही दिलगिरी प्रदर्शित करतों. ऋषींच्या कुळाप्रमाणें आणि नद्यांच्या मुळाप्रमाणें ह्या गोष्टीचा उगम बराच दूरवर गेला असावा असें वाटतें. उगवत्या सूर्याला मावळता सूर्य म्हणून म्हटलें असतें तरी वस्तुस्थितीचा विपर्यास होण्याची बिलकूल धास्ती राहिली नसती. भगवान् सूर्यनारायणाचे बारा डोळे, बारा टिंबांनीं दाखवण्यांत चित्रकाराचें कौशल्य वर्णावें तितकें थोडेंच होणार आहे. पुलाच्या चित्रांत एक शंका आहे. पुलावरून खेळांतली काड्यांच्या पेट्यांची गाडी जाते आहे का खरोखरीची गाडी जाते आहे? '*D*' टाइपचें इंजिन जर ही गाडी ओढीत असेल तर पुलाच्या कमानी थोड्या जाड काढायला पाहिजेत. असो. एकंदरीनें ह्या आमच्या नवीन भावंडाचें कौतुक करणें हें आमचें आद्य कर्तव्य आहे. असेच मोठेधाटे व्हा आणि आपल्या कृतीनें दुसऱ्याला लाजवून सोडा, यापरता आम्ही दुसरा काय आशीर्वाद देणार? शुभास्ते पन्थानः सन्तु!"

आमचें कंबरडें मोडण्याचा हा बेत होता. पण दत्तूनें आम्हांला धीर दिला.

"सदू, हा द्वेष आहे. हा मत्सर आहे. घराच्या आसपास फिरणाऱ्या नवोदित श्वानराजावर तुटून पडणें हा घरच्या कुत्र्याचा धर्म आहे. पण तूं धीर सोडतां कामा नये. आमचे अण्णा आम्हांला नेहमीं सांगत असतात

कीं प्राण गेला तरी बेहेत्तर, पण आपलीं ठराविक मतें कोणाच्याहि भीड-मुर्वतीखातर सोडूं नका. तूं हें मासिकाचें काम असेंच चालव. पुढच्या अंकांत तूंहि त्यांच्यावर असाच तुटून पड. दंड थोपटण्याचा आवाज आला कीं आपणहि दंड थोपटलेच पाहिजेत." पण ह्या दंड थोपटाथोपटीचा आवाज आमच्या मास्तरांच्या कानांवर गेल्यावर काय प्रकार झाला तें पुढें पाहूं.

एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढून तावातावानें लिहिण्यानें आमचा एक फायदा झाला. वर्गातले 'अभ्यासिक' म्हणून अस्पृश्यांसारखे दूर बसणारे लोक आमच्यांत येऊन चौकशी करूं लागले. मासिकाचा अंक महिन्याकाठीं एकच निघणार, तोंपर्यंत कांहीं तरी उद्योग पाहिजे म्हणून 'टपाल' नांवाचें एक दैनिक मीं सुरू केलें. एक तावभर मजकूर. कोणत्या छापखान्यांत छापलें, कोणीं छापलें इत्यादि ठराविक मसुद्यानें आमचें बरें-चसें काम भागे. त्यानंतर सुरुवातीस जाहिराती असत. मात्र त्या सगळ्या जाहिराती आमच्या मासिकाच्या धोरणास पोषक होत्या. 'ताजी बातमी' ह्या सदराखालीं वर्तमानकाळाविषयीं आम्ही फारसा विचार करीत नव्हतों, तर भविष्यकाळावर आमची नजर असे. उदाहरणार्थ—

१. " रा. रा. बन्या ऊर्फ बबनराव कुलकर्णी हे थोडक्याच दिवसांत मुंबई विश्वविद्यालयाची बी.ए. ची डिग्री घेणार आहेत असें कळतें.आम्ही त्यांचें यश चिंतितों."

२. " कळविण्यास अत्यंत आनंद वाटतो कीं, थोडक्याच दिवसांत म्हणजे बी. ए. झाल्यानंतर विलायतला जाण्याचा रा. भट ( आपल्या वर्गातील एक सन्माननीय सद्‌गृहस्थ ) विचार करणार आहेत. तिकडील मौजेच्या गोष्टी आपल्या मासिकाकरितां म्हणून खास पाठविण्याचें त्यांनीं मोठ्या उदार मनानें कबूल केलें आहे. अजून विमानांचा भरंवसा देतां येत नसल्यामुळें सध्यां त्यांनीं जलमार्गें प्रवास करावा असें आम्ही त्यांना मोठ्या कळकळीनें सांगण्याचें धाडस करतों."

'ताज्या बातम्यां 'मध्यें तसें स्पष्ट म्हटलें नव्हतें तरी बऱ्याचशा शिळ्या बातम्या देण्याचें आम्ही मधून मधून पाहात होतोंच. त्यानंतर अग्रलेख म्हणजे विरुद्ध पक्षाला चिमटे घेण्याकरितां राखलेली जागा !—

" कांहीं कांहीं लोकांना आपल्या विद्वत्तेचा, आपल्या शहाणपणाचा आणि आपल्या मोठेपणाचा जो कांहीं गर्व असतो तो सांगून समजणार नाहीं. पण असल्या या गर्विष्ठ, नादान माणसांना आम्ही सुचविण्याचें धाडस करतों कीं, 'गर्वाचें घर खालीं' हा लहानपणचा धडा त्यांनीं पुन्हां एकवार अवश्य वाचावा. जगामध्यें कांहीं लोक अशा कांहीं वाईट खोडींनीं बांधलेले असतात कीं त्यांना सूर्यप्रकाशालासुद्धां नांवें ठेवावींशीं वाटतात. हे विचार सुचण्याचें कारण म्हणजे, आमच्या वाइटावर टपून बसलेले कांहीं शिवराळ व्यवसायबंधु. त्यांच्यापुढें इतर कांहींच उपाय न चालल्यानें हें कटु कर्म नाइलाजास्तव करणें भाग पडत आहे. काल शाळा सुटल्यानंतर आपले सुप्रसिद्ध वर्गबंधु श्री. रा. रा. सदाशिवराव देव— संपादक 'बालरंजन,' हे मुकाट गृहाप्रत जाण्याच्या विचारांत होते. कोणीहि सामान्य ज्ञान असलेला मनुष्य कबूल करील कीं, घरीं जाण्याचे वेळीं मनुष्याला एकीकडे बोलावून त्याच्यावर तोंडसुख घेणें शुद्ध नादानपणाचें काम आहे. त्यांनीं काय काय शब्द योजिले ते आम्ही आमच्या वाचकांना वाचायला लावून निष्कारण त्रास देऊं इच्छित नाहीं. तरी पण येवढेंच सांगावेंसें वाटतें कीं, रा. देवांचा भयंकर अपमान झाला. रात्रीं त्यांना धडपणें जेवणसुद्धां सुचलें नाहीं. इतका आततायीपणा सुधारलेल्या जगांत यांनीं करावा ही मोठी शरमेची गोष्ट आहे. यावरून तरी ते काय बोध घ्यायचा तो घेतील आणि पुन्हां आम्हांला या विषयावर लिहिण्याची संधि आणूं देणार नाहींत अशी आशा प्रकट करून आम्ही तूर्त आमच्या सूज्ञ वाचकांची रजा घेतों."

जें लिहिण्याचें मीं टाळलें होतें तें आमच्या सूज्ञ वाचकांना तात्काळ समजलें! मला आदल्या दिवशीं मुलांनीं कसें घेरलें होतें आणि माझी टोपी ( हाताच्या ) वाऱ्यानें कशी उडून पडली तें त्यांना मीं न सांगतांच कळलें.

दोनतीन महिन्यांतच हा वाद इतका रंगाला आला कीं एक मासिक, एक दैनिक इतकीं अस्त्रेंसुद्धां अपुरीं पडूं लागलीं. पुन्हां विरुद्ध पक्षाचें मासिक, त्यांचें दैनिक ही भरती होतीच. मौज ही कीं, ह्या संपादकाचा

अग्रलेख दुसरा संपादक मोठ्या प्रेमानें वाचीं. या दोन व्यक्तींशिवाय अग्रलेख वरती लोंबकळत ठेवण्याची इतर वाचकांना संवयच लागून राहिलेली होती. कारण दर अग्रलेखांत आम्ही 'पुन्हां या वादांत भाग घेऊं इच्छित नाहीं' म्हणून वाचकांना वारंवार सांगत असूं; आणि पुन्हां दुसऱ्या दिवशीं अग्रलेखांत त्या व्यतिरिक्त कांहींच बोलत नसूं. पुढें पुढें तर 'टपाल' सकाळीं अकरा वाजतां एकदां आणि मधल्या सुट्टींत दुसऱ्यांदा अशा थाटांत निघूं लागलें. नशिबानें बाबांच्या दुकानांत कागदांना मुळींच तोटा नव्हता.

मास्तरांच्या दृष्टोत्पत्तीस ही गोष्ट लवकरच आली. दुपारच्या अंकाची तयारी बहुतेक मी भाषान्तर किंवा सायन्स इत्यादि तासांना करीत असे. भाषान्तराचा तास अतिशय कंटाळवाणा जात असे. नियमांपाठीमागें नियम, त्यांच्यांतले पोटनियम ह्याविषयीं ऊहापोह करतांना मास्तरांना स्वतःला तरी त्यांतलें समजत होतें कीं नाहीं देव जाणे. मात्र पुस्तक पुढें धरून हळूंच कोणी पहात नाहीं असें पाहून सुपारीचीं खांडें पल्ल्यावारी फस्त होत असत. बिचाऱ्याला संपादकांच्या काकदृष्टीची कल्पना नव्हती. त्यांतून दोन संपादक, त्यांचे प्रत्येकीं दोनदोन सहसंपादक, इतका विस्तव पायाखालीं जळत असतांना त्यांच्या तें मुळींसुद्धां लक्षांत येऊं नये ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट होती. नियमांची गर्दी मोडली कीं वाक्यें भाषान्तराकरितां सुरू होत. पाळ्या मोजून ठेवण्याचें आणि पाळी आली म्हणजे खूण करण्याचें काम शेजारीं बसलेल्या सहसंपादकाकडे असे.

मी स्वतः भाषान्तराच्या फार विरुद्ध होतों आणि त्याप्रमाणें संपादकीय जबाबदारीवर मी या विषयासंबंधानें सडेतोड टीकाहि केली होती. 'असला रूक्ष, कंटाळवाणा विषय विद्यार्थ्यांच्या मानगुटीं बसवण्यांत अधिकाऱ्यांना काय शाहाणपण वाटत असेल तें वाटो, पण आमचें तर स्पष्ट मत आहे कीं या विषयाच्या तासामुळें कदाचित् शाळाहि ओस पडण्याचा संभव आहे. तरी योग्य अधिकाऱ्यांनीं या बाबतींत सत्वर लक्ष पुरवावें म्हणजे पश्चात्तापाची पाळी येणार नाहीं असें आम्हांस वाटतें.' पण आमचें वाटणें त्या योग्य अधिकाऱ्यांच्या गांवींहि नव्हतें. मास्तर दर आठवड्याला

दोन तास विद्यार्थ्यांच्या मानगुटीं बसतच होते. आमच्या स्पष्ट मताची किंमत तितकीच होती !

मी दैनिकाकरितां अग्रलेख लिहीत होतों. त्या दिवशीं मास्तरांनीं भाषान्तरावर विशेषच जोर दिल्यासारखें दिसत असल्यामुळें मी शाळाधिकाऱ्यांना उद्देशून माझें स्पष्ट मत काय आहे तें पुन्हां बजावून सांगत होतों. माझा टांक झरझर चालत होता. स्फूर्तिदेवता प्रसन्न होती. इतक्यांत—

" कोंपऱ्यांत कोण आहे तो ? देव का ? देव, काय चाललं आहे लिहिणं ? मी मघापासून कंठशोष करतों आहें अन् तूं आपला वर मान करीत नाहींस—का आईबापांचं देणं आहे म्हणून त्यांच्या उपकाराकरितां शाळेंत येतोस ? तें काय लिहिलं आहेस तें इकडे आण पाहूं." मास्तरांचा आवाज आला.

मीं शक्य तितका समतोल भाव चेहऱ्यावर ठेवून म्हटलें, " तुम्ही सांगत होतां तें लिहून घेत होतों. "

"तें काय लिहून घेतलं आहेस तें मला पहायचं आहे!" मास्तर म्हणाले.

मीं पुष्कळ सबबी सांगितल्या. माझं अक्षर वाईट आहे, तुम्हांला वाचतांसुद्धां येणार नाहीं; आतां पाहिजे तर पुढच्या बांकावर बसून ऐकतों—वगैरे सर्व सबबी मीं पुढें टाकल्या. पण व्यर्थ !

शेवटीं मास्तरांनीं माझा अग्रलेख वाचलाच—

" या विषयावर आम्हांस पुन्हां लिहावें लागेल असें वाटलें नव्हतें; पण अधिकाऱ्यांची मगरुरी दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणावर असल्यामुळें पुन्हां इशारा देणें प्राप्त झालें आहे. भाषान्तर हा विषय अत्यंत क्लिष्ट आहे. आम्ही म्हणतों कीं, पुढें आयुष्यांत मुलांना भाषान्तरकार बनवून सोडणें आहे कीं काय ? स्वतंत्र पुस्तकांची वाण आहे अशी चोहोंकडून हांकाटी पिटली जात असतां केवळ पोटाची खळगी भरण्याकरितां म्हणून वर्गांत मास्तरांनीं भाषान्तराचे धडे शिकवावे हें माणुसकीला लांछन आणणारें कृत्य आहे. त्यापेक्षां मुलांना वैदुल खेळण्यास शिकवलें तर आपल्या एका राष्ट्रीय खेळाचें पुनर्जीवन केल्याचें श्रेय तरी पदरीं खास पडेल..."

मास्तरांनीं छडी मागवण्याचें श्रेय पदरांत पाडून घेतलें ! विरुद्ध पक्षाचे

संपादक गडबडीनें छडी आणण्यास धांवले. मास्तरांनीं मुलांना समयोचित असा उपदेश करण्याची संधि साधून घेतली—

" ह्या वर्गांत इतके पुढारलेले शिष्ट असतील अशी मला कल्पनाहि हा वेळपर्यंत नव्हती. तुम्हांला शिक्षण कोणत्या प्रकारचं द्यावं हें ठरवायला आम्ही अजून जिवंत आहोंत. तुमच्या सल्ल्याची आम्हांला कवडी इतकीहि गरज नाहीं. हे धंदे पुढें मोठे झाल्यावर करा—" म्हणून म्हणत मास्तरांनीं मला पवित्र्यांत उभें केलें.

सत्कृत्य तडीस नेण्यापायीं किती हालअपेष्टा सोसाव्या लागतात, कितीजणांचीं बोलणीं सहन करावीं लागतात, आणि किती दिव्यांतून बाहेर पडावें लागतें हें मीं त्या दिवशीं उदाहरणानें दाखवून दिलें. मास्तरांच्या प्रत्येक छडीगणिक सारें विश्व डोळ्यांपुढें चमकत होतें, पण माझा पीळ तसाच कायम राहिला. आईनें याकरतांच 'लठ्ठोबा मेला, दांडगेश्वर' ही वाग्वैजयन्ति अर्पण केली होती. मनांत योजलेलें कार्य कदापि सोडायचें नाहीं, त्या पायीं छड्या बसल्या तरी चालेल, हा माझा हट्टी स्वभाव मास्तरांना जास्तीच स्फुरण चढवूं लागला. मी रडलों—अगदीं कळवळून रडलों; पण मासिक बंद न पाडण्याविषयीं मनांत शपथ घेतली. कांहीं काळानें मास्तरांना कंटाळा आला. त्यांनीं मला जाग्यावर जाऊन उभें रहाण्याची सजा ठोठावली. मास्तरांना ज्योतिषशास्त्राचा ओनामा देखील येत नव्हता; पण माझें भविष्य त्यांनीं मोठ्या उत्साहानें सांगितलें—

" शेवटीं अस्सा मरशील. दाराशीं उभं करणार नाहीं तुला कुणी. ह्या पुण्यांत माझ्या दारावरून म्युनिसिपालिटीच्या कचऱ्याच्या गाडीवर बसून 'ये रे पवळ्या, ये रे ढवळ्या' करीत फिरशील. 'अतिशहाणा त्याचा बैल रिकामा' तो हा असा. अभ्यासाच्या नांवानें शंख आणि अधिकाऱ्यांना इशारे देतों आहे! घरीं आईबापांना रडायला लावशील. मास्तरांची माणुसकी तुला पाहिजे आहे काय ! सेक्रेटरी, उद्यांपासून एक महिनाभर याचा एक पक्का लावायला सांग क्लासटीचरांना. अन् माझं त्यांना नांव सांग—"

पुढच्यास ठेंच मागचा शहाणा, या न्यायानें आमच्या विरुद्ध पक्षाचें दैनिक आमच्या बरोबरच बंद पडलें. पण मासिकांची लढाई अजून चालूच

होती. ‘ कांहीं अपरिहार्य कारणामुळें दैनिक पत्र कांहीं दिवस बंद ठेवणें भाग पडत आहे. वाचकांची निराशा झाली असेल हें आम्ही जाणून आहोंत. तरी ईश्वरी संकेतापुढें आमचा इलाजच नाहीं ’ म्हणून शेवटच्या दैनिकांत आम्ही वाचकांची समजूत घातली होती.

पुढें लौकरच या संपादकाच्या जबाबदारींतून बाबांनीं माझी मुक्तता केली. पण या खेपेला बाबांच्या गुप्त पोलिसी ज्ञानामुळें नव्हे, तर आमच्या बावळटपणामुळें हें प्रकरण उजेडांत आलें.

संपादकाचें काम म्हणजे टांक, दौत, शाई जमविण्यापासून तयारी. पुन्हां एक अक्षर असलें म्हणजे बरें म्हणून सर्व मासिक लिहिण्याचें काम मीच करीत होतों. लहान मुलांच्या मासिकाचा संपादक म्हणजे निव्वळ शुद्धलेखन लिहिणारा.

सोमवारीं मासिक बाहेर पडायचें असल्यामुळें रविवारीं संध्याकाळीं मी दिव्यापाशीं बसून सर्व काम पूर्ण करीत होतों, अनुक्रमणिका का कायसेंसें मी खरडीत होतों. इतक्यांत बन्या घरांत आला. सहसंपादक या नात्यानें त्याला थोडासा अधिकार होता, तरी तो म्हणत होता तो मजकूर छापणें मला मुळींच पसंत नव्हतें.

“ अरे सदू, त्यांत काय आहे ! नुसतं लिही कीं, ‘ रा. रा. बन्याजीपंत कुलकर्णी हे येत्या सोमवारच्या क्रिकेट मॅचमध्यें अप्रतिम खेळतील असा आम्हांस भरंवसा वाटतो. त्यांची खेळण्याची खुबीदार पद्धत आमच्या वाचकांपैकीं सर्वांनीं पाहिली असेलच. आणि नसल्यास बन्याजीपंतांना खेळतांना एकवार तरी त्यांनीं अवश्य पाहावें अशी आम्ही शिफारस करतों. ’ बस्स् ! त्यांत कांहीं माझी स्तुति होत नाहीं नि कांहीं नाहीं. ” बन्या म्हणाला.

“ पण बन्या तुझ्या बाबतींत कधींच भरंवसा देतां येत नाहीं. ” मी हातांतलें काम पुरें करीत म्हणालों.

“ Cricket is a game of chance म्हणून म्हणच आहे. ” बन्या मोठ्या आशेनें म्हणाला.

“ उं हुंः ! ती म्हण तुला नेहमीं लागू पडत नाहीं. तुझ्या बाबतींत

सातआठ रन्स म्हणजे game of chance! नाहींतर शून्य ही आपली वहि-वाटीची निशाणी!"मी हंसून म्हणालों. बन्याला अपमान झाल्यासारखें वाटलें.

बाबा आलेले पाहातांच मी इतिहास काढून वाचूं लागलों. पण बन्याच्या डोक्यांत सुडाचे विचार घोळत होते.

"संदू, माझं नांव ह्या मासिकावर घालूं नकोस!" म्हणून बाबांना ऐकूं जाईल अशा बेतानें बन्या म्हणाला. माझ्या हातून पुस्तक तात्काळ खालीं पडलें. मीं बन्याला गप्प बसण्याविषयीं डोळ्यानें खुणवलें.

"अभ्यास करायचा टाकून मासिकं लिहिणं मला मुळींच नाहीं आवडत." बन्यानें आपली आवडनिवड दर्शविली.

बन्याचा हेतु सिद्धीस गेलाच. बाबांनीं माझ्या दप्तराची कसून झडती घेतली. मासिक आणि तदंगभूत उपकरणें त्यांनीं सरकारजप्त केलीं. मीं कोणत्याहि तऱ्हेनें हरकत घेतली नाहीं!

"हे धंदे करायला शरम नाहीं वाटत जिवाला? दुकानांतले कागद आणून त्यांची ही विधुळवाट! किती दिवस हा फाजिलपणा चालला आहे? अजून दोन वाक्यं सरळ लिहितां येत नाहींत कीं वाचतां येत नाहींत; अन् म्हणे मासिक लिहीत आहेत! तुमच्यावर देखरेख करायला आम्ही आहोंत जिवंत तरी तुमची ही फसवेगिरी? पुढें तुम्ही काय कराल तें दिसतंच आहे." म्हणून म्हणत बाबांनीं एका मासिकाचीं चार मासिकें करून माझ्यापुढें टाकलीं. बन्या हंसत हंसत उठून चालता झाला. बाबा जर त्यावेळीं माझ्याजवळ उभे नसते तर मासिकाप्रमाणें एका बन्याचे चार बन्या करण्याचा मीं प्रयत्न केला असता. बन्याचें कृत्य मला शुद्ध खुनशीपणाचें वाटलें. आणि त्याबद्दल त्याच्यापासून जाब घेईन तेव्हांच राहीन अशी मीं प्रतिज्ञा केली.

"या घरांत तुला रहायचं असेल आणि आईबापांना सुखानं अन्न खाऊं द्यायचं असेल तर पुन्हां या फंदांत पडूं नकोस. नाहीं तर एक तुला तरी घर सोडून जावं लागेल नाहीं तर—" म्हणून म्हणत बाबा तें वाक्य अर्धवट सोडून तसेंच आंतल्या बाजूस गेले. मनांतल्या मनांत बन्याला एक खुमासदार शिवी देऊन मीं त्या मासिकाचे तुकडे कोंपऱ्यांत भिरकावले!

---

# प्रकरण १२ वें.



## प्रारंभ

आजपर्यंत मी बन्याशीं हजारों वेळां भांडलों असेन, कैक वेळां आम्ही भांडणाची मुदत तर चार दिवसांच्यावर ताणली होती. पण सहवासजन्य प्रेमाचा गुण म्हणून म्हणा, अगर मला करमणुकीचें अन्य साधन नव्हतें म्हणून म्हणा, आम्ही पुन्हां हातांत हात अडकवून चालत असूं. लहानपणीं मला इतकेसें समजत नव्हतें म्हणून भांडणाचे प्रसंग रोजच येत असत. ज्याप्रमाणें सकाळीं उगवणें आणि संध्याकाळीं मावळणें या गोष्टी करण्यास सूर्याला दुसरे कोणीं सांगावें लागत नाहीं; ( कवि लोकांना माझें म्हणणें पटणार नाहीं. त्यांच्या मतें सूर्याला कामावर धाडणारी त्याची प्रिया उषा देवी आणि संध्याकाळीं घरीं आल्यावर त्याच्याशीं थट्टामस्करी करणारी संध्यादेवी या दोना स्त्रिया त्याला सांगून सांगून लाल होतात.पण तें सगळें खोटें आहे. निदान तूर्त आपल्याला त्याच्याशीं कर्तव्य नाहीं. ) त्याप्रमाणें आमच्या भांडणाचा उगम व त्याची परिसमाप्ति ह्या सहजासहजीं घडून येणाऱ्या गोष्टी होत्या. पण तें भांडण म्हणजे कसलें ! ह्यानें म्हणावें त्यानें टक्का घेतला, अन् त्याला विचारायला जावें तर त्यानें दुसऱ्याचेंच नांव पुढें करून आपण नामानिराळें रहावें. तरी पण त्या भांडणांतून सुद्धां बन्याचा खुनशी स्वभाव स्पष्टपणें दृग्गोचर होत असे. पुढें पुढें मला खात्री झाली कीं बन्या आंतल्या गांठीचा आहे. त्याच्या मनासारखें झालें नाहीं तर तो वाटेल तसलें हिडिस कृत्य करण्यास मुळींच मागेंपुढें पाहाणार नाहीं. मासिकाच्या बाबतींत त्यानें आपल्या मनाचा नीचपणा व्यक्त केला होता. केवळ त्याची हांजी हांजी करण्याचें मीं नाकारलें म्हणून त्यानें हा असा पलटा डाव टाकून मला मूर्ख ठरवलें होतें.

रागाच्या भरासरशीं मीं दुसऱ्या दिवशीं वर्गांत गेल्याबरोबर मासिक बुडाल्याचीं सविस्तर कारणें मुलांना तोंडीं सांगितलीं. त्यांतल्या एकानें शिष्टपणाचा आव आणून डोळे उडवीत म्हटलें;

" पंधरा मुलांच्या वर्गणीचे पंधरा दुणें तीस पैसे. तीस पैशांचा चिवडा आणला तर किती तरी दिवस पुरेल ! अन् पुन्हां खाणारे दोनच. संपादक आणि सहसंपादक. वर भांडणाची थाप आहेच." मला तो आरोप सहन झाला नाहीं. तरी लाचार होऊन मूग गिळण्यापलीकडे माझ्या हातांत कांहींच नव्हतें. माझ्या समर्थनाकरितां मीं थोडासा प्रयत्न केलाच.

" तुम्हाला खोटं वाटत असेल तर बन्याला माझ्या अपरोक्ष विचारा." मी म्हणालों.

" छेः, छेः ! संपादकांचा शब्द, अन् खोटा मानायचा ? जिव्हा झडून पडेल ना आमची ? तुमच्यासारखीं देवमाणसं उभ्या आयुष्यांत भेटणार नाहींत. आम्हा मर्त्य लोकांच्या बडबडीकडे काय लक्ष देतां ?" हातांतल्या पुस्तकाशीं खेळत, अर्धवट माझ्याकडे पाहून त्यानें विनोदाचा आव आणला. मी मनांत बन्यावर खूप चिडलों. तो या छळवादाला कारण होता. बरोबरीच्या मुलांत खालीं पहायला लावणारा तो अवसानघातकी होता. पुन्हां त्याच्याशीं बोलायचें म्हणून नाहीं ही मीं प्रतिज्ञा मनांत उच्चारली. पण मनांत प्रतिज्ञा उच्चारण्यानें काम भागण्यासारखें असतें तर जगांतल्या कित्येक गैरसोयी आपोआप दूर झाल्या असत्या. शक्य तोंवर वर्गणीदारांचे पैसे त्यांना परत देण्याचें मीं ठरवलें. पण पैसा बन्याच्या हातांत ! पैसे मागण्याचें मला मोठें संकट पडलें होतें. तरी तो पैसा उभा करण्याचें इतर साधन कांहींच नसल्यामुळें एकवार त्याच्याशीं बोलायचें अन् पैसे मिळाले कीं मग मांत्र 'साधुसंत आहांत—आम्हांला तुमचा रस्ता बिकट वाटतो' म्हणून आपण फटकून रहायचें हे बेत मीं ठरवून टाकले. त्या दिवशीं बन्या कुर्‍यांतच वर्गात आला.

माझ्यापासून दोन बाकांच्या अंतरावर बन्यानें आपलें दप्तर ठेवलें. पहिली घंटा झाली होती. आम्ही सर्वजण प्रार्थना म्हणायला उठलों. पण प्रार्थनेच्या ऐवजीं बन्यानें तिसराच प्रकार चालवला—

" अरे हे मासिकाचे संपादक म्हणे ! अग्रलेख लिहितात, स्फुटें लिहितात, अन् घरीं यांना कुणी झाडूनसुद्धां विचारीत नाहींत. काल आपल्या बालरंजनाच्या सुप्रसिद्ध संपादकांना अशी कांहीं तंबी मिळाली आहे घरीं कीं

ज्याचं नांव तें. पुन्हां लिहील तर माधुकरी मागत फिरायला लागणार आहे. तोंड पहा संपादकांचं!" आत्मसंयमन करण्याची मीं पराकाष्ठा केली. मी पुढें पाहून प्रार्थना म्हणत होतों.

त्या दिवशीं महिनाअखेर होती. माझा नंबर पहिला आल्यामुळें वर्गाच्या सेक्रेटरीपणाची माला माझ्या गळ्यांत पडली. मी बन्याकडे अर्थपूर्ण पाहून हंसलों. मात्र बन्याचा चेहरा सुकून गेला.

शाळा सुटल्यावर मीं बन्याला गांठलें. बन्यानें आपण होऊनच सुरुवात केली—

"सेक्रेटरी झालांत. तुमचे हात स्वर्गाला पोहोंचले आहेत. तुम्ही आतां मोठीं माणसें आहांत. आम्ही घरीं जातों आहोंत. उगीच माझ्याबरोबर फिरून तुमच्या मोठेपणाला कमीपणा येईल!"

मीं मुकाट्यानें बन्याचें दप्तर धरलें. बन्यानें चमकून माझ्याकडे पाहिलें.

"ह्या महिन्याची वर्गणी तूं गोळा केली आहेस. ते पैसे मला सगळ्यांना परत द्यायचे आहेत. ते देतोस का?" मी शक्य तितक्या शान्तपणानें म्हणालों. बन्या उत्तराऐवजीं हंसला.

"हा काय मला दम देतां काय? संपादक तुम्ही. माझा काय संबंध? अन् माझा काय अधिकार?" बन्या म्हणाला.

"बन्या, उगीच भांडण वाढवण्यांत कांहींच अर्थ नाहीं. ते पैसे परत दे. याउप्पर तुझ्याशीं कसल्याहि तऱ्हेचा संबंध ठेवण्याची माझी इच्छा नाहीं. झाली एवढी सलगी पुरे झाली." मी म्हणालों.

"केव्हांहि. आतां सलगी खळगींत पुरून टाकायला तुम्ही तयारच असणार! उन्ह उतरल्यावर झाडाच्या सांवलीची काय गरज उरणार आहे? फांद्या तोडल्या तर सरपणाला तरी उपयोगी येतील?" बन्या म्हणाला.

"दुसऱ्याचा आधार देऊन माझ्यापुढें तुझी विद्वत्ता मिरवण्यांत काय अर्थ आहे? झाल्या गोष्टी गेल्या. मास्तरांच्या कानांवर या गोष्टी जाऊं नयेत ही माझी इच्छा आहे. माझं सांगायचं काम मीं केलेलं आहे—" मी म्हणालों.

"आतां फक्त मास्तरांचे कान फुंकायचे बाकी राहिलेलं आहे—असंच

आपलं म्हणणं ना ? खुशाल सांगा. तुमचा मार्ग तुम्हांला मोकळा आहे. तुम्ही काय सांगायचं असेल तें मास्तरांना सांगा आणि मला काय सांगायचं तें मी मास्तरांना सांगेन. मात्र कांहीं त्रास झाला तुम्हांला तर मला वाईट म्हणूं नका—" म्हणून म्हणत बन्यानें रस्ता सुधारला. मी गोंधळांत पडलों. मास्तरांना या गोष्टी सांगणें म्हणजे बन्याच भानगडी उपस्थित होणार. तेव्हां तें शक्य नव्हतें. बन्याची कितीहि मनधरणी केली तरी तो ऐकेलसें दिसेना.

"बन्याऽ" म्हणून मी खरोखरच आर्तस्वरानें हांक मारली. बन्यानें हंसून पाहिलें.

शेवटीं बन्यानें माझ्या गरीब स्वभावाचा हा असा फायदा घेतलाच. माझी सहनशीलता पार नाहींशी झाली. मीं माझ्याकडून होईल तितका सामोपचाराचा प्रयत्न करून पाहिलें होतें—पण नाहीं. बन्या मला मूर्ख समजून हंसला. माझ्या मानी स्वभावाला तें खपलें नाहीं. एक महिनाभर वर्गाची देखरेख माझ्या हातांत होती. बन्याला केव्हांना केव्हां तरी मास्तरांच्या तडाख्यांत आणून सोडीन तरच राहीन, आणि अपमानाचा सूड उगवून घेईन ! ही एक नवीन प्रतिज्ञा मीं केली.

दुसऱ्या दिवशींच बन्याला त्याचें प्रायश्चित्त मिळालें. शेवटच्या तासाला मास्तरांच्या पुढें मीं त्याला उभा केला. त्याचें नांव पुढें करतांच तो माझ्याकडे खुनशीपणानें पाहात पुढें झाला. मीं आरोपीवरचा चार्ज वाचून दाखवला—"प्रार्थनेच्या वेळेला वेडींवांकडीं तोंडें करून वर्गाला हंसवून सोडीत होता. भाषान्तराच्या तासाला पुस्तकांत गाण्याचें पुस्तक अडकवून गाणें म्हणत होता. मधल्या सुट्टींत घंटा झाल्यावर वर्गांत शेंगा खात होता. मीं सांगितलें तर, 'आणखी दहा फुल्या मार माझ्या नांवावर. बोलायचं काम नाहीं !' म्हणून माझ्यावरच डाफरूं लागला. त्यानंतरच्या तासाला मास्तरांचीं चित्रें काढीत होता—"

मास्तरांनीं मान हालवून हंसत म्हटलें, "अरे वाः ! प्रार्थनेच्या वेळेला विदूषकाचं काम, नंतर पिढीजाद गवई, मधल्या सुट्टींत शेंगाखाऊ अन् त्यानंतर चित्रकार. वाः रे पठ्ठे ! इतके धंदे तुला एका दिवसांत करतां येत

आहेत तर हें भिकारडं शिक्षण घेण्याच्या व्यर्थ खटपटींत पडतोस तरी कशाला ? कुलकर्णी, तुझ्यासारखा सर्व धंद्यांत तरबेज असलेला all-rounder मी आज पहिल्या प्रथमच पाहातों आहें. माझे डोळे अगदीं दिपून गेल्यासारखे झाले आहेत. मी भांबावून गेलों आहें. मला तुझ्या पाठीवर शाबासकी देणं आहे. जरा पुढं येतोस का ? का तुझा अपमान होईल ? ” बन्या जागचा हालला नाहीं.

“ बरं बुवा. मोठे लोक घरीं आले म्हणजे त्यांना सामोरं जाण्याचा प्रघात आहे. त्याप्रमाणं मीच पुढं यावं असं तुझं म्हणणं दिसतं. देव, त्याला ओढून आण पुढें—” मास्तर एकदम ओरडून म्हणाले.

“ कुलकर्णी, मास्तरांच्याकडे चल ! ” मी बन्याच्या पुढें उभा राहून म्हणालों.

“ तूं अंगाला हात लावूं नकोस ! ” म्हणून बन्या चरफडत म्हणाला. मीं मास्तरांच्याकडे पाहिलें.

“ थांब; तुला नांवावर फुल्या मारायला त्यानं सांगितलं होतं, मी त्याच्या अंगावर फुल्या मारतों. ” म्हणून म्हणत मास्तर बन्याच्यापुढें येऊन उभे राहिले.

यानंतर बहुतेक दर दिवसाआड मीं बन्याला हा रतीब लावून दिला. माझ्यावर दुष्टपणाचा आरोप येईल हें मी जाणून आहें. मनुष्यत्वाला सोडून माझें वागणें होतें हें मी स्वतःच कबूल करतों. बन्याच्या कळवळून रडण्यानें मला सुद्धां वाईट वाटत होतें. पण माझ्या हातीं सत्ता होती; बन्याला लत्ता देण्याचें कार्य मी जाणूनबुजून करीत होतों. बन्याचा कांहींच का दोष नव्हता ? त्यानेंहि माझा कमी छळ केला नव्हता. मासिकाच्या क्षुल्लक कारणासाठीं मला बाबांच्या किती थपडा खाव्या लागल्या होत्या हें मीं मुद्दामच सांगण्याचें टाळलें आहे; तरी पण ती रात्र मीं कशी घालवली हें मी अजून विसरलों नाहीं. त्यानंतर वर्गांतलीं मुलें मी सेक्रेटरी होतों म्हणूनच गप्प बसलीं होतीं; पुढच्या महिन्याच्या पहिल्या तारखेला याचा वचपा भरून निघणार आहे हें मी जाणून होतों. मला माणुसकी सोडायला लावण्यांत बन्याच कारण होता. आणि त्याचकरितां तो विनाकारण

मार खात होता. माझा नाइलाज होता. सर्वसंगपरित्याग केलेला ऋषी शाळेंत जाऊन शिकत नसतो.

बन्याशीं भांडण असल्यामुळें मला घरांत मुळींच करमत नसे. सुट्टीचा दिवस मी बहुतेक शान्तामामीकडे घालवीत असें. पण तेथेंहि सुलोचना अलीकडे अलीकडे माझ्याशीं तऱ्हेवाईकपणानें वागूं लागली होती. इतके दिवस ती माझ्याशीं अगदीं मोकळ्या मनानें खेळत असे. पण दोनचार दिवस ती माझ्याशीं अगदींच तुटकपणानें बोलायला शिकली होती. मला कारण लवकरच कळून आलें.

रविवारच्या दिवशीं मी शान्तामामीच्या बंगल्यांत शिरायला आणि बन्या बंगल्याबाहेर पडायला एक गांठ. बन्या माझ्याबरोबर पुष्कळदां मामांच्या बंगल्यावर आला होता, पण माझ्या गैरहजिरींत तो येत असेल ही कल्पना येणें शक्य नव्हतें. मी आश्चर्यचकित झालों. पण वैरी दृष्टीस पडला म्हणजे सहानुभूति, आश्चर्य वगैरे भाव दडपून ठेवण्यांतच शहाणपणा असतो. बन्या तोंडानें हलकेच शीळ घालीत निघून गेला.

आंतल्या बाजूस सुलोचना एका पुस्तकांतलीं चित्रें पाहाण्यांत गर्क होती. माझ्याकडे तिनें पाहिलें न पाहिल्यासारखें केलें अन् पुन्हां पुस्तकांत डोकें खुपसलें. मी पुस्तकाकडे पाहूं लागलों. पुस्तकावर नांव बन्याच्या वडिलांचें होतें. आतां माझ्या डोक्यांत लख्कन् प्रकाश पडला. बन्याच्या या भेटीचें कारण मला स्पष्टपणें दिसत होतें. मला बन्याचा अतोनात संताप आला. सुलोचनेच्या शेजारीं मी जाऊन बसलों.

"सुले, कुणीं दिलं तुला हें पुस्तक?" मी पुस्तकाला हात घालीत म्हणालों.

"दिलं असेल कुणी तरी! तुला काय करायचं आहे!" म्हणून म्हणत सुलोचना फणकाऱ्यानें पुस्तक घेऊन दूर सरली.

"मी तुला तसलीं दोन पुस्तकं देईन. पण मला तें पुस्तक तुला कुणी दिलं तें सांग." मी म्हणालों. ही मात्रा बरोबर लागू पडली. सुलोचना बराच वेळ या वायद्याचा विचार करीत होती. नंतर तिचा विचार झाला.

" पण नकोच. तूं वाईट मुलगा आहेस. तूं लोकांना मार बसवतोस. तूंच चहाड्या करतोस. तूं अगदीं—अगदीं वाईट मुलगा आहेस. तूं माझ्या-जवळ येत सुद्धां जाऊं नकोस—" सुलोचना गंभीर मुद्रेनें म्हणाली. हें ज्ञान तिला करून देणाऱ्या सापाला मी चांगलाच ओळखून होतों. पण ओळख देण्यांत हंशील नव्हतें.

" बन्या काल आला होता का ग सुले ? " मीं सहजच विचारल्या-सारखें केलें.

" रोज येतो तो. मग काय करील तो ? तूं त्याच्याशीं भांडतोस, त्याला शिव्या देतोस, त्याला मार देववतोस. घरीं करमत नाहीं म्हणून तो रोज शाळा सुटल्यावर आमच्याकडे येतो. अन् सदू , बन्या फार चांगला आहे हो. मला चित्राचं पुस्तक देण्याचं त्यानं कबूल केलं होतं. अन् आज त्यानं मला हें पुस्तक दिलं. हो—पण तुला मी सांगणारच नाहीं. असल्या चहाडखोर मुलाशीं कुणाचं अडलंय बोलायला ! " सुलोचना फुगटून म्हणाली.

" सुले, तुला मी खरं सांगूं ?—पण जाऊं दे. तुला तें समजणार नाहीं. तूं अजून लहान आहेस." मी म्हणालों.

" मी लहान आहें काय ? बघ मी किती उंच आहें ती ? अन् मला आठवं वर्ष लागलं आहे म्हणून मामी म्हणते. अन् मी आतां अगदीं मोठ्या बायकांसारखं ' मी येतें—मी जातें ' अस्सं—अगदीं थेट अस्सं—बोलतों तें ! " अभिनयाच्या साहाय्यानें सुलोचनेनें आपल्या मोठेपणाची जाणीव करून देण्याचा आटोकाट प्रयत्न केला होता, तरी आयत्या वेळेला ' तो—ते 'चा घोंटाळा उडालाच हें पाहून मला हंसूं आलें.

" अन् बन्या वर्गांत हुषार मुलगा आहे. अगदीं गरीब मुलगा आहे. त्याचा नंबर पहिला आहे तरी वर्गाच्या मास्तरांनीं तुलाच कायसंसं नेमलं—अन् म्हणून तूं त्याला मार देववतोस—" सुलोचना पुढें म्हणाली.

" हें तुला बन्यानं सांगितलं ना ? " मी बन्याची कारवाई ओळखून म्हणालों.

" परवां मामांनासुद्धां त्यानं सांगितलं. अन् तो मग पुष्कळ रडला.

मामा तुला मारणार आहेत. त्यांनीं बन्याला अगदीं बजावून सांगितलं कीं ‘ दिसूं दे तर सद्या पुन्हां मला, मी त्याला असा ठोकतों कीं नाहीं !’ तुला मार दिला म्हणजे तूं पुन्हां असं करणार नाहींस—” म्हणून म्हणत सुलोचना आंतल्या खोलींत जाऊं लागली. “ सुले, मला वाईट म्हणते आहेस ? तूं लक्षांत ठेव. कधीं तरी सांपडलीस कीं बघ मग ! ” मी ओरडलों.

“ अरे जा ! काय करशील तूं ? मारशील होय ? मी मामांना सांगेन. मग काय करशील ? ” अशा रीतीनें माझ्या धमकावणीचा उपहास करीत सुलोचना निघून गेली. आणि तोच प्रश्न आज माझ्यापुढें उभा आहे. माझ्या धाकाला ही कुठपर्यंत बिचकून राहील हें मला नक्की सांगतां येणें आजहि तितकेंच कठिण आहे.

इतक्यांत पाठीमागून खुद्द शान्तामामीच आली. सुलोचनेनें आपली सर्व गाऱ्हाणीं तिला सांगितलीं.

“ सदू, तुला कांहीं कांहीं दिवसांनीं भांडणाचं वारं येत असतं का रे ? आज बन्या मला सांगत होता. अन् त्याला तूं अगदीं बोलूं सुद्धां नये असले शब्द बोलतोस ? इतक्यांत तूं मुंबईचं माझं शिक्षण विसरशील असं मला वाटलं नव्हतं. सदू, तुझी आई मला काय म्हणेल बरं अशानं ? तुझ्या शिक्षणाची, तुझ्या चांगल्या वागणुकीची जबाबदारी माझ्यावर आहे ना ? मग तूं असं कां बरं करतोस ? मामीला वाईटपणा येणं तुला बरं वाटेल का ? ” मामीनें बोलतां बोलतां मला अगदीं जवळ ओढून घेतलें. मामीला सत्य कसें समजून सांगावें या विचारांत मी पडलों.

“ मामी, मी तुला सांगितलं तर तुला खरं वाटेल ? माझ्यावर तूं विश्वास ठेवशील ? ” मी तिचे हात धरून म्हणालों.

“ सदू, तूं जगाशीं खोटेंपणानें वागलास तरी मामीजवळ तूं नेहमीं सचोटीनेंच वागशील ही माझी बालंबाल खात्री आहे. ” मामीच्या आवाजांत किंचित् अभिमानाची छटा दिसून येत होती.

“ मग बन्यानं जें कांहीं मामांजवळ सांगितलं आहे तें अगदीं निखालस खोटं आहे. बन्याचं आणि माझं भांडण झालं हें मला कबूल आहे,

पण भांडणाची बाजू पेटायला त्यानं काडी ओढली—" म्हणून हळुहळू मामीच्या हातांशीं खेळत मीं, खालच्या मानेनं तिला सगळा प्रकार अथ-पासून इतिपर्यंत समजावून दिला.

"इश्श ! एका पंचवीसतीस पानांच्या चोपडीकरितां का एवढा ग्रंथ ?" म्हणून म्हणत मामी हंसूं लागली.

"मामी, तूं हंसू नकोस. त्यांत माझा अपमान किती बरं झाला ? अन् मुलांची वर्गणी मी कशी परत करणार ? मी कांहीं बन्यासारखा आई-बापांचा लाडका मुलगा नाहीं ?—" मी खिन्न मुद्रेनें म्हणालों.

"चल ! कांहीं तरी बोलूं नकोस. वेड्या, इतकं वाईट वाटून घ्यायला काय झालं ? तुझे आईबाप कांहीं तुला पाण्यांत पहात नाहींत. एखाद्याचा स्वभावच मूळचा त्रासिक असतो. तरी वरवरच्या त्रासिक मुद्रे-वरून लगेच म्हणे, 'मी कांहीं आईबापांचा लाडका नाहीं !' असं म्हणणं शोभतं का तुला ? कपाळावरच्या आंठ्यांवरून वैराच्या गांठी ओळखतां येतात, तरी पण त्या शोधून काढायला तितका अनुभव लागतो. तुला काय अनुभव आहे ? आतां माझं लग्न होण्यापूर्वीं इकडेसुद्धां तुझ्या बाबांच्या घरींच सारं शिक्षण झालं ना ? त्यांनीं तुझ्यासारखी कधींच तक्रार केली नाहीं. मी तुला तुझे पैसे देतें. असा जिवाचा पुन्हां त्रागा करून घेऊं नकोस— अन् असं चुकूनसुद्धां मनांत आणूं नकोस. सारेच दिवस सारखे नसतात. उद्यां कदाचित्—" म्हणून म्हणत मामी उठली.

मामीला मीं सारें समजावून सांगितलें. तिची समजूत पटली. पण सुलोचनेला माझा विश्वास येईना. बन्यानें तिला इतकें काय सांगितलें असावें ह्याचा मला उलगडा पडेना. मीं तिच्यावर रागावून पाहिलें, रुसून पाहिलें, पण मीं दुसऱ्याला मार उगीच बसवतों हा तिचा ग्रह कांहीं केल्या बदलेना. लहान वयांत मनांत राहून गेलेली अढी शेवटपर्यंत कायम राहिली. मी वेड्यासारखें मामीजवळ त्याप्रमाणें बोलून दाखविलें. मामीनेंहि तिला परोपरीनें सांगून पाहिलें. तेवढ्यापुरतें ती माझ्याशीं निमूटपणें खेळ-ण्याचें कबूल करी. पण थोड्याच वेळांत ती पुन्हां कांहीं तरी खुसपट काढून निघून जाई. काय असेल ते असो, बन्या तिला जवळचा वाटूं

लागला. मी या तिच्या परक्या भावाला पाहून मनांत जळफळूं लागलों. पण !—स्वस्थ बसण्यापलीकडे मीं काय करणार होतों ?

# प्रकरण १३ वें



## विजयी वीर

क्रिकेट खेळावयास काय काय अवश्य गोष्टी लागतात याविषयीं पुष्कळसे मतभेद आहेत. मामांच्या मतें खालील गोष्टी अवश्य लागतात. आणि मी प्रथम क्लबची वर्गणी त्यांच्याजवळ मागायला गेलों त्या दिवशीं त्यांनीं मला मोठ्या कळवळ्यानें विचारलें,

"१. लहानपणींच डोळे फोडून घेण्याची विरक्ति उत्पन्न होण्यास तुला जगाकडे पहाण्याचा कंटाळा कां आला आहे ?

२. अजून माझ्या मतें तुझे बरेच सोहाळे होणें आहेत. तरी लग्नाला उभा राहिलास तर तुझ्याकरितां गारगोटीचे किती दांत तयार करवून आणूं ? त्याचा खर्च कुणाच्या नांवावर टाकायचा ?

३. शाळा आतां पुढें सोडून देण्याचा विचार आहे कीं काय ?"

अर्थात् या सर्व प्रश्नांचीं उत्तरें मी देण्याच्या भानगडींत पडलों नाहीं.

मला क्रिकेटविषयीं इतका जिव्हाळा वाटण्याचें मुख्य कारण बन्या. बन्या एका क्लबांत खेळायला जात असे. क्लब होता चणेकुरमुऱ्यांचाच. दर रविवारीं एक मॅच खेळायची, अन् वर्गणीच्या पैशांतून डाळेचुरमुरे आणून त्यावर ताव मारायचा, हें त्या क्लबाचें अंतिम ध्येय होतें. जयापजयाची त्यांनीं मुळींच कदर बाळगली नाहीं. उलट, कर्में करतांना फळाची आशा बाळगली म्हणजे फळाची बाधा होते, हें तत्त्व त्या क्लबांतील सर्व मेंबरांना पुरेपूर पटलें होतें. बन्याच्या नादानें मीहि त्या क्लबांत शिरलों. अर्थात् हा इतिहास भांडणापूर्वीचा आहे.

आमचा कप्तान मोठा हौसी होता. खेळण्याच्या वेळीं लागणारीं उप-

करणें त्यानें स्वतःच खांद्यावर टाकून ग्राउंडपर्यंत रखडत यावें! आम्ही त्याच्याबरोबर चालत असूं; पण हातांत कांहींहि न घेण्याचें आमचें व्रत होतें. वर्गांत मास्तरांनीं त्याला, तूं ग्राउंडवर झोंपडी बांधून रहा, म्हणून एक वेळ उपदेशहि केला होता. झोंपडीचा खर्च त्यांनीं दिला असता तर कदाचित् उपदेशाला फळेंफुलें आलीं असतीं. पण द्रव्याच्या अभावीं तें काम तसेंच राहून गेलें. पायांत पुणेरी जोडा, वर लांडी तुमान, अंगांत रेशमी कोट इत्यादि थाट अन् खांद्यावर फराळाच्या डब्याप्रमाणें टांगलेलें स्टंपांचें पोतें—ह्या अवसानांत पराक्रम करून दाखवायला निघालेल्या या वीराचें आम्ही आपल्या मासिकांत एके काळीं कविताबद्ध ( 'काव्यमय' म्हणा पाहिजे तर! ) वर्णन दिलें होतें. ज्याप्रमाणें पलटणींत सार्जंट हा एका तुकडीची आई समजण्यांत येते त्याप्रमाणें आम्हा खेळाडूंना हवें नको पहाणारी आमची मातृदेवता म्हणजे आमचा बुटबैंगण कप्तान. खाण्यापिण्याच्या बाबतींत कप्तान आमचा आधार होता; तर खेळण्याचे बाबतींत आम्ही ( मी सोडून ) त्याचे आधार होतों. माझी त्याची दोस्ती जमण्याचें कारण हें कीं, धांवांची गोळाबेरीज करण्याचे कामांत आम्ही वांटेकरी होतों. रणांगणावर जाऊन बाहुबलाच्या जोरावर शत्रुसैन्याची दाणादाण उडविणें, वेळप्रसंगीं त्यांची (म्हणजे स्वतःचीच) फळी फोडणें, शत्रूला पळतां पळतां 'दे माय धरणीं ठाय' करावयास लावणें इत्यादि वीरश्रीचा भाग आम्हांला साधत नसला, तरी पण कारकुनी पेशाची मुत्सद्देगिरी लढवून दर दहा धांवागणिक आणखी वर एकदोन धांवांचें आडमाप टाकणें, आणि खेळाच्या शेवटीं एकन् दोन पांच, पांचन् तीन नऊ असा गणितशास्त्रज्ञांनाहि लाजविणारा हिशोब करून आमची सरसी झाल्याचें जाहीर करणें, ह्यांत आम्ही दुसऱ्या कुणालाहि आमचा हात धरूं देत नव्हतों. शत्रुसैन्याच्या कारकुनानें नव्वद धांवांची बेरीज केली असली तरी आमच्या हिशोबानें एकशेंतेरा रन्सचा लेखी उतारा तयार असे. 'अहो चोरून चोरून काय इतक्या रन्स आम्ही चोरूं? फार तर दोनचार चोरूं!–पहा, तुमचाच हिशोब चुकला असेल,' म्हणून संपादणी करण्यास आम्ही तयार होतों. तलवारीला जोड म्हणून लेखणी हा पाहिजेच.

आयुष्यांत कोणतीहि गोष्ट उत्साहानें करायला निघावें तर, कांहीं तरी कारण उपस्थित होऊन त्या कामामध्यें मला यश येऊं नये हा ईश्वरी नेमानेमच आहे कीं काय? इतक्या जोमानें मी क्रिकेटच्या खेळाला उत्तेजन देण्यास पुढें सरसावलों; पण त्या खेळाची आणि माझी गट्टी कांहीं केल्या जमेना. आणि गडी बाद होण्याचे तरी किती मार्ग आहेत? तंगडेंच मधें आलें म्हणून रामराम, तर केव्हां 'क्रीझ'च्या बाहेर गेला म्हणून रामराम! एखाद्याला जर तंगडी पुढें करून खेळण्याची लहानपणापासून संवय असेल तर त्यानें खेळाकरतां म्हणून तंगडी घरीं ठेवून यावें कीं काय? कांहीं कांहीं लोकांना बंधनांच्या बाहेर वागण्याची खोडच असेल, त्यांना हें दीड बॅटीच्या अंतराचें बंधन कोठपर्यंत घालणार? बॅटला लागून चेंडू स्टंपला शिवला तरी तंबूत परत जायला सांगतात. हळुहळू हें खूळ वाढत जाऊन बॅटीनें चेंडू मारणारालासुद्धां परत जायची पाळी आल्याशिवाय राहाणार नाहीं. मला बन्यानें पुष्कळच समजावून सांगण्याचा प्रयत्न केला होता; पण त्याची सांगण्याची तऱ्हा ही—

"अरे, त्यांत कांहीं कठिण नाहीं. 'लेग'ला चेंडू आला कीं, तीन स्टंपांमध्यें पाय ठेवून चेंडू छातीवर घ्यावा, अन् झक्पैकीं 'लेग ग्लान्स' ठेवून द्यावा. नर्व्हस् होतां उपयोगाचं नाहीं. सावकाश, शान्तपणं सगळं उरकलं पाहिजे. आतां समज, त्यानं बॅटीखालीं टप दिला; अगदी एकदम पुढें जाऊन चोपावा. 'कट ब्रेक' ऐसा नुसता सणकावला पाहिजे. कीं देख रहे है. आमचे देवधर कसे खेळतात बघ. 'ऑफ ड्राइव्ह' म्हणजे नुसती सरपट चंपी. जमिनीवरचं गवत ऐसं सफा कापलं जातं कीं कोणीहि दोन आणे द्यावेत. इंग्लंडच्या सटाक्लिफचा खेळ तर याहून अप्रतिम. त्याचा खेळ म्हणजे डोळ्यांची बासुंदी—" ही बन्याची तऱ्हा. कसा विश्वास ठेवावा माणसानें? याला गुरु तरी कसा करावा? यानें सटाक्लिफचा खेळ कधीं पाहिला होता? अन झक्पैकीं 'लेग ग्लान्स' ठेवण्यांत नर्व्हस होतां उपयोगी नाहीं! खरें आहे. छातीवर चेंडू अन् म्हणे झक्पैकीं...

त्यापेक्षां दुसऱ्याच्या यशांत आपलें यश समजून त्यांतच आनंद मानण्याचें मीं ठरवून टाकलें. आणि यशाला मदत म्हणून, रणांगणावर जरी

नाहीं तरी, झाडाखालीं स्कोअरची वही हातांत धरून त्यांत मी आपल्या करामतीची कसरत करून दाखवूं लागलों. परोपकारबुद्धिसुद्धां बेताचीच असावी हें बरें. नाहीं तर माझ्यासारखी फजिती उडायची एखादे वेळेस! बन्यावर उपकार म्हणून त्याच्या नांवावर मीं घसघशीत शंभराचा आंकडा टाकून दिला. पण बाळ शून्यांतच आनंद मानून परत आला. नांवापुढें शंभराचा आंकडा पाहातांच त्याला ती थट्टा वाटली. खरा प्रकार मीं त्याला सांगितला तेव्हां तो गप्प राहिला.

रोजच्या खेळण्यांतसुद्धां मी अगदीं लाजरा होतों. मला वाटतें, नवीन संसारांत पडलेल्या मुली—हल्लींच्या काळांतल्या मुलींच्या विषयीं प्रश्नच नाहीं—माझ्यापेक्षां पुष्कळच धीट असतील. फारच रागावलेला नवरा असेल तर पहातील पहातील अन् एखादे वेळेस अल्लाद ‘सिक्सर’ म्हणून खिडकी-बाहेर फेंकून देतील. पण माझ्याच्यानें चेंडूला शिवण्याचेंसुद्धां धारिष्ट फार क्वचित् प्रसंगीं होत असे. तेव्हां मला पुष्कळच सवलती देण्याचें इतर मुलांनीं ठरवलें. माझ्या वेळेला ‘लेगआउट’ची बात नाहीं. ‘सेल्फ आउट्’ धरायचा नाहीं. चारदां कॅच झेलला म्हणजे एकदां आउट्. अन् दोनदां स्टंपला चेंडू लागला कीं, मग मी बॅट खालीं ठेवायची. ह्या सर्व सवलती आमच्या कप्तानलाहि मिळाल्या होत्या. मात्र लहर लागली तर बोलिंग टाकण्याचा त्याला खास अधिकार देण्यांत आला होता. मीं मनांत म्हटलें कीं, आहेत ह्या सवलतीं काय कमी आहेत? या पचनीं पडल्या म्हणजे दुसरा हप्ता मागायला कांहीं हरकत नाहीं.

‘आरंभशूराः खलु दाक्षिणात्याः’ ही म्हण आम्हीं सार्थ करून दाखविली. क्लबाच्या महत्त्वाकांक्षेची उडी अवसानाबाहेरची ठरल्यामुळें लवकरच क्लबची पुण्यातिथि साजरी करण्याची संधि आली. प्रारंभीं कप्तानाच्या मनांत पुढीलप्रमाणें कार्यक्रम उरकायचें ठरलें होतें:

दर रविवारीं एक सामना, दर महिन्याकाठीं गांवांतल्या कोणत्या तरी जिमखान्याच्या टीमशीं एक सामना; दर वर्षी मुंबईतल्या एखाद्या प्रसिद्ध टीमशीं सामना. आणि पांच वर्षें झालीं तर मग इंग्लंडच्या टीमला इकडे बोलवायचें का आपणच तिकडे जायचें हें मागाहून ठरविण्यांत येणार होतें.

या कार्यक्रमांतला पहिला भाग आम्ही थोडासा आचरला होता. चार क्लबांशीं आम्ही टकरा दिल्या; पण चारीहि वेळीं आमचींच डोकीं फुटलीं. क्लबाच्या भवितव्याविषयीं नाना प्रकारच्या शंका निघूं लागल्या. इतके नामांकित खेळाडू हाताशीं असतांना हा विपरीत अनुभव येतो, याचें कारण तरी काय हें शोधून काढण्यासाठीं मेंबरांच्या खेळावर लक्ष ठेवण्याचें ठरलें. ज्याप्रमाणें चुकारपणें काम करणाऱ्या नटाला विंगमध्यें परत गेल्यावर मालकाकडून धन्यवादात्मक वाक्यें ऐकावीं लागतात त्याप्रमाणें 'भोपळा वीर' कप्तानाच्याकडून शाबासकी मिळवूं लागले. हा प्रकार नेहमींच चालू झाला; तेव्हां एका बॅटीधरानें स्वच्छ उत्तर केलें कीं, 'आहे हा असा आहे आमचा खेळ. तुम्हाला जर यापेक्षां चांगला नमुना पाहिजे असेल तर एक तुम्ही स्वतः तरी नीट खेळा, नाहीं तर माझ्याऐवजीं दुसऱ्याची नेमणूक करा.' संस्थेची अब्रू जाऊं नये म्हणून कप्ताननें त्याला थोडेंसें चुचकारलें. पण जगाची मौज ही आहे कीं, जों जों आपण आपला म्हणून एखाद्याला जवळ करायला जावें तों तों त्याला लांब जावेंसें वाटूं लागतें.

आणि ह्याच सुमारास आमच्या मासिकामध्यें व्यंग काव्यें येऊं लागलीं. काव्याचा अभिजातपणा त्याच्या साध्या रचनेवर अवलंबून असतो हें तत्त्व आम्हांस माहीत होतें. शक्य तोंवर गद्याच्या धर्तीवर काव्यें लिहिण्याचा आमचा प्रयत्न परिणामकारक झाला. प्रत्येक खेळाडूच्या बारिकसारिक कृतीचें वर्णन येऊं लागलें. याचा परिणाम म्हणजे अंतस्थ कलह. दोन पक्ष, त्यांचे बगलबच्चे, अन् त्यांचीं राजकारणें!

त्यानंतर दर तासाला एक या प्रमाणांत धमकीवजा पत्रें कप्तानच्या हातांत पडूं लागलीं. बिचारा कप्तान! कोर्टांतल्या कारकुनाप्रमाणें दोन्ही खिशांतून नोटिशी बाळगणार तरी कुठवर? शेवटीं एके दिवशीं सामना लढण्याचें मुक्रर झालें. याच सुमारास बन्यानें आपल्या खेळाची आगाऊ जाहिरात देण्याचा कसा प्रयत्न केला तें सांगितलेंच आहे. त्यामुळें मीं तो सामना प्रत्यक्ष डोळ्यानें पाहिला नाहीं. पण कप्ताननें संजयाचें काम करून मला सर्व कांहीं येऊन सांगितलें. त्याच्या म्हणण्याचा इत्यर्थ इतकाच

होता कीं क्लबाची परिसमाप्ति झाली, ह्यापुढें कानाला खडा! क्लब म्हणून काढण्याचें डोक्यांत येईल त्या दिवशीं डोकें तुटून जावो, हीच परमेश्वरापाशीं प्रार्थना! आणखीहि त्यानें मला बरेंच सांगितलें. क्रिकेटच्या लढ्याऐवजीं आपापसांत सामना झाला. एकानें स्टंपच उपसून दुसऱ्याचा कपाळमोक्ष करण्याचा घाट घातला. पण सुदैवानें तो घाट लवकरच मोडला म्हणून बरें. आणि सरते शेवटीं त्यानें मला थोडेंसें तत्त्वज्ञान सांगितलें, " देव, तुला वाटतं आहे, पण सगळे चोर आहेत हे. क्लबाकरितां मीं किती तरी खटपट केली ! नवीन बॅटी, नवीन चेंडू—सगळं कांहीं मीं आपल्या स्वतःच्या खर्चानं आणलं. पण मनुष्याचा स्वभावच मुळीं वाईट. सुस्थिति असली अन् चैनीनं दिवस काढायला मिळाले कीं करमणुकीचं साधन म्हणून भांडणाची आठवण होते. अन् भांडणाचा परिणाम एखादे वेळेस हा असा चमत्कारिक होतो. जाऊं दे—माझं काय त्यांत वांकडं होणार आहे ! मी अभ्यास करीन—तिकडे मी आपला रिकामा वेळ घालवीन. मनुष्याचा स्वभावच मुळीं......'

एकाद्या राजवटीचें वैभव अस्तंगत होण्याच्या पंथास लागलें कीं त्या गोंधळांतून नवीन शक्ति निर्माण होत असते, त्याप्रमाणें आमच्या क्लबच्या फाटाफुटींतून बन्यानें आपलें डोकें जें वर केलें तें एकदम शाळेच्या टीममध्यें खुपसलें. मीं मात्र पुन्हां त्या भानगडींत न पडण्याचें ठरवून टाकलें. कारण, दर चेंडूच्या वेळेला माझ्या छातीची धडधड; आणि दर खेपेला ती रिकामी खटपट अन् लटपट. त्यापेक्षां लोकांनीं आपल्याला खेळाडू नाहीं म्हणून हिणवलें तरी पत्करलें, पण प्राणवायूचें हाल नकोत! या विचारानें मी क्रिकेटच्या बॅटीला पुन्हां शिवलों नाहीं.

आमच्या शाळेंत शील्ड मॅचची नोटीस फिरली होती. मी दुरूनच बन्याची तयारी पहात होतों. आज दुपारीं बन्या अकरा सूर्यांपैकीं एक सूर्य म्हणून मिरवणार होता. या अकराव्या सूर्याचें दुरूनच कौतुक करण्यांत शहाणपणा होता. गाडीच्या कामांत दोन तास अगोदर जाऊन बसलेलें आपलें बरें म्हणून सावधगिरी बाळगणारी वृद्धावस्था, आणि क्रिकेटच्या सामन्याच्या प्रसंगीं सकाळपासूनच खेळाचा वेध लागणारी

बाल्यावस्था—यांत कोणत्या अवस्थेला जास्त गूण द्यावेत हें समजणें कठिण आहे. प्रत्यक्ष खेळांत भाग घेणाऱ्या मुलांना एक आठवडा दुसरा विषयच नसतो. माझ्यासारख्या कांठावर उभा राहून दोन टाळ्या पिटणाऱ्या क्रिकेटभक्तांस तो दिवस तरी सणासुदीसारखा भासल्यास नवल नाहीं.

सामन्यास सुरुवात बारा वाजतां होणार होती. अगदीं पांच मिनिटें कमी असतांना साहेबी ऐटींत ग्राउंडवर जाणें मला पसंत नव्हतें. मी आपल्या गांवढळी पद्धतीप्रमाणें साडेदहा वाजतां मामीकडे जाऊन जेवण्याच्या इराद्यानें घरांतून बाहेर पडलों.

मामा ऑफिसमध्यें जाण्याच्या गडबडींत होते. अर्थात् मला स्वस्थ उभें राहाणें प्राप्तच होतें. त्यांतून मामांची शिस्त कमालीची असे. मामांच्या शिस्तीला कंटाळून मामीनें सोंवळ्याओंवळ्याचा फारसा विधिनिषेध ठेवला नव्हताच मुळीं. तरी पण 'डबा द्या—' 'अजून विडा नाहीं का तयार झाला—' 'चल आटप. ए चेंगटे, तुला नाहीं तरी मला साहेबाची भीति आहे—–' इत्यादि हुकूम पाळतां पाळतां मामी अगदीं त्रासून जाई. तितक्यांतच सुलोचना पाण्याकरितां आरोळी ठोकी. आणि आज मी आगंतुक पाहुणा दाराशीं उभा होतों. मामांचें काम नेहमींच्या शिस्तींत चालू होतें.

"माझ्या टोपीवर ब्रश नाहीं मारलास. माझं काय जातं आहे? तुझी अब्रू जाईल." मामा ओरडून म्हणाले.

"ब्रश सांपडत नाहीं. मी काय करूं?—" मामीनें हातांतली टोपी रावसाहेबांच्या डोक्यावर ठेवली. मामांनीं कांहीं एक न बोलतां आपल्या कोटाच्या बाहीला टोपी घासली आणि माझ्याकडे पहात पुन्हां डोक्यावर ठेवून दिली. "सदू, निदान तूं तरी दाढी वाढवीत जा. असा वेळीं उपयोग होतो बघ. पण हें ह्यांच्या डोक्यांत कुठलं उतरायला!" म्हणून मामा हंसत म्हणाले.

"जेवतांना कोण गाडी भरधांव निघाली होती! अन् आतां उशीर होत नाहीं वाटतं? का आपलं मला सारखं उभं करण्यांत गंमत वाटते?" मामी म्हणाली.

" सेवाधर्मासारखा सतीला दुसरा धर्म नाहीं—" मामा सायकल हातानें लोटीत म्हणाले.

" अन् कोटाला गुंड्या नाहीं का घालायच्या ? हें काय असलं फल्कक फल्कक उडवीत जायचं ?" मामी म्हणाली.

" हें बघ, मी तुला असाच का पदर काढतेस, तसाच का काढतेस म्हणून एकदां तरी बोललों आहें का ? जोंपर्यंत मी दुसऱ्यावर टीका करीत नाहीं तोंपर्यंत दुसऱ्यानें माझे दोष उगाळूं नयेत. अन् नाहीं तरी संसारी मनुष्यानं कोटाला गुंड्या न लावणंच बरं असतं. खिशांतून सामानाचे पुडे असणार, अन् दोन्ही बाजूंच्या कचऱ्याच्या पेट्या पुढें घेण्यांत काय अर्थ आहे ? " मामा म्हणाले. मामी घरांत गेली.

" अरे हो—सदू, आज तुमच्या शाळेची मॅच आहे ना ? आमच्या त्या वेड्या पिराला घेऊन जा. काल बन्यानं तिच्या डोक्यांत भरवलं आहे वेड. जपून ने बरं का ? " मामा माझ्या उत्तराची वाट न पहातांच गेले. मला मुळींच पसंत नव्हतें. सुलोचना—आणि बरोबर न्यायची ? अडलं नाहीं ! म्हणे, जपून ने बरं का—! मी मामीशीं वितंडवाद घालूं लागलों.

" अरे, पण ती तुझ्या कडेवर का बसणार आहे ? छत्री घेऊन जा अन् घटकाभर घेऊन बैस तिला. अरे, ती लगेच कंटाळेल. दुपारीं आणून सोड अन् मग तूं जा आपला एकटा. " मामीला ह्यांत वादाची बाजू कोठेंच दिसत नव्हती; पण मला ह्यांत वादाला जागा नाहीं अशी बाजूच दिसत नव्हती.

" मामी, तूं माझं ऐकून घे. मुलींनीं मॅच पहाण्यांत त्यांना काय मौज वाटणार आहे ? त्यांत काय सागरगोट्यांसारखं अप्पीथप्पी करतां येणार आहे ? अन् एखादा चेंडू जोरांत आला अन लागला म्हणजे मग—? "

" सदू, मला तूं काय लहान मूल का समजतोस ? का मीं कधीं तुझी क्रिकेटची मॅच पाहिलेली नाहीं ? तुला मी सांगतें तसं कर—अन् तूं ' मुली मुली ' म्हणून इतकं झिडकारल्यासारखं करतोस—मुली म्हणजे काय समजतोस रे ! " मामी अर्धवट थट्टेनें बोलत होती. तरी आपलें म्हणणें खरें करण्याचा तिचा विचार होता. अर्थात् मुली म्हणजे, मुलें जर क्रिकेटची

मॅच पहायला बाहेर जाऊं लागलीं तर त्यांना अडवणारी एक अवसान-घातकी जात, यापलीकडे मला मुलींचा जास्त अनुभव आला नसल्या-कारणानें मीं त्या प्रश्नास उत्तर देण्याचें टाळलें. पण मनांतल्या मनांत मी परमेश्वराला 'मुली निर्माण तरी कशाला केल्यास' हा प्रश्न टाकायला विसरलों नाहीं.

बाहुली सजल्याप्रमाणें सुलोचना कपडे घालून आली. आतां हिच्या सगळ्या प्रश्नांना उत्तरें दिलीं पाहिजेत, हिचें लाडकें लाडकें अरळ जिभेचें बोलणें ऐकलें पाहिजे, हिच्या चालीप्रमाणें अगदीं मुंगीबाईसारखें चाललें पाहिजे—अन् बाईसाहेबांच्या डोक्यावर वाटेनें छत्र धरलें पाहिजे!—या एक एक गोष्टी जसजशा डोळ्यांपुढें नाचूं लागल्या तसतसा मी जगाच्या या अन्याय्य पद्धतीचा तिटकारा करूं लागलों. पुढें मी 'स्त्रीदाक्षिण्यापरता नाहीं धर्म, स्त्रीदाक्षिण्य हेंचि परब्रह्म' म्हणून नाना प्रकारचे रंग खेळलों असलों तरी त्या वयाला मला सुलोचना ही एक विनाकारण अडचण वाटे.

त्या दिवशीं मी क्रिकेट पहातांना कमालीचा गंभीर होतों. कारण मी जर एखादे वेळेस—'लगाव पिट्टी' म्हणून ओरडलों तर सुलोचना लगेच विचारी कीं, 'लगाव पिट्टी' म्हणजे काय? त्याकरतां मीं मनावर नियंत्रण ठेवून कांहींच न बोलण्याचें ठरविलें. आमच्या शेजारच्या झाडावर दोन-तीन प्राणी कांकडी आणि पेरू या फळांच्या सहाय्यानें जुगार खेळत होते. यानं चेंडू मारला तर कांकडी खाऊं अन् नाहीं मारला तर पेरू खाऊं हा त्यांचा क्रम चालू होता. अर्थात् दोहोंपैकीं एक घडून येई—आणि त्याप्रमाणें 'अरे कांकडी' 'अरे पेरू' म्हणून ओरडत कोणत्या तरी एका फळाचा लचका तोडण्यांत येई.

"वेडीं आहेत मुलं तीं, तूं आपली समोर बघ" म्हणून मी सुलोच-नेला समोर पहाण्यास लावलें. बोलायचें नाहीं म्हणून निदान स्त्रियांना उद्देशून निश्चय केला असेल तर तो कितपत टिकतो किंवा त्या टिकवूं देतात याचें मला चांगलेंच प्रत्यंतर आलें. भाटासारखी मुली बडबडत होती.

"सदू, तूं कां रे नाहीं खेळत? तुला येत नाहीं खेळतां?" सुलो-चना छत्रीच्या मुठीशीं खेळत म्हणाली.

" मला खेळायला येतं आहे, पण क्रिकेट खेळण्यानं उगीच वेळ जातो, अन् वेळ दवडणं चांगलं नाहीं" अशा अर्थाचें मीं उत्तर केलें.

" मग बन्या खेळतों तें ? बन्याचा नाहीं का वेळ जात ? तो खेळणार आहे म्हणून तर मी आलें. " सुलोचना म्हणाली.

इतक्या लहान वयांत—पण मला कसेंसेंच वाटलें. दुसऱ्याच्याकरितां सुलोचना माझ्याबरोबर आली होती !

" तूं बोलत कां नाहींस ? अजून तूं बन्याशीं भांडतोस का ? बन्या फार चांगला मुलगा आहे. त्याच्याशीं भांडूं नकोस. तो बघ—तो खेळायला आला वाटतं—" म्हणून म्हणत सुलोचना उभी राहून बन्याला हांका मारूं लागली. बन्याला हांक ऐकूं जाणें शक्यच नव्हतें. पण आजूबाजूचीं मुलें हंसलेलीं पाहून मी मात्र चांगलाच खजिल झालों.

मी डोळ्यांनीं मॅचकडे पाहात होतों खरा, पण डोक्यानें विचारांची जंत्री फिरवीत होतों. बन्याच्या खेळाचें कौतुक करण्यासारखी माझी मनःस्थिति नव्हती. उलट सुलोचनेच्या प्रत्येक शब्दागणिक माझ्या कपाळावर नवीन नवीन आंठ्या चमकत होत्या. तिच्या बोलण्याचा मला इतका संताप येण्याचें कारण काय होतें ? तसें पहायला गेलें तर बन्या खरोखरीच चांगला खेळला. मींसुद्धां त्याला त्याप्रमाणें बोलून दाखवलें. मग सुलोचनेच्या शब्दांचें इतकें महत्त्व मला कां वाटावें ? इतक्या लहान वयांत मत्सराची ठिणगी पेट घेऊं शकत असेल काय ? कांहींच निश्चितपणें सांगतां येत नाहीं. पण एवढें मात्र नक्की कीं, सुलोचनेचे स्तुतिवर्षाव मला शल्ल्याप्रमाणें बोंचत होते. मधल्या वेळेच्या उपहारासाठीं खेळाडू तंबूंत गेल्यवर मी सुलीला घरीं जाण्याचा अग्रह करूं लागलों.

" मला नाहीं लागली भूक. आपण संध्याकाळपर्यंत असेंच बसूं. " ती व्यवस्थित मांडी घालून बसून राहिली.

" हो ! संध्याकाळपर्यंत बसून राहूं. रात्रींसुद्धां इथंच निजूं. करायचं आहे काय घर अन् दार—!" मी तिला वेडावून दाखवण्याच्या उद्देशानें म्हणालों. तरी ती उठली नाहीं.

" तुला बसायचं असलं तर रहा बसून. मी आपला घरीं निघून जातों. " म्हणून मी तेथून जाऊं लागलों.

" वाईट आहेस तूं. कध्धीं येऊं नये तुझ्याबरोबर. मी मामांना सांगितल्याशिवाय सोडणार नाहीं. पण मग बन्याला आपण जाऊन पकडूं अन् मग जाऊं—" सुलोचना जाग्यावरून उठत म्हणाली. आम्ही बन्याची गांठ घेतली. दोन्हीं गालफडें बिस्किटानें भरलेल्या स्थितींत बन्या धांवतच बाहेर आला. मी तोंड फिरवून उभा राहिलों.

" का सदाशिवराव, बोलणार नाहीं का माझ्याशीं ? इतकं मी जीव तोडून आपल्या शाळेकरतां उन्हांत तळमळतों आहें अन् तुम्हाला एक शब्द सुद्धां बोलावसं वाटत नाहीं माझ्याशीं ? पाहिलंस सुले, बघ आतां यांत कोणाचा अपराध आहे—? " म्हणून बन्यानें तिच्या हातांत दोन-चार बिस्किटें खुपसलीं.

केवळ सुलोचनेच्या सुर्वतीखातर म्हणून मीं त्या दिवशीं पुन्हां बन्याशीं समेट केला. पुन्हां मित्रत्वाच्या एकजुटीनें वागण्याचें आम्हीं कबूल केलें. सुलोचना बन्याशीं बोलतांना अगदीं रंगांत आली होती.

" बन्या, आज मामा घरीं आले म्हणजे तूं ये आमच्याकडे. मामा तुला शाबासकी देतील. मी त्यांना तुझ्या खेळाचं सगळं कांहीं सांगेन— पण हें तुझ्या हातांत रे काय ? " सुलोचना त्याच्या ग्लोव्हशीं खेळत म्हणाली.

" बोट वगैरे चेंडू लागून फुटूं नये म्हणून हें घालावं लागतं. अजून मीं काढलंच नाहीं. " बन्या हंसत म्हणाला. सुलोचना आश्चर्यानें थक्क झाली. बाई—! बोटं फुटायची भीति ! अन् मग जेवणार कसं ?

जरी मित्र म्हणून रहायचें मीं नुक्तेंच कबूल केलें होतें तरी सुलोचनेच्या वाटेंतल्या बडबडीमुळें माझें डोकें अगदीं भडकून गेलें. मीं कांहीं एक उत्तर केलें नाहीं. तिला बंगल्यावर सोडून मी त्याच पावलीं घरीं परतलों.

---

# प्रकरण १४ वें



## चाळिशीवाले साहेब

बाबांनीं स्वच्छ सांगितलें कीं—" कॉलेज म्हणजे पैसा उधळण्याच्या प्रतिष्ठित जुगाऱ्यांचा अड्डा आहे. नोकरी किंवा धंदा करून प्रामाणिक-पणानें पोट न भरण्याचा आळशीपणा अंगांत असणाऱ्या उडाणटप्पू कार्ट्यांना ती एक पळवाट आहे. शिक्षणाच्या पांघरुणाखालीं स्वतःची नालायकी झांकण्याचा तो एक कावा आहे. लोकांना तो एक भ्रम आहे. शिकलेल्या मुलांच्यावर नजर ठेवण्याचं मुलीच्या आईबापांना अलीकडे खूळ लागल्यासारखं दिसतं. त्यांना माझा स्पष्ट सवाल आहे कीं, या पोरांच्या अंगांत दिडकी कमावण्याची ताकद आहे का? कमवायला बेजार पण गमवायला तय्यार!—आणि ही तुमची पुढली पिढी. काय राष्ट्राला तुमचा उपयोग? तुमच्या डिग्रीचा राष्ट्राला काय उपयोग? कॉलेजमधलीं मुलं म्हणजे हुंड्याच्या वासाला पाहून नाकपुडी वर करणारीं अडेल तट्टू जनावरं. स्वतःच्या बापाला काळ, मुलीच्या बापांची आबाळ—आणि इतकेंहि करून पोरगं भटके रानोमाळ. सध्यांचा काळ म्हणजे जीवनकलहाचा पेटलेला डोंब आहे. त्यांत आमच्या-सारख्यांची आहुति पडणार आणि तुम्ही ह्या विस्तवाशीं शेकत बसणार. मला पुष्कळच सांगतां येईल—पण तें तुला पटत नाहींसं दिसतं आहे. पण एवढं मात्र लक्षांत ठेव कीं, ज्या दिवशीं तूं कॉलेजांत पाऊल टाकण्याकरितां या घराच्या बाहेर पडशील त्या दिवशीं नीट विचार करून बाहेर पड. या घरांत तुला पुन्हां थारा मिळणार नाहीं. आईबापांची मुर्वत न ठेवणारीं मुलं जिवंत राहाण्यापेक्षां मेलेलीं काय वाईट? तुला स्वतःसिद्ध वागायचं असेल तर प्रथम आम्हा दोघांचा नमस्कार घे. या घरांत मी मालक आहें; आणि घरांतील हरएक गोष्ट माझ्या मताप्रमाणें चालली पाहिजे. तुला मालकी गाजवायची इच्छा असेल तर मला या

घरांतली वडिलकी सोडली पाहिजे. नाहीं तर तूं आपली सोय दुसऱ्या कोणत्या तरी ठिकाणीं पाहिली पाहिजेस. याउप्पर पुन्हां मला विचारूं नकोस. आतां तुला मारहाण करण्यांत माझीच शोभा होणार आहे. सरळ शब्दांत सांगतों कीं, मी तुला कॉलेजमध्यें धाडायला प्राण गेला तरी कबूल नाहीं. उद्यांपासून दुकानीं तूं आलं पाहिजेस.—इथं शुंभासारखा उभा राहूं नकोस—"

प्रत्यक्ष राजा नाहीं तरी, दिवाणाच्या अधिकारांत ही गोष्ट आहे कीं काय हें पाहाण्याकरितां मी आईच्या पाठीमागें कॉलेजचें तुणतुणें वाजवूं लागलों. आईनें स्वच्छ सांगितलें कीं,—

"तूं फार शाहाणा आहेस अन् मी आहें वेडी. तूं कांहीं मला असा छळूं नकोस. तुझ्याकरतां म्हणून तुझ्या जन्मापासून मला दुसऱ्यांचीं बोलणीं खावीं लागलीं आहेत. तुला जन्म देण्याचं पातक माझ्या हातून घडलेलं होतं; त्याकरितां याच जन्मीं मीं आजपर्यंत झाडे देऊन टाकलेले आहेत. आतां तूं आणि तुझे वडील. काय वाटेल तें करा! मी आतां या घरांत फक्त अन्नवस्त्राची मालकीण आहें. मला कसलीहि हौस शिल्लक नाहीं. जन्मभर तुमच्या शिव्या खायला मी कांहीं कुणाची बांधील नाहीं हें मात्र आधीं सांगून ठेवतें. देवा, नारायणा, विठ्ठला, पांडुरंगा! झाला इतका सोहाळा रग्गड झाला, बाबा! आतां एकदां भरल्या कुंकवानं डोळे मिटले म्हणजे सुटलें. एकदांची मरून गेलें कीं सत्यनारायण करीन—"

मला हंसूं आलें. मनुष्य मेल्यावर सत्यनारायण करणार तरी कसा? आई जास्तच संतापली—

"तुम्हांला सगळ्यांना हंसूं येतंय रे? कशी चालली आहे मजा आईची, नाहीं? हंसा, मला वेड लागलं आहे म्हणून हत्तीवरून साखर वांटा—तूं माझ्या दृष्टीसमोरून चालता हो पाहूं. तूं अन् तुझी मामी—ती तुझी आई आहे, मला काय म्हणून विचारतो आहेस?—" म्हणून म्हणत आईनें तोंडावरून पांघरूण घेतलें.

'यंव रे गृहसौख्य!' अशा दृष्टीनें मी एक समाधानाचा सुस्कारा सोडून आईची आज्ञा शिरसावंद्य मानण्याच्या हेतूनें मामीकडे गेलों.

" मामी, त्यांना जर माझा इतका कंटाळा येतो तर यांनीं मला जन्म दिला तरी कशाला ? प्रेमाचा वगैरे प्रश्न बाजूस ठेवला तरी मनुष्यमात्रामध्यें सहानुभूति म्हणून कांहीं तरी भाग शिल्लक उरतोच कीं नाहीं ? का ह्यांनीं तेंहि सोडून दिलं आहे ? पोटच्या पोराला असं तरवारीच्या धारेवर धरण्यांत काय बरं अर्थ आहे ? त्यांतून मी अजूनपर्यंत कधींच नापास म्हणून झालों नाहीं. पैशाचा अनाठायीं खर्च होतो ही सबब करण्याचं कांहींच कारण नाहीं—"

मामी बराच वेळ माझ्याकडे पहात होती. बोलतांना तिचा स्वर थोडासा कंपित झाल्याप्रमाणें दिसलें.

" सदू, तुला आतां या गोष्टी समजण्याइतकी बुद्धि आलेली आहे. तुझ्या आईबापांचं आणि तुझं कधींच सूत नव्हतं. आणि तें यापुढं होईल असं वाटतहि नाहीं. त्यांचे स्वभाव तुझ्यापेक्षां फार निराळे आहेत. त्यांच्या मनांत काय आहे हें सांगण्याचं माझ्या हातचं नाहीं, पण तुझ्या मनचं मी बरोबर सांगूं शकेन. जुनाट झाडाच्या आश्रयाला चिकटून राहाणाऱ्या पानासारखी तुझी स्थिति आहे. सोडावं तरी डंसतं, धरावं तरी डंसतं— असा हा दुहेरी पेंच आहे. त्यांच्याशीं फटकून राहणं व्यवहाराला सोडून तर आहेच आहे, पण तुझ्या स्वार्थालासुद्धां तें हानिकारक आहे. त्यांना मात्र तुझी मुळींच किंमत नाहीं. आणखी कितीहि जगांतून उठणाऱ्या माणसासारखीं तीं वागलीं तरी त्यांचं अडेलसं मला वाटत नाहीं. पण तुला मात्र अजून स्वतंत्रपणं चमकण्याची हिंमत नाहीं. मी तुझ्या आईला सांगून पाहीन. पण कांहीं उपयोग होईलसं मला वाटत नाहीं; अन् हल्लीं त्या माझा रागराग करूं लागल्या आहेत. "

" त्याला कारण मी–" म्हणून मी मध्येंच म्हणालों. मामीनें 'हूं' म्हणून मान हालविली.

मात्र मामांच्यामुळें मला बराच धीर आला.

" कॉलेज– ? Where they talk and talk and talk—? ते गद्दे महाराज निशार जिल्हे ? अरे, कॉलेज म्हणजे तुझी काय कल्पना आहे, सदू ? अरे कॉलेज म्हणजे दारूचा गुत्ता. त्या गुत्त्यावर पिकेटिंगला तुझे

वडील एका कोंपऱ्यावर आणि मी एका कोंपऱ्यावर असे दोन देशभक्त उभे आहोंत. " मामा म्हणाले.

" त्यांत तुम्ही नवीन असं काय सांगितलंत ? बाबा तर मुळीं कॉलेज म्हणजे जुगारांचा अड्डा आहे म्हणतात. " मी म्हणालों.

" असं का ? आम्ही दोघेहि मोठीं माणसं. आमचे विचार नेहमींच जुळते रहाणार यांत आश्चर्य कसलं ? बरं जाऊं दे. तुला कॉलेजमध्यें ढकलण्याचं पाप मी आपल्या शिरावर घेईन–" मामा टेबलावरचे कागद डोक्यावर घेत म्हणाले.

" तें काय विचारावं ? दिवसां त्यानं कॉलेजांत जावं अन् रात्रीं स्टेशनवर जाऊन झोंपावं. खासा न्याय ! " मामी हंसत म्हणाली. मामा हंसूं लागले.

" हं ? ही नवीन धमकी वाटतं ? सदू, तूं हिचा निराशावाद कधींहि ऐकूं नकोस. माझं थोडंसं ऐक. मनुष्यानं जगांत दिवस काढायचे म्हणजे थोडासा निर्लज्जपणा अंगीं आणावा लागतो. कार्य यशस्वी झालं म्हणजे याच निर्लज्जपणाला लोक धाडसी, शौर्य, कर्तबगारी इत्यादि मोठ्या नांवानं संबोधितात. माझा तुला सल्ला आहे कीं, ऐकावं वडिलांचं अन् करावं मनाचं. वडिलांनीं कितीहि आततायीपणा केला, आईनं कितीहि आक्रस्ताळीपणा केला तरी आपल्या बेतांत बिलकूल खोट आणूं नये—" मामा म्हणाले.

" छान सल्ला आहे ! वडील माणसांना खुंटीवर बांधून ठेवणं सोपं नाहीं म्हटलं ? इतकं जर ज्ञान आहे तर आपण कां नव्हतं कॉलेजांत जायचं ? " मामी म्हणाली.

" आपण घरांत येणं केलंत म्हणून. कॉलेजांत जाऊन जे धंदे करायचे ते साकसुरत घरींच करतां येऊं लागले; मग कॉलेजची जरूरी कुठं राहिली ? कॉलेजमध्यें जाऊन धांवत्या मृगजलाची व्यर्थ आशा करण्यापेक्षां सुखासुखी घरीं बसल्या नदीकांठचा विसांवा मिळाला तर कां सोडा ? अरे हो, हें पण अश्लील झालं असेल, नाहीं का ?—"

" नाहीं—नाहीं; आतां या वयाला हें शोभतं आहे अशी कल्पना

असेल तर आणखी कुणब्याच्या पोरांसारखं याहि पुढं जावं. माझी कशाला आडकाठी ? हें पहा काय तें ? बोलणाऱ्याला लाज नाहीं तर ऐकणारा तरी कशाला धरील ? अहाऽऽऽहा ? इतकीं सगळीं मुलं अगदीं अशींच असतील नाहीं ? काय बोलायचं तरी—" मामी म्हणाली.

" दे शिव्या ! आणखी कितीहि मानेची कसरत केलीस तरी आतां मी तुला डरणार नाहीं. मला बोलायचं तें मी अस्सं उघड उघड बोलणार ! सदू, हा बघ माझा सोदाहरण निर्लज्जपणा. तुझ्या वडिलांच्या बाबतींत मला प्रथम अस्सा त्रास झाला. लग्न झाल्यानंतर एक वर्ष आम्ही नवरा-बायकोंनीं एकमेकांच्या वाऱ्यालासुद्धां उभं रहाण्याची चोरी. सगळा खेळ डोळ्यांचा अन् मेळ मनाचा. " मामा हंसत म्हणाले. मामीनें तोंडावर हातांतलें पुस्तक झांकण्याकरितां घेतलें.

" माझ्यासारख्या बोलक्या माणसाला न बोलणं म्हणजे सक्तमजुरीची शिक्षा—एके दिवशीं मी अगदीं धिटाईनें हिच्याजवळ गेलों. तुझी आई 'काय हा थिल्लरपणा' या दृष्टीनं माझ्याकडे डोळे वटारून पाहूं लागली. मी अगदीं सरळ हिच्यापुढं जाऊन उभा राहिलों. ए, तूं हंसूं नकोस ग—तूं आपली उठून जा पाहिजे तर ! मोठ्या धिटाईनं मीं हिच्याजवळ, अंगाला लावण्याचा साबण आहे का म्हणून विचारलं—हिनं काय उत्तर दिलं देव जाणे; मला वाटतं ही भांबावून गेली असावी. माझा हा विराट-रूपाचा देखावा पहातांच मी तिथून लवकर निघून जाईन तर बरं, असं हिला होऊन गेलं होतं. पण मी चार दिवस विचार करीत होतों या गोष्टीचा. चार दिवसांच्या विचारानं ठरवलेली गोष्ट चार शब्दांवर मी कसा बरं सोडणार ! तुझी आई निमूटपणं बाहेर जाऊन ऐकूं लागली. मी हिच्याशीं गप्पागोष्टी करीत तासभर आंत बसलों होतों. मध्येंच तुझ्या आईला ओरडून सांगितलं कीं, उभं राहून पाय दमतील; खालीं बसून येईल ऐकायला—! लवकरच सगळ्या आळीभर ही नवलाची गोष्ट प्रसिद्ध झाली. 'काय बाई तरी ! आपल्या वेळेला हें असं बिलकुल नव्हतं. दोनदोन मुलं झालीं तरी एक अक्षर तोंडून निघत नाहीं आमच्या—' इत्यादि स्वानुभवाचे फवारे निघूं लागले. तुझ्या बाबांच्याहि कानांवर ही गोष्ट

गेली. पण ते तरी मला कसं विचारणार ? बायकोशीं बोलणं हा गुन्हा होत नाहीं. शेवटीं मीं तुझ्या आईला समजावून सांगितलं कीं, बाई—जगदंबे, कृपा कर. रुसूं नकोस माझ्यावर. तुझा मान मी राखतोंच आहें. पण आतां मला कांहीं कांहीं बाबतींत तिचा सल्ला घेणं जरूरच पडतं, म्हणून मी तिच्याशीं बोलतों. एरवीं मला दुसरे उद्योग काय कमी आहेत ? तुझ्या आईनं संभावितपणानं मला सांगितलं कीं 'करतां हें फार चांगलं आहे. बायका तुम्हांस स्वर्गासमान आहेत—आतां आमच्याशीं असलेलं तुमचं नातं तुटलं. जिवाभावाच्या बायकोशीं नवरा बोलत बसणारच केव्हांहि ! बायको गोड अन् बहीण अगोड.' सदू, इतका ग्रंथ तुला सांगण्याची गरज एवढीच कीं, या गोष्टी अगदीं नाजुक असतात. भावनेला वश होऊन आपल्या जिवाला त्रास करून घेण्यांत कांहीं मतलब नाहीं. त्या वेळीं जर मी हिच्याशीं फटकून राहिलों असतों तर त्रास कुणाला झाला असता ! आम्हांलाच ! त्याप्रमाणं मनुष्यानं असल्या गोष्टीकडे पहाण्याचं करावं तें अगदीं निर्लज्जासारखं करावं." मामा सिगारेट पेटवीत म्हणाले.

"काय दृष्टान्त दिला आहे पण—दुसरे दृष्टान्त नव्हतेच जसं कांहीं." मामी फणकाऱ्यानें म्हणाली.

"हें बघ, आपल्यासमोर जें जीवित घडत असतं त्यांत समरस होऊन त्याचं चिकित्सक दृष्टीनं निरीक्षण करण्यांतच शहाणपणा समजला जातो. माझ्याप्रमाणं दुसऱ्या एका बड्या लेखकाचं हेंच मत आहे—" मामा म्हणाले.

"पण हा कोरडा उपदेश आहे हें समजतं आहे का ?" मामी हंसून म्हणाली.

"तो ओला करायला साहेब उद्यां मला झारीभर पाणी देणार आहेत. महिनाभर थोडीशी ओढाताण होईल, पण तूं मात्र माझी ओढाताण करतां कामा नये. नाहीं तर खिशाशीं धिंगामस्ती करशील अन् मला फाटके कोट घालावे लागतील."

"सुटलें बाई या एका काळजींतून. म्हटलं आणखी हें कुठल्या थराला जाणर कुणास ठाऊक." मामी म्हणाली.

" तुला तेवढी काळजी ! अन् मला नाहीं का माझ्या पोरीची काळजी ?" मामा माझ्याकडे पहात म्हणाले.

" म्हणजे ? मामा मी काय तुमची मुलगी आहें कीं काय !" मी आश्चर्यानें विचारलें.

" बाबा एक आहे तेवढी पुरे झाली. तिच्याकरतां मला कष्ट करावे लागतातच, आणि वर तिच्या भावी नवऱ्याच्या कॉलेजकरतां झीज सोसावी लागतेच आहे ! हा एकीचा त्रास, तर दुसरी घेऊन मी काय माणसांतून पळून जाऊं ? "

मी थक्कच झालों. मामांची ही थट्टा होती का खरोखरींच त्यांचा हा विचार होता ? सुलोचना घरांत नव्हती हें एक प्रकारें बरेंच होतें. मीं मामीकडे चोरून पाहिलें. मामी माझ्याकडे तिरक्या नजरेनें पहात होती.

" असला हा रडका जांवई मला नकोच मुळीं. कसा सुरेख गोरागोमटा—" मामी हंसूं लागली.

" मी लग्नच करणार नाहीं—" कांहीं तरी बोलायला पाहिजे म्हणून मी बोलून गेलों.

" आनंद आहे ! मुलं म्हणणार आम्हाला लग्न करायचं नाहीं; अन् मुली म्हणणार आमची स्वतंत्रता जाते म्हणून आम्हालाहि लग्न नको !—मग चालायचं तरी कसं देव जाणे ! बाकी ही तुझी धमकी पोकळ आहे म्हणा. ' मला लग्न करायचं आहे,' असं म्हणणारा एकहि मुलगा भेटत नाहीं; पण वयाच्या बाविसाव्यावर एक दिवस उजाडत नाहीं तोंच 'आमची वाइफ्, आमची वाइफ्' म्हणून बडबडत सुटतो. बाबा—वीर वैराग्या, प्रेमाचे प्रताप सुमारें विसाव्या वर्षापासून जाणवूं लागतात; तोंपर्यंत तूं सध्यां हेंच सर्वांना सांगत सूट. नाहीं तर तुझे बाबा म्हणतील, आहे मुलगा उतावळा जमवा झालं गोतावळा ! माझ्या पोरीची मग कुणाला काळजी रे वेल्हाळा ? बी. ए. हो—तोंपर्यंत सुली शिकते आहे. मग तुझ्या बाबांना मीच धमक्या घालीन. देशस्थांमध्यें असला संबंध मान्य आहे." मामा म्हणाले.

" बाई ! बाई ! बाई ! त्याला जुलमाचा का राम राम करायला लावायचा आहे ? तूं सदू, माझं ऐक—" मामी म्हणाली.

" तूं सदू, माझं ऐक—" म्हणून मामा मामीच्या दुप्पट ओरडून म्हणाले.

" पण मामा, ऐकावं वडिलांचं अन् करावं मनाचं म्हणून तुम्हीच मला सल्ला दिला आहे." मी हंसून म्हणालों.

" तूं मला तोंडघशीं पाडणार असं दिसतं आहे. मी तुला कोणताच सल्ला दिलेला नाहीं अन् देऊं इच्छितहि नाहीं. तूं कॉलेजची फी उद्यां येऊन घेऊन जा. बाबांना सध्यां कळवूं नकोस. आणि मग कांहींहि बोलले तरी घरचा उंबरठा सोडून बाहेर पडूं नकोस. त्यांची प्रकृति आहे अशक्त. तेव्हां मारामारीचा प्रसंग येईलसं वाटत नाहीं—" मामा म्हणाले.

" इश्श ! " मारामारीचा उल्लेख बिलकूल न आवडून मामी म्हणाली.

" आतां काय करावं ? अग तुला त्यांचा स्वभाव माहीत नाहीं. मी त्यांच्या हातचा मार किती तरी वेळां खाल्ला आहे. आमच्या आईबापांना आमच्या अस्तित्वाची काळजी नसल्यामुळं आठ वर्षांपासून मी ह्यांच्याच घरांत वाढलों आहें. मला ते खवीस समजून लागेल तसं बडवीत होते. फिर्याद कुठं स्वर्गांत नेणार ! पण त्या वेळेला तरुणपणची रग त्यांच्या अंगांत होती. आतां ती शक्ति कायम नाहीं म्हणून मीं सूचना केली." मामा म्हणाले.

मला मारामारीची भीति वाटत नव्हती. पण घरांतल्या तंट्याबखेड्याला मी अगदीं कंटाळून गेलों होतों. पण शिकण्याची इच्छा बलवत्तर असल्यामुळें मीं मामांच्या म्हणण्याप्रमाणें वागण्याचें ठरवून टाकलें.

चाळशीवाल्या साहेबांच्या जत्रेंत मीं मोठा शंकातुर हृदयानें प्रवेश केला. प्रथमदर्शनीं तीं साहेबी ऐट, तीं बेगुमानपणें स्वैर बोलण्याची तऱ्हा, मधूनच नाजुक हंसण्याची लहर इत्यादि प्रकार दृष्टीस पडतांच मला, उगीच आपण या बाजूला आलों असें होऊन गेलें. इतर मुलांच्या मेहरपी काढल्याप्रमाणें मारलेल्या कांचाची ऐट पाहून मी मनांत खजील झालों. कपड्यांच्या बाबतींत माझी दैन्यावस्था नव्हती हें जरी सत्य होतें तरी चालू फॅशनच्या दहा वर्षें मागें रहाण्याची मला संवयच लागून राहिली होती.

शाळेंतल्या मेंढरांची बोली आणि या पेंढाऱ्यांची बोली यांत जमीन-अस्मानाची तफावत दिसून येत होती. वयोमानाप्रमाणें निसर्ग आपली छाप मुलांच्या चेहऱ्यावर मारण्यासाठीं धडपड करीत होता. पण, निसर्गाच्या नियमांना धाब्यावर बसवण्याकरतांच कीं काय, बाल्यावस्थेंतील तुळतुळीत चेहरा तसाच कायम ठेवण्याची मानवी धडपड स्पष्टपणें दिसून येत होती. सहकार्य करून वागायचें मग कुचराई कां, या विचारानें प्रेरित होऊन बरेचजण आपल्या केशराजीचें कौतुक करणारे होते. नाकाला नथ शोभ-णार नाहीं या विचारानें चष्मा ऊर्फ चाळशी हा नवीन नेत्रालंकार पुष्क-ळांनीं पत्करला होता. ‘ बुच्च्या ’ डोळ्यांनीं त्यांच्यांत मिसळण्याची मला खरोखरींच लाज वाटूं लागली !

सर्व बाजूंनीं पाहिलें असतां मी एक रस्ता चुकलेलें कोंकरूं होतों. मला चालीरीति माहीत नव्हत्या. आपापसांत स्त्रियांच्याविषयीं बोलतांना ह्यांना एकेरी नांवानें हांक मारण्यांत शिष्टपणा समजला जातो हें मला पोराला काय कळणार ? मुली हा विषय कॉलेजच्या आवारांत फिरकत असतो ही मला कल्पनासुद्धां नव्हती. पण पुढें मला कळलें कीं या विषयाचा अभ्यास करणारे विद्यार्थीवृंद थोडेथोडके नसतात. मला वाटतें कीं हा विषय जर परीक्षेकरतां नेमला तर पेपर तपासणाऱ्या सद्‌गृहस्थांना अशीं कांहीं काव्य-मय वर्णनें वाचावयास मिळतील कीं जन्मभर असेच पेपर तपासावयास मिळावेत म्हणून पदरचे पैसे देऊन परीक्षक होण्याकरतांहि झिंबड उडेल. अर्थात् मीहि एक थोडासा फाटका तुटका कवी झालों होतों तें पुढें येईलच.

पहिल्या दिवशीं मी कॉलेजांत एखाद्या चोरासारखा दबकत दबकत शिरलों. बाबा दोनचार दिवस मुंबईला कांहींतरी दुकानाच्या कामानिमित्त गेले असल्यामुळें इतक्यांतच त्यांना समजण्याची धास्ती नव्हती. माझ्या भिण्याचें कारण निराळेंच होतें. कॉलेजमधलीं मुलें म्हणजे कोणी तरी देवमाणसें असावींत, तीं आपल्यापेक्षां किती तरी हुषार—इत्यादि कल्पना लहानपणा-पासून माझ्या डोक्यांत घोळत होत्या. आतां त्याच मुलांमध्यें मी त्यांच्यांत-लाच एक म्हणून शिरणार होतों. तरी कॉलेजमध्यें शिरतांत मला कुणी तरी बाहेर येऊन ‘ ए मुला, तूं कशाला आलास या ठिकाणीं ? तुला समजत

नाहीं का ! मोठ्यामाणसांमध्यें तुला मिसळायचं आहे काय ! ' म्हणून म्हणेल अन् मग सगळ्या मुलांना माझी किंमत कळेल, या वेडगळ विचाराला मी भीत होतों. माझ्यासारख्या मुलानें या मुलांत मिसळणें म्हणजे त्यांच्या मोठेपणाला कमीपणा आणण्यासारखें आहे ही माझी भोळसट समजूत. या वरच्या मोठेपणाखालीं किती खोटेपणा दडलेला असतो हें मला पुढें समजून आलें. वाघ म्हणून पट्ट्याचें कांतडें अंगाभोंवतीं गुंडाळून घेतलेलें जनावर शेवटीं गाढवच ठरलें. सोन्यासारखे शोभणारे हात शेवटीं चुलीबाईच्या डोक्यावर शेणाची थापकुली करण्यांतच गुंग असतात हें मला लवकरच कळून चुकलें.

बन्याभाऊ माझ्या पाठोपाठ हळुहळू येत होता. मुलगा शिकेल तितका पैसा ओतायचा हें बन्याच्या वडिलांचें ध्येय असल्यामुळें त्याला कांहींच त्रास पडला नाहीं. त्याला त्रास पडला तो मॅट्रिक पास होण्यांतच. तेथून जो पक्षी निसटला तो थेट कॉलेजच्या वातावरणांत उडूं लागला. बन्याची गोष्ट निराळी होती यांत शंका नाहीं.

अपरिचित ठिकाणीं जायचें, अनोळखी माणसांशीं व्यवहार करायचा तेव्हां एकाला दोन असलेले बरे, या पोक्त विचारानें बन्या आणि मी हळुहळू मुख्य इमारतींत गेलों. एकदां सगळ्या गोष्टी नजरेखालून घातलेल्या असल्या म्हणजे वेळ प्रसंग आला तर आपली तयारी पाहिजे या विचारानें आम्ही कांहींएक न बोलतां जिन्याची एक एक पायरी चढत होतों. जिना संपला तेव्हां बन्यानें माझ्याकडे पाहिलें. मला त्याच्या पहाण्याचा अर्थ तत्काळ समजला.

' तीस ' मी हंसून म्हणालों. आम्हा दोघांनाहि या पोरकटपणाची लाज वाटली. आम्ही इकडे तिकडे न पहातां तडक वर्गाचा रस्ता सुधारला.

पण वाटेंतच चार चाळशीवाले साहेब उभे होते. त्यांच्या तपकिरीच्या डब्या, सुपारीनें भरलेलीं थोबाडें आणि दोन पायांवर समतोल उभें रहाण्याची शैली इत्यादि अवलोकन करतांच बन्या थबकून उभा राहिला. कांहीं तरी धोका असावा हें मींहि ताडलें. पण कोणत्या प्रकारचा हें पहाण्यासाठीं मी बन्याला हाताशीं धरून उभा राहिलों.

" काय बनला आहे पण ! गोडबोल्या, तूं लेका चंडाळ आहेस. तुला तो आतां असा शिव्या देईल कीं नाहीं ! चार चार वर्षे लेका—एकेका वर्गांत नांदतां, अन् प्रौढपणा तुमच्या अंगांत मुळींच नाहीं ?" एक म्हणाला.

" आमचीं चार वर्षे—पण आपलीं तीन तरी आहेत ना ? जाऊं दे रे —वडील जोंपर्यंत पैसा पुरवायला तयार आहेत तोंपर्यंत किती वर्षे झालीं हा हिशोब करण्याची काय जरूरी आहे ? आपल्याला वर्षांची कदर नाहीं. ज्ञानाची आहे. एक वर्षाच्या ज्ञानापेक्षां चार वर्षांचं ज्ञान चौपट. अन् ज्ञान अनुभवांत असतं म्हणून लोक ओरडतातच कीं नाहीं ? झालं तर, माझा अनुभव चार वर्षांचा आहे—" दुसरा एकजण म्हणाला.

यांच्या बोलण्यावरून मला एवढें कळलें कीं चार वर्षे मुरलेलीं हीं लोणचीं आहेत; पण ' बनायचं ' म्हणजे काय ? अन् कोण कुणाला शिव्या देणार हें कांहीं मला समजेना. बऱ्या तर तेथून चलण्याकरितां माझा हात ओढूं लागला.

" परगांवचीं मुलं म्हणजे आपले पाहुणे आहेत. त्यांचा सत्कार करायला पाहिजे आपण." एकजण म्हणाला.

"आणखीन् यापेक्षां जास्त सत्कार तो कोणता बुवा ? चांगलं आल्याबरोबर आमच्या भगिनीवर्गाकडे त्याला सोपवून दिला आहे. आतां त्या ह्याला नीरांजनानं ओवाळतील. अन् हा त्यांना ओवाळणी घालील—" सर्वजण हंसले.

" बहुतेक अश्रूंची ओवाळणी घालील तो त्यांना—" पुन्हां सर्वजण हंसले.

मी जास्तीच घोटाळ्यांत पडलों. इतक्यांत एका खोलीचें दार खाड्कन उघडलें. आंतून एक मुलगा भेदरलेल्या चेहऱ्यानें बाहेर पडला. त्याच्याकडे पाहून चाळशीवाल्या साहेबांनीं एकजात रुमालानें तोंडें झांकलीं. इतक्यांत पुन्हां दरवाजा उघडला गेला. सुमारें सतराअठरा वर्षे वयाच्या एका तरुणीनें बाहेर पाहिलें.

" गेला बाई तो. आतां पुन्हां केव्हां तरी—" म्हणून पुटपुटत दर-

वाजा लावून घेतला. बाहेरच्या सभावाल्यांच्यामध्यें चर्चा सुरू झाली. एकानें फक्त ' अं ऽऽऽ? ' करून प्रश्न चिन्हासारखा लांबट चेहेरा केला. दुसऱ्यानं ' हूं ' करून विनोदी छटा धारण केली. तिसऱ्यानें ' सावध रे सावध ' असें पुटपुटत चष्मा पुसण्याकरितां हातांत घेतला. चवथा धुरंधर वीर ' छडा लावलाच पाहिजे ' असें कांहींसें पुटपुटत तेथून निघून गेला. तिघेहिजण पुन्हां देवबाप्पाचें दर्शन घडावें या धार्मिक भावनेनें बराच वेळ आतां एका पायावर मग दुसऱ्या पायावर असे उभे राहिले. शेवटीं हातावर उभें रहाणें योग्य दिसणार नाहीं या व्यावहारिक अडचणीमुळें नाइलाज होऊन खालीं गेले. बन्यानें माझ्याकडे पाहिलें.

" बन्या, कांहीं तरी दिसतं आहे. चल आपण त्या मुलाला विचारूं." म्हणून म्हणत मीं बन्याला ओढीत नेलें.

आयुष्याला वैतागलेल्या मुद्रेनें तो मुलगा दूरच्या झाडाकडे टक लावून पहात होता. तो साधारणपणें आमच्याच वयाचा असावा हा तर्क खरा ठरला. अनोळखी मनुष्याशीं एकदम ' काय हो, कसं काय ! चिंगुताई बऱ्या आहेत ना !' इत्यादि घरगुती पद्धतीनें बोलावें तरी कसें ? आम्हीहि त्याच्यासारखी वैतागलेली मुद्रा करून त्याच झाडाकडे टक लावून पाहूं लागलों. टक लावून पहाण्यानें आमचे डोळे स्थानभ्रष्ट होणार कीं काय ही भीति वाटूं लागली, तरी आमच्या त्या पाहुण्याच्या मनांत स्नेहाची ज्योत पेट घेईना. मानसशास्त्रांतला एक नियम आहे कीं, सर्व गोष्टी सुरळीत चालल्या असतांना मध्येंच एखादी अनपेक्षित गोष्ट घडून आली कीं मनुष्याचें त्याकडे तात्काळ लक्ष वेधलें जातें. उदाहरणार्थ, सुरावर चाल-लेल्या संगीतांत जर एखादा बदसूर झाला तर आपण यदृच्छय्या ' स्स् ' करून कानांवर हात ठेवतों. ह्या माहितीचा उपयोग करण्याकरितांच कीं काय बन्या ' नरवर कृष्णासमान ' जितकें म्हणून बेसूर म्हणतां येईल तितकें बेसूर म्हणूं लागला. मध्येंच ताणाहि मारी.

आमच्या पाहुण्याला मानसशास्त्राची विशेषशी माहिती नव्हतीसें दिसलें. आमच्या या नियमाला तो अपवाद ठरूं लागला. शेवटीं मी त्याच्या वळ जाऊन उभा राहिलों.

" आज General lecture केव्हां आहे—नोटीस पाहिलीत का हो?" मीं प्रश्न केला.

बन्यानें आपल्या गाण्याचा अंतरा ( उत्तरार्ध ) म्हणण्याचें सोडून दिलें. पाहुण्यानें आमच्याकडे संशयी मुद्रेनें पाहिलें. माझा प्रश्न कदाचित् त्याला कळला नसेल म्हणून मीं पुन्हां तोच प्रश्न विचारला. तरी त्यानें आपली संशयी मुद्रा सोडली नाहीं.

" तुम्ही मला कां विचारतां ? तुमची माझी ओळख आहे ?" म्हणून तुसडेपणानें पुटपुटत तो पुन्हां त्या झाडाकडे पाहूं लागला.

बन्यानें प्रश्नचिन्हासारखा चेहरा करून माझ्याकडे पाहिलें. मी उद्गारवाचक चिन्हाप्रमाणें मुद्रा करून त्याच्याकडे पाहूं लागलों. बन्यानें पुढाकार घेण्याचें ठरविल्यासारखें दिसलें. हळूच त्या पाहुण्याच्या खांद्यावर हात ठेवून तो म्हणाला,

" हें पहा, मिस्टर—तुमची आमची ओळख नसली म्हणजे आपण बोलूंच नये असा कांहीं कुठं कायदा नाहीं. तुम्ही नवीन आहांत—आम्हीहि नवीन आहोंत. मग तुम्ही असे आमच्यावर तुटून कां पडतां ?"

मला वाटतें बन्याचें विधान त्याला पटलें असावें. त्यानें बन्याकडे पाहिलें. सरळ बोलावें कीं टाकून बोलावें ह्याविषयीं त्याच्या डोक्यांत विचार चाललेला दिसला. शेवटीं त्याचा कांहीं तरी निश्चय झाला.

" हें पहा—मीं तुमच्यावर विश्वास ठेवला तर तुम्ही त्या चोरांप्रमाणें मला फसवणार नाहीं ना ?" तो म्हणाला.

" तेंच आम्ही तुम्हांला विचारणार आहोंत. त्या मुलांनीं तुम्हांला काय त्रास दिला तें जाणण्याची आमची इच्छा आहे." मी म्हणालों.

" बरं बरं ! तें मीहि तुम्हांला सांगणार आहें. त्या झाडाखालीं आपण जाऊन बसूं; म्हणजे मग कोणाचा त्रास नाहीं—"

झाडाखालीं बसून गवताच्या काड्या चघळीत त्यानें बोलण्यास सुरुवात केली—

" मी सोलापूरचा रहाणारा आहें. यंदांच मी कॉलेजमध्यें प्रथम पाऊल टाकीत आहें. मी यापूर्वीं पुण्याला एकदां किंवा फार तर दोनदां

आलों असेन. मला पुण्याचा अगदीं मनापासून तिटकारा आहे. i hate it. पण सोलापूरला कॉलेज नसल्यानें नाइलाजास्तव मला इकडे यावं लागलं. माझी बहीण पुण्यांत दिलेली आहे. त्यांच्याकडेच मी रहाणार आहें. माझी कुणाचीसुद्धां ओळख नाहीं. नाहीं म्हणायला घरांतलीं चार माणसं, एक ' मनी ' नांवाचं जनावर, असे पांच जीव मला ओळखतात. मला पुण्याच्या रीतिभाति मुळींच माहीत नाहींत. आणि अशा या चमत्कारिक परिस्थितींत मी भांबावून गेलों असतां पुण्याच्या पोरांनीं माझी टर उडविण्यांत आनंद मानावा ही काय मोठी अभिमानाची गोष्ट आहे ? केवळ तुमच्या प्रान्तांत माझा जन्म नाहीं म्हणून तुम्ही माझ्यावर वाटेल तशी कुरघोडी करणार ? तुम्हांला कांहीं तरी माणुसकी आहे कीं नाहीं ? परगांवच्या विद्यार्थ्यांच्या हातून आधींच माहिती नसल्यामुळं पुष्कळ चुका घडत असतात. त्यांना सांवरून घेणं हें तुमचं कर्तव्य नाहीं काय ? किमानपक्षीं, त्यांना फसवूं तरी नये. येईल--वेळ येईल; केव्हां तरी हे लोक माझ्या कचाट्यांत सांपडतील. दाखवीन, त्यांना दाखविल्याशिवाय मी सोडणार नाहीं--"

इतकी प्रस्तावना पुरे झाली या विचारानें बन्यानें त्यास मध्येंच हटकलें, " पण त्यांनीं केलं तरी काय ? "

" मी आज कॉलेजमध्यें थोडासा लवकरच आलों. अदमास हा कीं, शाळेच्या वेळेप्रमाणं फार तर ११॥ ला तास सुरू होईल. पण General lecture असल्याचं आत्तां मला कळलं. मी सरळ F. Y. ची पाटी असलेल्या दारापाशीं जाऊन उभा राहिलों. आंत जावं कीं न जावं, या विचारांत मी घोटाळलों. चारपांच विद्यार्थी तिथंच उभे होते. मला वाटतं त्यांनीं माझा सोलापुरी झोंक ओळखला असावा. त्यांपैकीं एक पुढं होऊन मला म्हणाला, ' काय हो मिस्टर, F. Y. लाच कां ? ' बोलण्याचं धैर्य नसल्यामुळं मीं मानेनंच होकार दिला. दुसरा पुढें होऊन म्हणाला ' यंदाच का ? ' मी पुन्हां मान हालवली. इतक्यांत तिसरा एकजण पुढं होऊन म्हणतो, ' अरे गोडबोले, बाहेर किती वेळ उभे रहाणार ? अजून बराच अवकाश आहे. एक वाजतां तो जांबुवान ( मला वाटतं प्रिन्सिपालसाहेबांचं

हें लाडकं नांव असावं. ) लेक्चरला येणार आहे. तोंपर्यंत बसूं या वर्गांत. चला हो मिस्टर जरा–' तुम्हीच सांगा—संशय घेणारा मूर्ख ठरेल कीं नाहीं ? पुन्हां नवीन ओळख होण्याचा संभव असल्यामुळं त्या आशेनं मी पुढं झालों. मी आंत गेलों, पण आंत एक मोठंसं टेबल—मध्यें कसलीशी जाळी लावली होती—अन् भोंवतालीं वीसपंचवीस खुर्च्या इत्यादि वस्तु पहातांच मी आश्चर्यचकित झालों. आमच्या नवीन दोस्तांना या गोंधळाचा खुलासा विचारण्याकरतां मी मागं वळून पहाणार, इतक्यांत दरवाजा आपटल्याचा आवाज झाला. मला त्यांनीं त्या खोलींत कोंडून टाकलं होतं—"

लघुकथा म्हणतां म्हणतां जरी हें आख्यान कादंबरीसारखें अवास्तव फुगूं लागलें होतें तरी आम्हाला त्यांत मनोरंजक असा बराचसा भाग वाटला. पुढें आमच्या लक्षांत आलें कीं F. Y. च्या पाटीच्या मागच्या बाजूसच 'Ladies' म्हणून लिहिलेलें होतें. आमच्या पाहुण्यांच्या त्या दोस्तांनीं पाटीची फिरवाफिरव मुद्दामच केली होती.

"—इतक्यांत, बाहेरच्या बाजूस मुलींचा आवाज ऐकूं आला. आमच्या सोलापूरला तुळजापूर वेशीजवळ कोंगाड्यांच्या बाया जशा 'कॅव, कॅव' करून डोकं उठवण्याचा प्रसंग आणतात त्याप्रमाणं तुमच्या या पुण्याच्या मुली आपापसांत बोलत होत्या. मी घाबरून गेलों. काय करावं,सुचेना. एकीनं आल्याबरोबर दरवाजाला लाथ मारली. 'अग सुशे—आली का तुझी धिंडका पुन्हां आमच्या कॉलेजांत ? म्हटलं सुटींत एखाद्याच्या गळीं पडून त्याची गळचेपी—' एकजण असंच कायसंसं बडबडली 'चल, वात्रट कुठली ! त्या कामांत तूंच हुषार आहेस—' वगैरे वगैरे सुखदुःखाचं संभाषण चालू होतं. त्यांचं संभाषण पूर्णपणें ऐकण्याजोगी माझी मनःस्थिति नव्हती. पण एवढं खरं, मुलांच्यापेक्षां मुली संभाषणविनोद—किंवा टारगटपणा म्हणा पाहिजे तर—करण्यांत अणुरेणुहि कमी नाहींत. हा अंदाज मीं तात्काळ बांधला. 'ए कावेरी—म्हटलं, पहिलवान पठ्ठे कावेरीबाई, एवढा दरवाजा उघडतां का ? काय मेल्यांनीं घट्ट बसवला आहे हा दांडा—' म्हणून दरवाजाशीं धडपड करीत एकजण म्हणाली. चारचौघींच्या खटपटीनें दर-

वाजा उघडण्याचा समारंभ तर पार पडला. माझी मात्र विचार करण्यासारखी स्थिति होती. ना ओळख ना देख. पंख असते तर मी उडून गेलों असतों. तुम्हाला खोटं वाटेल, पण ह्या झाडावर बसणाऱ्या कावळ्यांचासुद्धां मला हेवा वाटूं लागला. मुली आंत शिरल्या. अगदीं Leap-frog करीतच आंत शिरल्या. मला पहातांच—रामा शिवा गोविंदा!" म्हणून म्हणत तो आमच्याकडे पाहूं लागला.

बन्यानें अगदीं गंभीर मुद्रा धारण केली. जणूं काय हे प्रसंग नेहमींच त्याच्यावर येत होते. पाहुण्यानें गवताची नवीन काडी चघळीत आपली लघुकथा पुढें चालू केली—

"मी मुलींशीं—त्यांतून शिकलेल्या मुलींशीं यापूर्वीं कधींच बोललों नव्हतों. त्यांच्यापेक्षां मीच जास्त गांगरून गेलों होतों. इसापनीतीमध्यें असलेल्या त्या बेडकांची जशी गाळण उडाली तशी त्या मुलींची अवस्था झाली. लांकडाचा ओंडका धाडकन् पाण्यांत पडल्याबरोबर जसे ते बेडूक भीतीनें इतस्ततः पळून गेले त्याप्रमाणं मला पाहिल्याबरोबर चौघीजणी चार दिशांना पांगल्या. मी मात्र उणं अधिक अवसान जमा करून निर्भयपणानं स्वतःच्या पायाखालच्या फरशीचं कौतुक करूं लागलों. पण माझ्यापेक्षां त्यांनाच लवकर वाचा फुटली. आसपास पांगलेले ढग जसे एकत्र येतात त्याप्रमाणें या एके ठिकाणीं जमल्या. मला वाटतं, आतां काय move घ्यावी ह्याबद्दल त्यांचं War Council भरलं असावं. त्यांच्या एकंदर आविर्भावावरून मीं ताडलं कीं, माझ्या हातून कांहीं तरी सामाजिक स्वरूपाचा गुन्हा झालेला असावा. हा वेळपर्यंत ती खोली मुलींकरतां स्वतंत्रपणें देण्यांत आली होती ही कल्पना मला मुळींच आली नव्हती. मीं त्यांच्याकडे अगदीं हळूंच चोरून पहाण्याचं धाडस केलं. आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, माझ्याकडे पाठ करून उभी असलेली मुलगी माझ्या ओळखीची होती. तिच्या केंसांची ती विशिष्ट तऱ्हेची कमानदार रचना, कानांचं तें इवलंसं वळण, हनुवटीचा तो किंचित् तांबूस वर्णाचा भाग, अन् स्वैरपणं उभं राहाण्याची ऐट—ह्या गोष्टी माझ्या नजरेंतून सुटणं अशक्य होतं. एक वेळ मी स्वतःच्या चेहऱ्यावर विश्वास

ठेवणार नाहीं पण, त्या मुलीची आकृति माझ्या डोळ्यांपुढं अगदीं जशीच्या तशी उभी आहे. माझी तिची ओळख गाडींतली—"

" शक्य आहे—" मी अर्धवट पुटपुटलों.

" ती आणि मी दोघंहि सोलापुराहून एकाच गाडीनं, एकाच डब्यांत, एकाच बांकावर बसून आलों—" तो म्हणाला.

" हेंहि शक्य आहे." मी त्याला धीर देण्याकरितां म्हणून म्हणालों. " त्यांत काय आहे ? असल्या गोष्टी नेहमींच घडतात. रेल्वेरस्ता एकच असल्यामुळं असले चमत्कारिक प्रसंग वारंवार घडतात. अन् त्यांत लाजण्यासारखं काय आहे ? " बन्या गंभीर मुद्रेनें म्हणाला. मीं त्याच्याकडे पाहिलें.

" मीं तिला तावडतोब ओळखलं. '—विचार बाई, तूंच विचार ' एकजण म्हणत होती. ' मी नाहीं बाई, तूंच विचार. तूं आहेस धिटुकली.' दुसरीनें उत्तर केलें. मला आश्चर्यच वाटलें. माझ्याशीं बोलायला लोकांना इतकी पूर्वतयारी करावी लागत असेल असं मला कधींसुद्धां वाटलं नव्हतं. माझ्याशीं बोलायला मनुष्यानं ' धिटुकली ' असावं लागतं कीं काय, हा विचार माझ्या डोक्यांत घोळत होता. ' इश्श ! काय ग तुम्ही तरी—' म्हणून म्हणत माझ्या ओळखीच्या मुलीनं माझ्याकडे तोंड वळवून पाहिलं. त्यासरशीं—' म्हणजे ! ' म्हणून अर्धवट मला उद्देशून म्हणत ती दोन पावलं मागं सरली. माझ्या सूतश्रवणादिक ऋषींनों, तिनं मला ओळखलं. आश्चर्य हें कीं यापूर्वीच तिनं मला कसं ओळखलं नाहीं ! ती म्हणाली, ' मला वाटतं, साठे, तुमची कांहीं तरी गैरसमजूत झाल्यासारखी दिसते. ही Ladies' Room आहे. तुम्हाला आंत येण्याचं कारण काय ?' म्हणून तिनं प्रश्न केला. मीं त्यांना सगळी परिस्थिति खुलासेवार सांगितली. सगळ्याजणी ही नवलकथा ऐकून खो खो हंसूं लागल्या. मला काय बोलावं हें सुचेना. लाजेनं शरमिंदा होऊन मीं खालच्या मानेनं त्या सासुरवासांतून काढतां पाय घेतला !—आणि सभ्य गृहस्थांनो, पुढची हकीकत तुम्हांला माहितीच आहे. आतां या वर्षीं माझं ध्येय म्हणजे या चांडाळचौकडीला पळतां भुई थोडी करून सोडणं. पहिल्या दिवशींच मला त्यांनीं त्रास

दिला हें एकपरीनं ठीकच झालं. सबंध वर्ष मला मोकळं आहे. मनुष्याच्या सहनशीलतेलाहि कांहीं मर्यादा आहेच कीं नाहीं ? त्यांना सोलापूरचं पाणी दाखवीन तेव्हांच राहीन ! लाज नाहीं वाटत—–!”

खवळलेल्या आत्म्यास अडविण्याचें पातक कधींहि करूं नये, म्हणून मी गप्प बसलों. सोलापूरचें पाणी कथावाङ्मय तोंडानें सांगण्यांत किती पुढारलेलें आहे हें मला प्रत्यक्ष उदाहरणानें पटलेलें होतें. परगांवाहून येणाऱ्या मुलांच्या, इतर कितीहि गैरसोयी होत असल्या तरी, मुलींच्या आणि यांच्या गाड्या एकच कशा ठरतात याचा मला राहून राहून अचंबा वाटूं लागला. आणि इतर गैरसोयींच्या मानानें ही ओळखीची सोय काय कमी आहे ? आम्ही पुण्यांत बारा महिने अठराकाळ राहिलों तरी ‘कसं काय, खुशाल आहांत ना !’ म्हणून एक मुलगी आमची खुशाली विचारील तर शपथ !

---

# प्रकरण १५ वें

## बाबांचें आगमन

मामाच्या बोलण्यानें मला त्या वेळेपुरतें शौर्य वाटे, पण पोटांतून मला बाबांचा धसका होता. आठ दिवस बाबा मुंबईहून परत आले नाहींत त्यामुळें मला बरें वाटण्याऐवजीं जास्तीच मनःसंताप होऊं लागला. रात्रीं झोपेंतसुद्धां असेंच कांहीं तरी विलक्षण स्वप्न पडे. कड्यावर जात जात अगदीं टोंकाला गेल्याप्रमाणें वाटे आणि मी खडबडून जागा होई. सर्वांगाला दरदरून घाम फुटे. केव्हां ना केव्हां तरी बाबांच्या कानांवर ही गोष्ट जाणारच. तें एकदां लवकर कानांवर गेली म्हणजे या निष्कारण भीतीपासून तरी मी बचावेन ही कल्पना. रात्रीं सिनेमाहून अगर नाटकाहून येणारा एकटादुकटा चंगीभंगी दाराशीं येऊन जेव्हां धक्के मारूं लागे तेव्हां

मी धसक्यानें जागा होई. दुसऱ्याच्या घरांतली ही पीडा आहे या विचारानें पुन्हां शान्त होऊन मी या अंगावरचा त्या अंगावर होई.

मामांना माझ्या भीतीची नीटशी कल्पना नव्हती, का धीर देण्याच्या हेतूनं कुणास ठाऊक, ते एकदम विनोदांत उडी घेत.

" सद्या, लेको तुम्हीं स्वराज्य मिळवणार म्हणतां, अन् घरांत बापाला भितां ? मला तर वाटतं कीं हल्लींची पिढी आमच्यासारखी पितृभक्त उरलेली नाहीं. पितृभक्ति हा गुण द्वापारयुगांत समजला जात होता. हल्लीं father is your friend ! जशा मित्राला लाथा तशा बापाला लाथा—असं हें लत्तायुग आहे. आमची ही सुली पहा ना ! माझं ऐकेल तर तिच्या कुळाला अगदीं बट्टा लागेल असं हिचं वर्तन—" मामा म्हणाले.

"मीं काय केलं हो, मामा ? उगीच मला बोलत जाऊं नका. मीं कांहीं तुमच्या अध्यांत नाहीं न् मध्यांत नाहीं." सुलोचना अगदीं तुटून पडल्याप्रमाणें वस्‌दिशीं मामांना बोललेली पाहून मला जरा वाईट वाटलें. पण मामांना त्याचें कांहींहि नाहीं.

" चक्षुर्वै सत्यं ! बघ कशी मांजरासारखी फिस्‌फिस् करत येते ती. बारा वर्षांची घोडी झाली, पण वडील माणसांशीं बोलावं कसं हें कांहीं समजत नाहीं. हा सदू बघ, अजून बाप म्हटलं म्हणजे साप समजून उभा रहातो—"

" कांहीं म्हटलंत मामा, तरी बाबांच्या संतापाची कल्पनाच मला करवत नाहीं." मी म्हणालों.

" तुला ही विचार करण्याची एक दुष्ट खोड लागली आहे. अनुभवान्तीं असं आढळून येतं कीं, आपल्या बऱ्याचशा कल्पना वृथा असतात. पुढं येणाऱ्या संकटांचीं भेसूर चित्रं प्रथम दर्शनीं जितकीं भडक दिसतात तितकीं तीं पुढं परिचयानं सौम्य ठरतात. आज वडिलांचा धाक अलम दुनियेंत तुलाच एकट्याला आहे आणि बाकीच्यांना काय मुळींच बंधनं नाहींत ? पोरा, भविष्यकाळांत तूं फारसा शिरत जाऊं नकोस. पुष्कळशा ठिकाणीं आयुष्याचं मातेरं होण्यास एकच कारण आढळून येईल; आणि तें हें कीं ' पुढं कसं होईल ' ही चिंता. ज्याप्रमाणं डोंगर लांबून कितीहि कठिण दिसला तरी त्यावर पाऊलवाटा या असतातच, त्याचप्रमाणं मनुष्य

करारी असला तरी त्याच्या हृदयांत एक कोंपरा असा असतो कीं त्याला हात घातला कीं तो नरम येतो--" मामा म्हणाले.

" मामा, सिगारेटच्या धुरानं विचार सुचतात म्हणून लोक म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. हे विचार मी बाबांच्यापुढं संथपणानं मांडीन--पण मला तुमच्या पेटीची गरज लागेल." मी मामांच्या सिगारेटकडे पाहून म्हणालों.

" नाहीं. हें तत्त्वज्ञान मी लहानपणापासून उराशीं बाळगून आलों आहें. माझ्या नेहमींच्या थट्टेखोरापणामुळें हीहि एक थट्टाच आहे असं लोकांना वाटण्याचा संभव आहे. पण जगामध्यें विनोदी म्हणून झळकणारीं माणसं, वस्तुतः पहायला गेलं तर, अती गहन विषयावर विचार करून बसलेलीं आढळतात. आयुष्याच्या एकंदर स्थित्यंतरांना कंटाळून गेलेले तत्त्वज्ञानी एक आत्महत्या तरी करतात नाहींतर विनोदाच्या बाजूनं काळ कंठीत असतात--" मामा म्हणाले.

" म्हणजे आत्महत्त्या न करतां दुसऱ्याची हत्त्या करण्याच्या मार्गाला लागतात. असंच कीं नाहीं?" मी हसून म्हणालों.

" दुसऱ्याची हत्त्या म्हणण्यापेक्षां गुंगी देऊन शस्त्रक्रिया करण्याचं पुण्यकर्म करतो असं म्हण. सदू, तूं लहान आहेस. अजून तुला आयुष्याच्या वेटोळ्यांतून जायचं आहे. लढाईस उद्युक्त असलेल्या वीराला प्रोत्साहन देण्याचं सोडून त्याला निराशावादाचे दोन घुटके देणं महापाप आहे. तें शल्यानंच करावं." मामा म्हणाले.

आईला कांहींतरी संशय आला होता. माझ्याकडे मध्येंच भेदक दृष्टीनें पहात असतांना मीं तिला कितीदां तरी अचानक पकडलें होतें. पण आपण होऊन कांहींहि चौकशी करायची नाहीं हा तिचा निर्धार होता. मी तिला कांहींच सुगावा लागूं दिला नाहीं. प्रत्यक्ष मुलाचें नातें; सतिसावत्राचासुद्धां संबंध नाहीं. प्रत्यक्ष पोटचा गोळा! आईला संसाराचा इतका वैताग येण्याचें कारण तरी काय असावें? का वैताग येण्यास कांहींतरी कारण लागतेंच असें नाहीं? संसारांतील नित्याच्या कंटाळवाण्या घडामोडी एखाद्या नाजूक मनावर इतका जबर परिणाम

करण्यास समर्थ असतील काय ? प्रत्येक गोष्टीला कारणपरंपरा ही असलीच पाहिजे. विचाराची मति कुंठित झाली कीं ती गोष्ट मानवी प्रकारांतली नसून दैवी प्रकारची होत असते. आई म्हणजे मनुष्यच होती. मनुष्याच्या स्वभावाला कारणपरंपरा ही असणारच. या घटकेची लहर दुसऱ्या घटकेस बदलण्याला कारणहि तसेंच असावें लागतें. कारणाविना, आंगच्या कपड्यांप्रमाणें, मनुष्यस्वभाव बदलत नसतो. आईच्या मानसिक संतापाला कारण काय असावें ? लहानपणीं मी केव्हां केव्हां मुद्दाम आईला चिडवीत असें. तिनें रागावण्यासारखें करण्यांत मला मौज वाटे. पण आतां मी तिच्याकडे अगदीं निराळ्या दृष्टीनें पहात होतों. अजूनसुद्धां कांहीं कांहीं वेळीं तिची अतोनात चीड येई. पण विवेक करण्याचें अस्त्र माझ्याजवळ होतें. आई आपल्या जिवाचा त्रागा करून घेते, स्वतःला बिलकूल सुख लावून घेत नाहीं; हें मीं वारंवार निरखून पाहिलें होतें. या सगळ्या अवगुणाखालीं प्रेमाचा झरा दडपून गेला असावा. माझ्या वांट्याला ह्या पाण्यापैकीं एक टिपूससुद्धां उरलें नव्हतें. आईच्या मायेवरच मुलें जगतात, एरवीं तडफडून मरतात असा कांहीं कुठें निसर्गाचा नियम नाहीं. केवळ जन्माला कारणीभूत होणाऱ्या मातेच्या मृत्यूनंतर पुढें महापदावर चढलेलीं माणसें जगांत पुष्कळच दृष्टीस पडतात. मला आईच्या प्रेमाची गरज होती म्हणून मी तिच्याविषयीं अनुकंपा बाळगूं लागलों असें मुळींच नाहीं. पण आईनें चार बायकांसारखें, मामीसारखें, आनंदानें, खेळीमेळीनें राहून दिवस काढावेत. संसार सोडूं म्हटल्यानें थोडाच सुटणार आहे ? तरी निष्कारण वाढत्या व्यापाबद्दल संताप करून घेण्यांत कांहींच मतलब नाहीं ही माझी मूलभूत कल्पना. पुष्कळशा गोष्टी केवळ जनलौकिकाला जागण्याकरितां म्हणून ती करीत होती—माझ्या कपड्यांच्या बाबतींत तिनें बाबांना कधींहि पैशाची सबब पुढें करूं दिली नाहीं. उलट एखाद्या वाघिणीप्रमाणें ती बाबांच्यावर तुटून पडे. इतक्या सगळ्या गोष्टी ती करी, पण बोलून घालवी. जिव्हा गोड असती किंवा जरा आटोक्यांत असती तर उपकृत झालेल्या लोकांना धन्यता वाटली असती. पण गोड बोलण्याचें नांव नाहीं. एखादें चांगलें कृत्य करतांना-

सुद्धां तिची धुसपूस कायम असे. त्यामुळें ‘ नको ह्या बाईचे उपकार ’ असें तिऱ्हाइताला वाटल्यास नवल तें कसलें !

तो दिवस अगदीं याच नमुन्याचा होता. आमटीला मीठ कमी होतें. मी हलकेच म्हणालों,

“ आई, आमटींत मीठ नाहीं. विसरलीस वाटतं—” म्हणून म्हणत मीं ताटांतलें हातानें लावलें.

“ मला स्वयंपाक करतां येत नाहीं, झालं ! इतके दिवस तूं अगदीं हवेवरच राहिला आहेस, नाहीं ? सदू , तूं माझ्याशीं बोलत जाऊं नकोस म्हणून तुला मी शंभरदां सांगितलं आहे, तरी तुझा स्वभाव जात नाहीं—” आई उसळून म्हणाली.

“ आतां ह्याच्यांत मीं काय केलं ? नुसतं आमटींत मीठ नाहीं म्हणून-सुद्धां सांगायची चोरी ? ” मी म्हणालों.

“ तुला सांगितलं ना एकदां, कीं मला स्वयंपाक करतां येत नाहीं तें ! झालं तर. उगीच कशाला माझं तोंड वाजवतो आहेस ? आपण होऊनच उखाळ्यापाखाळ्या काढायच्या अन् मी बोलतें म्हणून गांवभर डंका. तुमची करणी दिसत नाहीं, पण माझीं बोलणीं मात्र दिसतात. सुखानं अन्न खाईन म्हटलं तर तुम्हांला तें कसं रुचणार ? स्वयंपाकिणीच्यापेक्षां कांहीं मला आतां या घरांत किंमत उरलेली नाहीं. ह्यांच्याकरितां मरमर मरावं अन् ह्यांनीं गांवभर आईच्या नांवानं ओरडावं—नारायणा, नको रे बाबा ! पुरे झाला हा छळवाद ! ” आई म्हणाली.

यास गप्प बसण्याशिवाय दुसरी तोड नव्हती. बराच वेळ विचार करून आईला सांगावेंसें मला वाटूं लागलें.

“ आई, मीं कॉलेजांत नांव घातलं आहे—” पाण्याच्या घोटासरशीं आंवढा गिळून मी म्हणालों.

“ मला माहिती आहे—” म्हणून आईचें उत्तर आलें. हीं अशीं उत्तरें मिळूं लागलीं कीं संभाषण सुरळीत चालणें अशक्य.

“ बाबांना मीं अजून कळवलेलं नाहीं; पण तें त्यांना आज ना उद्यां केव्हां तरी कळणारच. उद्यां कळलं काय नि आज कळलं काय, सारखंच.

आई, बाबा फार रागावतील का ? " मी मध्येंच आईकडे पाहून म्हणालों.

" रागावले तर रागावले. ते कधीं रागावत नसतात ! वारा उलटा आला तरी ते रागावतील. यांचीं रागावणीं अन् रुसणीं काढतां काढतां जन्म गेला माझा. रागावले तर घेतील आपल्या जिवाला त्रास करून. " आई त्रासिक मुद्रेनें म्हणाली. पण हें तत्त्वज्ञान मला पटत नव्हतें म्हणून तर हा खटाटोप. बाबा रागावले तर स्वतःच्या जिवाला त्रास करून घेतील हें कबूल, पण त्याबरोबर माझ्या जिवाचीहि चाळणी करून सोडतील हें कसं विसरून चालेल ? अन् पुन्हां ही गोष्ट म्हणजे पैशाशीं गांठ होती. कॉलेजचा खर्च देण्याचें बाबा कबूल कसें करणार ? मामांच्या जिवावर उड्या मारणें मला बिलकुल पसंत नव्हतें. त्यांना त्यांचा संसार काय कमी होता ? त्यांत आणखी माझी भर कशाला ?

" भाऊचे कांहीं पैसे घेतलेस का ? अन् किती घेतलेस त्याचा हिशोब ठेवला आहेस का ? " आई म्हणाली.

दोन्ही प्रश्नांना मी योग्य तीं उत्तरें दिलीं. आईनें झटकन् हातांतलें वळें काढून माझ्यापुढें ठेवलें.

" त्यांनीं नाहीं दिले पैसे तर तूर्त हें वळें भाऊजवळ ठेवायला दे. "

म्हणून म्हणत आईनें वळ्यावर पाणी सोडलें. हेंच जर आईनें—पण जाऊं दे, मीं आईकडे आश्चर्यानें पाहिलें.

" मामा घेणार नाहीं तें वळें. आई, तुला काय वाटलं, कीं मी असा व्यवहार करीन म्हणून ? आई, मी माझी आंगठी मामांना देत होतों, पण मामा मला अगदीं मारायलाच उठले. मामीसुद्धां फार रागावली. आई, छेः ! तें शक्य नाहीं. मामांचा स्वभाव इतका व्यवहारी नाहीं." मी वळें डाव्या हातानें पुढें ढकलीत म्हणालों.

" सदू, पैशानं लोभ जडतो तसाच लोभ तुटतोहि. मामा तुला जन्मभर पोसणं शक्य नाहीं. जगांतलीं नातीं तुटायला कारण पैसा असतो. तूं माझं ऐक, त्यांनीं नाहीं ऐकलं तर सुलोचनेच्या बोटांत हें वळं अडकव अन् मुकाट्यानं निघून ये." आई म्हणाली. मला हा एक विलक्षण पेंच येऊन पडला. मामा तर एक शब्द ऐकून घेणार नव्हते, अन् आईहि

मागें घेईलसें दिसत नव्हतें. तरी तूर्त तें वळें आपल्याच देहाला शोभा म्हणून पत्करावें, या पोक्त विचारानें मीं या पेंचांतून सुटका करून घेतली. आईचें स्वगत भाषण सुरू झालें—

"कोणी कांहींहि म्हटलं तरी मला लाज नाहीं हेंच खरं. 'नाहीं' म्हणून अगदीं निश्चय करतें तरी पुन्हां निलाजऱ्यासारखी तुम्हां बापलेकांत आडवी येतें. इतकं करूनसुद्धां तुम्ही काय मला चांगलं म्हणणार तें दिसतंच आहे. सगळ्या जगाशीं सरळ वागतोस अन्, आई पाहिली रे पाहिली कीं झालीं तुझीं अढीतेढीचीं बोलणीं सुरू. काय तुझे माझे लागेबांधे आहेत, हरी जाणे! कसाहि वागलास तरी मला काय करायचं आहे म्हणा! माझं जें कर्तव्य आहे तें मी मरेपर्यंत करीत रहाणार. मला तुमच्यापासून कांहींएक घेण्याची आशा नाहीं. आजपर्यंत कधीं आशा केली नाहीं तें आतां करून काय मिळणार?" आई म्हणाली. भगवान् श्रीकृष्णानें मध्यम पांडवाला उद्देशून निष्काम कर्माची सांगितलेली थोरवी आमच्या आईला गुरूवांचून इतकी बिनचूक कळलेली पाहून मला आईच्या बुद्धीचें कौतुक करावेंसें वाटूं लागलें. आम्हां मर्त्यांना एखाद्याला सोड्याची बाटली पाजायची म्हटलें तरी परतफेडीची कबुली करून घ्यायचा मोह आंवरत नाहीं. मला वाटतें, साऱ्या इंग्रजी शिक्षणाची मूलभूत कल्पना सकाम कर्मावरच बांधलेली असावी. फलाची आशा नाहीं तें कसलें कर्म—हा आम्हा अज्ञजनांचा रोकडा सवाल असतो. अज्ञ म्हणतां म्हणतां आमची आई खरोखरीच प्रज्ञ होती. असाच प्रज्ञपणा तिनें वारंवार धारण करून स्वतःच्या मुलाला संकटकालीं सोडविण्याकरतां निष्कामकर्मबुद्धीनें प्रेरित व्हावें हीच माझी देवापाशीं मागणी होती.

स्वगत भाषणाची मर्यादा वाढूं लागण्याची भीति वाटूं लागल्याकारणानें मीं जेवणाची पंजाब मेल सोडली. "ठसका लागेल—" या हुकमी आवाजांत केलेल्या सूचनेकडे मीं पूर्ण दुर्लक्ष केलें.

एवंगुणविशिष्ट तयारी करून मी बाबांच्या आगमनाची मार्गप्रतीक्षा करूं लागलों. बाबा जरी आतां वाघासारखी उडी मारून घरांत शिरले तरी मी बिलकूल कचरणार नव्हतों. आईच्या मायेचा बुरखा, मामा-

मामीच्या मायेचा बुरखा—इत्यादि आप्तजनांच्या बुरख्यांच्या दडपणाआड दडून मी बाबांशीं दोन हात करणार होतों. तरी पण हा प्रकार एका जुन्या गोष्टींतल्याप्रमाणें सोंवळें नेसून ‘ ये—आतां शीव मला कसा शिवतोस तें !’ म्हणून चोराला धमकी देणाऱ्या खुळचट ब्राह्मणासारखाच झाला होता यांत तिळमात्र शंका नाहीं. प्रभातसमयीं पूर्वभागास जमणारीं निर्बल अभ्रें आणि माझीं हीं मायेचीं पांघरुणें यांत फारसें अंतर नव्हतें. सूर्य वर येण्याचा अवकाश कीं अभ्रांचीं पांगापांग होते. बाबा येण्याचा अवकाश कीं हीं पांघरुणें—! मीं तो विचारच सोडून दिला.

त्या दिवशीं संध्याकाळीं मी टेबलावर पायांची जुडी ठेवून विचार करीत खुर्चीवर पहुडलों होतों. माझ्याप्रमाणेंच नेहमीं विचारांत गुंग असलेला आमच्या चंपीचा अणुरेणुभाग मोत्या टेबलावर आंगाचें मुटकुळें करून पडला होता. उंच स्थानीं बसावें अन् कांहींच बोलूं नये, हें तत्त्व त्याला पुरेपूर पटलें असावें. त्याचे विचार बहुतेक डोळ्यांच्या उघडझांपीनें मला कळत असत. तोहि स्वतःच्या शक्तिनुसार जगाच्या गाजावाजाचा विचार करीत होता.

“ मोत्या, काय जग आहे बघ—” म्हणून मी म्हणतांच त्याला जगाची शिसारी येऊन त्यानें डोळे मिटले. या मूक प्राण्याचें हें ज्ञान पाहून मी थक्कच झालों. मला वाटतें, खायला सुखासुखी मिळूं लागलें कीं, फुरसुतीच्या वेळीं तत्त्वज्ञान सुचत असतें. या मोत्याला एक वेळ जास्त भाकरी टाकली नाहीं तर, तो तत्त्वज्ञानाचें मोजमाप करीत या टेबलावर न पडतां दारोदार भटकून शिळ्या अन्नाच्या कणागणिक पोटाची खांच भरण्याच्या मार्गाला लागेल. मी काय करीत होतों ? तेंच. मोत्याचा मार्ग मी आचरीत होतों.

हें कोठवर चालणार ? जितक्या व्यक्ती तितक्या प्रकृती. प्रत्येक जीवाची तऱ्हा निराळी. एकाचा स्वभाव दुसऱ्याशीं जमणें तर शक्यच नाहीं. मग जगामध्यें एकवाक्यता होणार तरी कशी ? सुसंघटित स्वरूप जगाला येणार तरी कसें ? चार दिवस हवा खाण्याकरितां म्हणून एका ठिकाणीं जमणाऱ्या माणसांचे विचार एकसूत्री होणें कधीं तरी शक्य आहे का ? मुलानें बापाची

भीति कां बाळगावी ? अनंत विश्वांत वाहात जाणाऱ्या असंख्य परमाणूं-पैकीं कांहीं विशिष्ट परमाणू निवडले जातात. ते परमाणू जीव म्हणून जन्माला येतात. जन्माला येण्यापूर्वी आज पिता म्हणून अरेरावी गाजविणारा जीव आणि मुकाट्यानें परावलंबी जीवनाचा ताप सहन करणारा पुत्र पूर्वी एकाच प्रवाहांत वाहात होते ना ? एकाच प्रवाहांत वाहाणारे परमाणू एकमेकांविषयीं कांहीं तरी सहानुभूति बाळगीत असलेच पाहिजेत. ती सहानुभूति आज कुठें आहे ? आज ही लपवालपवी, ही जाळीत जाणारी भीति—कां ?

मोत्यानें सहजच माझ्याकडे डोळे उघडून पाहिलें. त्याला माझा प्रश्न कळला असावा. ही परमाणूंची उत्पत्ति त्यालाहि पटली असावी. पण प्रश्नाचें उत्तर त्याच्या आवांक्याबाहेरचें होतें. माझ्याप्रमाणें कदाचित् त्यालाहि या विश्वाचें कोडें नाडवीत असावें. माझ्याप्रमाणेंच तोहि अजून सत्याच्या शोधार्थ धडपडणारा एक जीव असावा. " मिळेल——मिळेल. याहि प्रश्नाचें उत्तर लवकरच आपल्याला मिळेल. कोडीं सोडवण्याकरितांच आपण जन्म घेतलेला आहे. आज नाहीं तर उद्यां——उद्यां नाहीं तर परवां—परवां नाहीं तर आणखी केव्हां तरी ! आपल्या हातून नाहीं तर दुसऱ्या कोणा तरी महाभागाच्या हातून याचा उलगडा होईल. नदीचं मूळ सांपडण्याला कठिण असलं तरी तें प्रयत्न करणाराला सांपडलंच पाहिजे. मात्र चिकाटी पाहिजे——चिकाटी पाहिजे. आशावाद खचूं देतां कामा नये. आज नाहीं उद्यां——उद्यां नाहीं परवां——"

मोत्यानें समाधानाचा श्वास सोडून आपली पसंति व्यक्त केली.

" अंधारांत कां बसलास रे ? दिवा लावायचीसुद्धां शुद्ध नाहीं ना ? कुठं कुठं म्हणून आईनं आतां मरायचं !" म्हणून आईनें मला पुन्हां पृथ्वीवर खेंचतांच मी विचारतंद्रींतून जागा झालों. आई गेल्यावर टेबल-स्टँड लावून पुन्हां पूर्ववत् पडलों. आईचा आवाज ऐकतांच मोत्यानें जणूं काय 'तुमचें तत्त्वज्ञान कांहीं कां सांगेना, पण मोठ्या माणसांना मान दिला नाहीं तर लांकूड पाठींत बसतं' या विचारानें खालीं उडी टाकली होती. मीं पुन्हां त्याला स्थानापन्न केलें.

इतक्यांत खालच्या बाजूस रामभाऊंचा आवाज ऐकूं आला—ते कुणाशीं तरी बोलत होते.

" काय भाऊसाहेब ? केव्हां आलांत मुंबईहून ? कांहीं नवीन गपसप ? इलाख्याची राजधानी म्हणजे कांहीं तरी रोज नवीन सुधारणा दिसायच्याच. पुन्हां राष्ट्र प्रगमनशील असल्यामुळं—" रामभाऊ म्हणत होते.

" मी आजारी आहें. मला या वेळीं त्रास देऊं नका—" बाबांचा आवाज मीं तात्काळ ओळखला.

" आजारी ? का हो, आजारी पडायला काय झालं ?" रामभाऊ पुन्हां म्हणाले.

" बोडकं तुमचं. तुम्हांला बोलूं नका म्हणून सांगितलं ना एकदां ?" बाबा खस्कन् रामभाऊंच्या अंगावर ओरडले.

तोंडानें 'चुक् चुक्' करीत तो उदारधी आत्मा, सुधारणाप्रेमी जीव बाबांना सोडून निघून गेला.

बाबा त्याच कपड्यांनिशीं माडीवर चढून आले. जिना चढल्यामुळें त्यांना बराच दम लागला होता. माझ्याकडे त्यांनीं 'खाऊं कीं गिळूं' अशा मुद्रेनें पाहिलें. बाबांना समजल्याचें मीं तात्काळ ताडलें.

" तुझ्या मामाचं मला मुंबईला पत्र आलं होतं. तूं माझ्या म्हणण्याला न जुमानतां कॉलेजांत जाऊं लागल्याचं मला समजलेलं आहे. तुला या घरांत रहायचं आहे कीं नाहीं, बोल ? नाहीं तर तूं आपली निराळी सोय पहा." बाबा दम छाटीत भिंतीच्या आधारानें उभे होते. मी कांहींच बोललों नाहीं.

" माझ्या अपरोक्ष व्यवहार करायला तूं काय स्वतःला शहाणा समजतोस कीं काय ? दीड वितीचं नाहीं झालं कारटं तर लागलं उड्या मारायला ! तुझ्या बापजाद्यांनीं काय पैशांचा हांडा ठेवला आहे जतन करून ? वार लावून दिवस काढले मीं. आज या रंगारूपाला मीं तुम्हांला आणलं. सुखानं घरबसल्या पोटभर अन्न मिळण्याकरितां मी मेलों, त्याचे उपकार तुम्ही असे फेडतां ! मीं सांगितलेलं तुम्हांला कडू लागतं काय ? कुणीं सांगितलं होतं तुला या नसत्या उठाठेवी करायला ? पै पै जतन करून

मीं तहान नाहीं पाहिली, भूक नाहीं पाहिली—अन् तुम्ही—-" बाबा मध्येंच थांबले. बाबांनीं बोलतां बोलतां 'मर शिंच्या' म्हणून तोंडानें अभद्र शब्दांची लाखोली वाहात हातांतल्या काठीनें वार केला. काठीचा पहिला फटका माझ्या दंडावर बसला. दुसऱ्या फटक्यापासून मीं आपलें संरक्षण केलें. पण टेबलावरचा स्टँड कोलमडला. चिमणीचा खळ्कन् आवाज झाला. दिवा खालीं पडून विझला. माझ्या पोटांत धस्स् झालें. बाबांच्या बडबडीकडे लक्ष न देतां मीं दंड चोळीत दुसरा दिवा आणायला खालीं गेलों. आई जिन्यांतच भेटली. मी दिवा घेऊन वर आलों, तों काय—! हातांतली काठी समोर ठेवून बाबा गुडघ्यांत मान घालून जमिनीवर बसले होते. दिवा आईच्या हातांत देऊन मी पुढें झालों. पुन्हां बाबांनीं तोंड सोडलें. बाबांचें अंग तापल्या तव्याप्रमाणें कढत झालें होतें. मीं छडीचे तुकडे करून फेंकून दिले. बाबांना सपाटून ताप चढला होता.

आईच्या मदतीनें बाबांच्या अंगांतला कोट मीं काढला. अंथरूण पसरून त्यावर बाबांना निजवलें.

"आई गऽ" म्हणून मोठ्यानें कळवळून बाबांनीं रडण्यास सुरुवात केली.

---

# प्रकरण १६ वें

## दामदुप्पट !

कांटेरी चक्रांचें दडपड नाहींसें झालें कीं ज्याप्रमाणें घड्याळाची स्प्रिंग उसळून बाहेर येते, तद्वतच बाबांच्या धाकामुळें अडवून ठेवलेलें माझें मन स्वैर विहार करण्याच्या मोहांत गुंतलेंसें दिसूं लागलें. बाबांचा त्या दिवशींचा प्रत्यक्ष जमदग्नीचा अवतार पहातांच, आतां आपलें या जगांतलें कार्य

संपलें, असाच माझा ग्रह झाला होता. एक बाबांच्या म्हणण्याप्रमाणें शिक्षण सोडून देऊन दुकानीं चार पैशांचे ताव, दोन आण्यांचे बोरू हा हिशोब करीत बसणें, किंवा दुसरी कांहीं तरी सोय पाहून शिक्षणाचें कार्य पुढें चालवणें यांशिवाय तिसरा मार्ग नव्हता. आणि होते ते दोन्हीहि मार्ग सारखेच कठीण होते. वेळ आली होती पण काळ आला नव्हता, हेंच खरें. माझें शिक्षण पुढें चालू झालें. मात्र बाबांनीं त्या दिवशीं रात्रीं आईला हांक मारली. ती हांक ते तासाच्या अंतरानें रोज मारूं लागले. बाबांचें दुखणें हटण्याचें चिन्ह दिसेना. मधून मधून उतार पडल्यासारखें वाटे, पण पुन्हां पूर्वींइतकाच जोराचा ताप येई.

दुकानची व्यवस्था पहाण्याचें माझ्याकडे येईलसें मला वाटलें होतें-- पण आठ दिवस होऊन गेले तरी बाबा दुकानची गोष्ट काढिनात. तेव्हां आपण होऊनच मदत करण्याची बुद्धि प्रकट करावी, या हेतूनें मीं त्यांच्याजवळ बोलणें काढलें.

बाबांना दहापांच हांका मारल्या तेव्हां कुठें त्यांनीं माझ्याकडे वळून पाहिलें. आजारानें फिक्कट पडलेला चेहरा कपाळावरच्या आंठ्यांनीं जास्तच भेसूर दिसत होता. मीं धीर धरून दुकानाविषयीं प्रश्न विचारला. प्रथम त्यांनीं न ऐकल्यासारखेंच दर्शविलें. जणूं काय, लांब बाहेर झाडावर असेल चिमणी ओरडत.

" बाबा, दुकानावर सकाळीं अन् संध्याकाळीं मी बसूं काय ? " मीं शक्य तितक्या नम्रभावानें प्रश्न केला. बाबांनीं उठण्यासाठीं धडपड केली. अशक्तपणापुढें त्यांचें कांहींच चाललें नाहीं. पुन्हां उशीवर मान टाकीत ते उसळून म्हणाले, " तूं ? अन् दुकानावर बसणार ? कुणाचं दुकान ? कशाचं दुकान ? "

मीं त्यांना नीट समजावून सांगितलें कीं, ' होय ! मीच दुकानावर बसणार. दुकान तुमचं. दुकान स्टेशनरी सामानाचं. बाबांनीं हा खुलासा नीट कान देऊन ऐकला. विचारांची सांखळी जमवून सांखळदंडानें मला छिन्नभिन्न करून टाकण्याचा त्यांचा प्रयत्न होता. पुन्हां एकवार अवसानांत येऊन ते ओरडले--

" दुकान ? तुला दुकान पाहिजे अं ? दुकान घालून बसायला बायको असतास तर शोभलं असतं. दुकानावर बसतोस ? लाखाचे बारा हजार करून बापाच्या हातांत नरोटी देण्याचा विचार आहे वाटतं ? लंगोटी लावून बापाला देशोधडीला लावण्याचा विचार आहे काय ? तूं काय समजला आहेस ? मी तुला चांगला ओळखतों. प्रत्यक्ष शनीदेव माझ्या पोटीं आला आहे. मला काय समजत नाहीं ? अजून मी जिवंत आहें. मी मेलों नाहीं तोंपर्यंत तुला सवता सुभा करूं देणार नाहीं. तूं दुकानावर जा तर खरा ? गल्ल्याला हात तर लाव, चेचून टाकीन ते हात. मी कुणालाच ओळखत नाहीं. बरा झालों म्हणजे तुझे नाचरंग बाहेर काढतों. पीळ सुटला नाहीं तर सुंभ जाळीन,पण कांट्याचा मागमूससुद्धां ठेवणार नाहीं."

बाबांनीं पुन्हां उशीचा आधार घेतला. मीं सहजच मागें वळून पाहिलें. आंतल्या दाराशीं आई उभी होती आणि बाहेरच्या दाराशीं बन्या उभा होता. बाबांनीं उडवलेल्या स्फोटामुळें माझें मस्तक सुन्न झालें होतें.

बन्या पुढें झाला. बन्यानें बाबांच्या अंगावरचें पांघरूण सांवरल्यासारखें केलें. बाबांनीं त्याला अडथळा आणला नाहीं.

" बन्या, तूं बापाला असा छळूं नकोस. उघड्या डोळ्यांनीं प्राण जात नाहीं. निदान बापाच्या देखत तरी असली विधूळवाट चालवूं नका. माझ्या अंगांत पूर्वीसारखा जोर असता तर ह्या सद्याची वर मान करण्याची हिम्मत नव्हती. त्याचीं मगरुरीचीं उत्तरं देणारी जीभ मीं मुळांतच हिसडून टाकली असती. अजून काय झालं आहे ? मी बरा होऊं दे; हा सद्या निम्मा करून सोडीन तरच नांवाचा. पैशापोटीं प्रेम. पैसा दिसला कीं पिता नकोसा होतो——मला तरी काय गरज आहे ? सद्या, तूं माझ्या दृष्टीसमोरून चालता हो. पुन्हां माझ्याशीं बोलूं नकोस——" बाबा खोल आवाजानें म्हणाले. मी आईचा हात धरून मुकाट्यानें खालीं गेलों.

बाबांच्या संतापाला न जुमानतां मीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं दुकानावर जाण्याचें ठरविलें. दुकानची मालकी प्रत्यक्ष हातांत आली नव्हती तरी कल्पनाचित्र मोठें रम्य होतें. कोटाच्या खिशांत किल्ल्यांचा जुडगा खुळुखुळु वाजवीत मी यापुढें दुकानचा मालक म्हणून बुधवारांतून इकडे

तिकडे हिंडणार. रस्ता झाडणारांची सलामी——त्यांची किंमत ती काय ? पण मोठेपणापाठीमागें भरधांव सुटलेलें खुळें मन त्यांच्यांतसुद्धां आनंद मानूं लागतें. लहानपणीं मी बाबांच्याबरोबर बरेच वेळां दुकानांत गेलों होतों. 'कोणी आलं म्हणजे नीट बसावं' ही त्या वेळची त्यांची शिकवणूक मी आज पार धुडकावून लावणार होतों. मी नीट बसेन, नाहीं तर वेळीं खालीं डोकें वर पाय असासुद्धां बसेन. कोण मला बोलणार ? वाटलें, गिऱ्हाईक येईल; न पटलं तर जाईल. येथें कुणाला त्याची परवा आहे ? मला वाटलें तर मी त्या ठिकाणीं गाणेंसुद्धां म्हणेन. काय हरकत आहे ? गाणें म्हणणें म्हणजें कांहीं पाप नाहीं ! बाबांनीं लहानग्या सदूला जें जें करण्यास मनाई केली होती तें तें मोठा सदू मनमुराद करणार होता. रोजच्या विक्रीचें पुस्तक मी अवश्य चाळून पहाणार होतों. सांदींत, कोंपऱ्यांत मुद्दाम तासभर जाऊन बसणार होतों. दुकानांत लंगडीचा खेळ खेळणार होतों. जमला बाहेर तमाशा तर जमेना का ! बाबा बरे होईतोंपर्यंत इतक्या दिवसांचें थकलेलें व्याज दामदुपटीनें वसूल करण्याचा माझा निश्चय होता.

सकाळच्या प्रहरीं एखाद्या धंदेवाईक दुकानदाराप्रमाणें टाळूवर टोपी डकवून मी खिशांत हात घालून तोंडानें नसत्या बेरजांचा हिशोब करीत दुकानची वाट चालत होतों. पुण्यांत निसर्ग आहे कुठें हांका मारायला ! तर त्या निसर्गाची रम्यता तरी काय कपाळ दिसणार ? सगळ्या जगावर उन्हें पडून तास झाला म्हणजे मग सूर्याला आठवण होते कीं, अरे हो ! हें पुणें अजून तसेंच अंधारांत राहिलेंय कीं ! मग आमच्याकडे तो कादंबऱ्यांतून वर्णन केला गेलेला भगवान् आदित्यराज आपल्या करपाशानें—— वगैरे वगैरे ! इतर धंदेवाईक लोकांना त्याची कांहीं एवढी मोठीशी गरज नसतेच म्हणा. मी एक आपला कॉलेजांतला बच्चा होतों म्हणून मला त्याचें एवढें कौतुक.

माझी कल्पना होती कीं मला घरापासून दुकानीं जाईपर्यंत कमींत कमी दोनिशें वेळां नमस्काराकरितां हात वर करावा लागेल. पण शहरांतलीं कुत्रींसुद्धां माझ्याकडे पाहीनात, किंवा मला ओळखहि देईनात; तेव्हां मी

थोडासा निराश झालों. 'अजून जगाला माझी ओळख पटली नाहीं अं !' याचें सखेद आश्चर्य मानीत मी चालूं लागलों. राष्ट्राला वणवा लागलेला असतांना पुणेकरांना झोंपा तरी कशा येतात हेंच मला कळेना. एवढा मोठा दुकानदार सदाशिवराव देव घरावरून जात असतां फुकाचा नमस्कार करायलासुद्धां बाहेर येण्याची यांना शुद्ध राहूं नये अं ! मोठ्या विभूतीं-विषयीं हा ह्यांचा आदर ! ही मानसन्मानाची कल्पना ! कुठें—कुठें ह्याचे झाडे देतील हे लोक !

कदाचित् थोडासा माझाहि दोष असूं शकेल. दुकानावर येण्याच्या वेळा मी लोकांना कुठें कळवल्या होत्या. फाटका कलेक्टरसाहेब जरी रस्त्यानें चालला तरी त्याचा कार्यक्रम आंखलेला असतो. मग ही चूक माझ्या लक्षांत कशी आली नाहीं ? क्षुल्लक चुकीचे हे असे घोर परिणाम होतात. शेवटीं, थोर थोर विभूती इतस्ततः वावरत असतांना लोकांना त्याची कल्पनाहि येऊं नये आणि ह्या अशा काळझोंपा लागाव्यात—हें बरें नाहीं, असा विषादपूर्ण उपदेश मीं त्या निद्रिस्त आत्म्यांना केला.

दुकानच्या फळीवर मला सुमारें अर्धा तास बसावें लागलें. तेवढ्यांत मीं समोरच्या हॉटेलांतल्या जीवांचें मानसशास्त्रदृष्ट्या निरीक्षण केलें. अजून निम्माअधिक गांव झोंपेंतच पहुडलेला असतांना या लोकांना चहा अन् भजीं पुढें घ्यावींशीं तरी कशीं वाटतात हें एक कोडेंच होतें. तें उलगडण्याचें चिन्ह दिसेना म्हणून मीं त्या खटपटींत पडण्याचा नाद सोडून दिला. खेडेगांवांतून आईबापाला चकवून आलेलीं पोरें हॉटेलांत कप-बशांशीं आपला संसार मांडतात. संसाराच्या कंटाळामय आयुष्याला थोडीशी गोडी आणण्याकरितां म्हणूनच कीं काय मध्येंच 'एक इसम—दोन आणे' म्हणून बेताल संगीताचा आश्रय करतात. यंव रे संगीत ! यंव रे आयुष्य !

आमच्या दुकानचा संगीतसूर्य बरोबर आठाच्या ठोक्याला, डोळ्यां-भोंवतालीं गर्दी करून सोडणाऱ्या पिंजलेल्या कापसालाहि लाजवणाऱ्या पांढऱ्या अभ्रांना आपल्या हस्तस्पर्शानें बाजूस ढकलीत आला. बाबांनीं हें रत्न कोणत्या खाणींतून पैदा केलें असावें हें कांहीं मला निश्चितपणें सांगतां

येणार नाहीं. पण एकंदरीनें पहातां मालकाच्या कोंदणांत हें रत्न फारच उठावदार रीतीनें शोभत होतें. उभ्या आयुष्यांत बाबा जर कुणाशीं गोड शब्द बोलले असतील तर आमच्या राहूशीं. राहूचें वय काय होतें याचा अंदाज करणें म्हणजे गेंडेबाज, भरगच्च वडाच्या किंवा पिंपळाच्या झाडाला वय विचारण्याजोगें होतें. माझ्या जन्माचे वेळीं त्याला मिसुरडें फुटलें होतें असें त्यानें मला सांगितल्याचें आठवतें. म्हणजे चाळशी लावायला योग्य काळ समजण्यांत येणारें त्याचें वय असावें. दुकानांत लागण्याचे पूर्वी त्यानें इतर धंदे पुष्कळच केले होते. जी. आय्. पी. रेल्वे त्याच्या कामाच्या जोरावर बरीच माजली होती. त्याच्या आधारावर पुण्याच्या म्युनिसिपालिटीचे तत्कालिन इंजिनीअरसाहेब बऱ्याच उड्या मारीत असत. शिक्षणखात्यांत त्यानें बरीच सुधारणा घडवून आणण्यास पुण्याच्या एका कॉलेजच्या प्रिन्सिपॉलसाहेबांना मदत केली होती. शेवटीं त्यानें लोकांना चहा आणि भजीं ( ताजा आणि ताजीं ) पुरविण्याकरितां स्थापन झालेल्या एका मंडळाला मदत केली होती—पण त्याच्याच शब्दांत सांगायचें म्हणजे, " जग बेइमान आहे. इतक्या लोकांना मीं हातभार लावला, पण गरज संपल्याबरोबर कांहीं तरी निमित्त करून त्यांनीं मला उघड्यावर सोडलें. सदुभाऊ, लोक बेइमान आहेत. त्यांना इज्जत म्हणजे काय हें मुळींच समजत नाहीं. " इत्यादि प्रकार घडून आला. जगाच्या पाठीवर एका पोटासाठीं मोकाट फिरणाऱ्या पिसाटाला बाबांनीं ठेवून घेतलें. बाबांनीं त्याला वेळोवेळीं सांगावें कीं, "राहू, तूं मला शिकवूं नकोस. तुला जर काम होत नसेल तर हा पगार घे आणि ही कायमची रजा घे." कुठेंहि गेलें तरी पळसाला पानें तीनच रहाणार. नोकर चोर ठरणार अन् मालक मोर म्हणून मिरवणार, हें तत्त्वज्ञान त्या अनुभवी पुरुषाच्या मनांत ठसलेलें असल्यामुळें त्यानें नवीन प्रदेशांत पाऊल टाकून नशिबाची परीक्षा पहाण्याचें टाळलें. आणि तेव्हांपासून राहू एक आज्ञाधारक नोकर म्हणून ओळखला जाऊं लागला.

राहूला घरचा गोतवळा अगदीं थोडा होता. लहानपणीं लग्न झाल्याचें त्याला अंधुक अंधुक आठवत असे. पण ती बायको ( चार वर्षांच्या

आंतली पोर ) बोलायला शिकण्यापूर्वींच या जगाला कंटाळून पुन्हां नवीन जन्म घ्यायला निघून गेली. राहूनें पुन्हां लग्नाचा विचार डोक्यांत आणला नाहीं. ' बरें झालें देवा, तुटे मायापाश ' म्हणून राहू विलापिका काव्यें म्हणूं लागला. त्याची आतां एकच आशा उरली होती. ती ही कीं, बाबांच्या सारखा मालक जन्मोजन्मीं मिळावा ! अर्थात् ही आस पुरी व्हायला आधीं ह्या जन्मांतून उठल्याशिवाय कांहीं भागण्यासारखें नव्हतें. जुना नोकर म्हणून बाबा त्याच्याजवळ एक किल्ली देऊन ठेवीत असत. पण हंड्याची किल्ली मात्र बाबांच्या जानव्याशिवाय इतर कुणाहि परपुरुषाशीं कधींच वसट करीत नसे. हा किल्लीचा वांधा होता म्हणूनच दुकानाच्या फळीवर मला बसावें लागलें.

मला पहातांच राहूनें आपली दंतपंक्ति प्रकट केली. मिशाच्या कोलाहलांतून चहाचे दंवबिंदू स्पष्टपणें दृग्गोचर होत होते. " इतका उशीर कां रे केलास ? " मी अधिकारी स्वरानें म्हणालों. मालक मी आतां !

" उशीर ! कुठं उशीर ? रोजचीच वेळ आहे ही. " राहू फळ्या काढीत म्हणाला.

" रोज ह्या वेळेला येतोस ? तुला काय कंटाळा आला आहे कीं काय नोकरीचा ? बाबांना येण्याचं शक्य नसल्यामुळं तूं मन मानेल तसं वागूं लागलेला दिसतोस ! " मी पूर्वींच्याच दिमाखानें म्हणालों.

" हें पहा सदुभाऊ, भाऊसाहेबांनीं इकडे येण्याचं टाळल्यापासून सकाळचं गिऱ्हाइकच नसतं. तेव्हां मी लवकर पहांटे येऊन तरी काय करणार? अन् सदुभाऊ, भाऊसाहेबांचं बरं आहे का आतां ? केव्हां येतील ? " राहूनें मलाच प्रश्न विचारायला सुरुवात केलेली पहातांच मी गप्प बसलों. " सदूभाऊ, भाऊसाहेब एकदां बरं वाटून आपल्या पायांनीं दुकानापर्यंत आले म्हणजे मला गोड वाटेल. असा मालक दुनियेंत भेटणार नाहीं. एकदां राहूवर विश्वास कीं मग विश्वास. कुठंहि बाहेर गांवीं जावोत, दुकान माझ्या ताब्यांत. जिवाला जीव देणारा उमदा गडी. स्वभाव मात्र थोडा——थोडा तापट. भाऊसाहेब गरम झाले, कीं आपण नरम पडलं पाहिजे. ते ओरडूं लागले, कीं आपण कानांत कापसाचे बोळे घालून बसलं

पाहिजे. कांच एकदां तापली कीं मग---पण सदुभाऊ, तुम्ही काय तिथं करतां ? " राहू माझ्याकडे पाहून म्हणाला. मी खुर्चीवर चढून वह्यांचें पुडकें खालीं काढीत होतों.

" सदुभाऊ, तुम्हांला राग येईल, पण तुम्हांला दुकानांत कशालाहि हात लावूं द्यायचा नाहीं असा मला हुकूम आहे." राहू माझ्या हातांतल्या वह्या पूर्ववत् ठेवीत म्हणाला. मला खरेंच वाटेना.

" असं कसं होईल राहू ? तूं मला असा निष्कारण त्रास देऊं लागलास तर तुझं माझं कसं जमणार ? तुला माझ्याबरोबर दुकानदार म्हणून मिरवायचं नाहीं ? " मी म्हणालों.

" ते सगळं खरं आहे, सदुभाऊ; मलासुद्धां नवीन, तरण्याबांड मालकाचा म्हातारा नोकर म्हणून मिरवण्याची पुष्कळ हौस आहे. पण सदुभाऊ, ती गोष्ट माझ्या हातांतली नाहीं. मला काल ताकीद मिळाली—"
राहू तोंड लपवीत म्हणाला.

मला चीड आली. मालक म्हणून मुजरा घेण्याचे मनोरथ मातीमोल झाले. काल रात्रीं बांधलेले कुतुबमिनार कागदाचे होते. वाऱ्याच्या झुळुकीसरशीं ते इतस्ततः पांगले. मी खुर्चीवरून ताड्दिशीं खालीं उतरलों.

" राहू, तुझ्या माझ्या इतक्या दिवसांच्या सहवासाला स्मरून खरं सांग—ही ताकीद तुला कुणी दिली ? बाबा स्वतः इथं येणं शक्य नाहीं. तूं घरीं आला नव्हतास. मामा आले होते दुकानीं ? " मी रागानें म्हणालों.

" सदुभाऊ, माझ्या गरिबावर रागावूं नका. मला तुम्ही सारखे अन् तेहि सारखे. ज्या घरचं अन्न खायचं त्या घरांत इकडचं तिकडे सांगून भांडणं लावण्याची माझी इच्छा नाहीं. इतका वेळ तुम्हांला दुकानांत बसूं दिलं हेंच जास्ती झालं. तुम्हांला दुकानची पायरी चढूं द्यायची नाहीं अशी सक्त ताकीद आहे--" राहू खिन्न मुद्रेनें म्हणाला.

" दुकानची पायरी चढूं द्यायची नाहीं ? मी काय चोर आहें कीं काय ? का मला अर्ध्या भाकरीवर विकत घेतला आहे ? राहू, प्राण गेला तरी इथं बसून राहीन. दुकान माझं आहे. तुला राहायचं असलं तर

रहा, नाहीं तर चालता हो––या दुकानाचा मी मालक. मी सांगेन तसं तुला राहिलं––"

मीं मागें वळून पाहिलें. हातांत बाबांच्या जानव्याची किल्ली घेऊन बन्या दुकानांत आला होता. आत्तां मला उलगडा पडला. बाबांचा हा प्रतिनिधी. बाबांना सेफची किल्ली द्यायला जगांतल्या यच्चयावत् मनुष्यप्राण्यामध्यें हाच काय तो विश्वासाचा भेटला. ना नात्याचा, ना गोत्याचा, ना रक्ताचा, ना भावाचा––परकी मनुष्यावर त्यांना विश्वास ठेवावेंसें वाटूं लागलें. मरतेसमयीं इतिहासप्रसिद्ध औरंगजेब बादशाहालासुद्धां आपल्या मुलांवर विश्वास ठेवणें धोक्याचें वाटलें. आपणच चिथवून सोडलेलीं भुतें आतां मानगुटीं बसतील ह्या भीतीनें कोण ही धडपड ?

"बन्या, किल्ली माझ्याजवळ दे––" मी अधिकारवाणीनें म्हणालों.

"तुझ्या बाबांजवळ माग. मी ती देऊं शकणार नाहीं." बन्या कपटानें हंसून म्हणाला.

"पण प्रत्यक्ष पोटचा पोरगा या नात्यानं माझा अधिकार जास्ती आहे ना ?" मीं म्हटलें.

"सूक्ष्म धर्म जाणणाऱ्या तुझ्या वडलांना तूं हा प्रश्न विचार. प्रत्यक्ष पोटच्या पोराचें काय काय अधिकार असतात हें मला आजपर्यंत माहीत नव्हतें, पण या उदाहरणावरून त्याची थोडीशी कल्पना आली." बन्या म्हणाला.

"बन्या, you are insulting me" मी संतापानें म्हणालों.

"Not at all ! तुझी तशी कल्पना होत असेल तर माझा नाइलाज आहे. वाट सोड. मला गल्ल्यांतले पैसे गोळा करून घरीं न्यायचे आहेत. तुझ्या बाबांनीं मला तसं सांगितलं आहे." बन्या म्हणाला.

बन्याला अडथळा करण्यांत कांहींच अर्थ नसल्यामुळें मीं चरफटत त्याला वाट करून दिली. संतापातिरेकानें काय करावें हेंच सुचेना. बन्यानें माझ्या काळजाला हात घातला होता. दुकानांत येण्यापूर्वीच्या अहंकार-भावनेचे तीनतेरा उडाले होते; आणि राहूच्या देखत माझ्या भावना दुख-

विल्या गेल्या होत्या. त्यापेक्षां एकीकडे नेऊन मला बन्यानें चरकांत पिळून काढण्याची जरी इच्छा दर्शविली असती तरी मीं फारसा विषाद मानला नसता. तसें पहायला गेलें तर त्यांत बन्यानें विशेष असें काय केलें होतें! चारदोन शब्दांच्या देवघेवीपलीकडे कांहींच झालें नव्हतें. जरी घरीं आपण कितीहि भुक्कड भाऊमहाराज असलों तरी दारीं गजान्त लक्ष्मी पायाशीं लोळणाऱ्या लक्ष्मीपुत्राशीं टक्कर खेळणारे आहोंत हें भासविण्याचा मोह मानवी मनास अनुसरूनच आहे. माझी घरांत काय किंमत होती तें दुसऱ्यानें सांगणें मला अपमानाचें वाटलें. आणि तेंसुद्धां राहूच्या देखत सांगितलें जावें हें विशेष होतें.

बन्यानें पेटींतले पैसे जमा केले. राहू त्याच्या प्रत्येक कृतीकडे लक्षपूर्वक पहात होता. बन्या परत जाण्यासाठीं उठला; तेव्हां राहूनें पुढें होऊन त्यास हटकलें,

" साहेब, मला आंकडा लिहून दिल्याशिवाय मी जाऊं देणार नाहीं. भाऊसाहेबांच्या माघारवाणी पैशाची अफरातफर झाली तर मला गरिबाला तोफखाना पहावा लागेल. माझ्यादेखत पैसे मोजा; अन् आंकडा द्या."

राहूच्या या कायदेबाज वर्तणुकीचें मला त्या वेळेस मनापासून कौतुक वाटलें. बन्या त्याच्याकडे पाहून हंसला.

"राहू, मला कसला कायदा दाखवतोस? तूं मला ओळखतोस, मी तुला ओळखतों. भाऊसाहेबांनीं माझ्यावर विश्वास टाकला, तुला तसा विश्वास टाकायला काय हरकत आहे? पैसे घेऊन मी परगांवाला फरारी होईन अशी तुझी समजूत आहे कीं काय?" बन्यानें आंकडा देण्याची टाळाटाळ सुरू केली हें माझ्या ध्यानांत आलें.

" माझी समजूत गेली नागझरीवर. जें आपलं व्यवहाराला धरून दिसतं तें केलंच पाहिजे." राहू म्हणाला.

" समज आंकडा नाहीं दिला, तर?" बन्या डोळे उडवून म्हणाला.

" तुला आंकडा दिलाच पाहिजे. राहूचं मागणं रास्त आहे—" मी मध्येंच ओरडून म्हणालों.

" Excuse me. मला वाटतं तुम्ही मध्यें बोलण्याचं कारण नाहीं. तुम्हांला या बोलण्यांत शिरण्याचं तादृश कारण मला मुळींच दिसत नाहीं. उलट तुमच्या वडिलांच्या शब्दाच्या जोरावर मी तुम्हांला या दुकानाबाहेर घालवूं शकेन. तुम्ही इथं उभे आहांत तें केवळ माझी कृपा म्हणून. तुम्ही आपला उद्योग सांभाळा." बन्या म्हणाला.

मला उद्योग संभाळण्याची सूचना देणाराला जन्मभर उद्योग सांभाळण्याची आठवण रहाण्यासारखी हातानें सूचना करण्याचें माझ्या मनांत होतें. पण तो विचार मीं तसाच दडपून टाकला.

" साहेब, सदुभाऊंना मीं दुकानांत आणलं आहे. त्यांना बाहेर जायला सांगण्याचं तुम्हांला मुळींच कारण नाहीं. आज जवळ जवळ वीस वर्षं या दुकानांत माझीं गेलेलीं आहेत. प्रत्यक्ष भाऊसाहेबांनासुद्धां एखादी गोष्ट सांगण्याचा मला अधिकार आहे. मीं बोलावलं म्हणून सदुभाऊ दुकानांत आले आहेत. त्यांच्या वाटेस जाऊं नका. तुम्ही तेवढा आंकडा माझ्याजवळ द्या अन् आपला रस्ता सुधारा—" राहू नोकरपेशा विसरून म्हणाला.

दुसरें गत्यंतरच नसल्यानें बन्यानें चरफडत आंकडा तयार केला. मी मुकाट्यानें उभा होतों. राहूनें आंकड्याचा कागद माझ्या हातांत दिला—"

" त्याच्याजवळ कां ? " बन्यानें पिशवीचें तोंड बांधीत प्रश्न केला.

" माझी खुशी. मी त्यांना सांगणार आहें कीं घरीं गेल्यावर हा आंकडा रकमेशीं ताडून पहा." राहू शान्तपणानें म्हणाला.

जास्त वेळ राहिल्यानें शोभा होण्याचा प्रसंग यावयाचा या विचारानें बन्यानें जाण्याचा मार्ग आक्रमिला. जातां जातां " तुझ्या बाबांना यांतलं अक्षरन् अक्षर कळणार आहे, एवढं लक्षांत ठेव. " म्हणून बन्यानें मला बजावलें.

" पाहूं, पाहूं; आत्तांच काय त्याचं ?" म्हणून शक्य तितक्या निष्काळजी आवाजांत मीं उत्तर केलें.

मीं राहूकडे कृतज्ञतेच्या दृष्टीनें पाहिलें. तोंडानें ' चक्‌चक् ' करीत राहू कामाला लागला.

"राहू, जरा वेळ काम राहूं दे—कोणत्या देवानं तुला एवढं शहाणपण शिकवलं ! राहू—" मला पुढें बोलवेना.

"सदुभाऊ, जग बेइमान आहे. जगाची उलटापालट झाली आहे. आम्हां गरिबांना सारं कांहीं समजतं—पण उमगल्यासारखं दाखवणं आमच्या धंद्याला बाद आणणारं आहे. मनांत आणलं असतं तर बन्यासाहेबांना चोर ठरवून त्यांना इथं मीं बसवून ठेवलं असतं. किल्ली जवळ असली म्हणजे कांहीं पास परवाना नाहीं. मला काय माहीत ? त्यांनीं ती चोरूनहि आणली असावी. प्रत्यक्ष पोटच्या गोळ्याला बाजूस सारून रस्त्यांतल्या मावळ्यावर कोणता बाप विश्वास ठेवील, या मुद्यावर मी त्यांना अडकून ठेवलं असतं. पण सदुभाऊ—भाऊसाहेबांनीं तुम्हांला त्रास दिला असता. माझ्या नोकरीची मला काळजी नाहीं, पण माझ्यापायीं तुम्हांला उगीच त्रास कशाला, म्हणून मीं त्यांना नुसत्या आंकड्यावरच सोडून दिलं. सदुभाऊ—भाऊसाहेबांचं हें करणं मला मुळींच पसंत नाहीं. तुम्ही कांहींहि म्हणा, पण लेकराला असं तोडून टाकणं चांगलं नाहीं. भाऊसाहेबांना मी सांगेन. कधीं सोडणार नाहीं. खरं आहे तें बोलण्याला कसली चोरी आहे ? कुठंहि पोटाला खाईन, पण हा अन्याय चालूं देणार नाहीं." राहू आवेशानें म्हणाला.

राहूसारख्या त्रयस्थालासुद्धां हा अन्याय आहे एवढें समजत होतें. मला तेवढाच धीर आला.

"दुनिया फिरती आहे, आपली खुंटी केव्हां तरी वर येईलच." राहू आपल्याशींच पुटपुटला.

"हं ! वाटेंत कुठं मोडली नाहीं तर येईल वरती—" मीहि अर्धवट आपल्याशींच पुटपुटलों.

मीं मामांना सर्व कांहीं सांगितलें. संध्याकाळीं मामा आमच्या घरीं आले. मामांनीं आईलाच विचारलें,

"ताई—हा काय गोंधळ आहे घरांत ? भाऊंची ती तऱ्हा. तूं तर मुळीं संसारांतून लक्षच काढल्यासारखं करते आहेस. सदूला जगांत वागूं द्यायचा तुमचा विचार नाहीं का ? तुम्हांला जर स्वतःचा मुलगा जड

झाला असेल तर त्याला दृष्टिआड तरी करा किंवा—मला कांहीं तो जड नाहीं. मी त्याला माझा मुलगा समजेन—" मामा म्हणाले.

"हें बघ बाबा—मेलेल्याला तुम्ही किती मारणार? मी घरांत नाहीं असंच तुम्ही समजा—" आई म्हणाली.

"समजा कसं? निजलेल्या माणसावर वस्त्राचं आच्छादन टाकलं म्हणजे तो मेला असं कसं समजावं—" मामा म्हणाले.

"हें पहा, मला तुमच्या या घालून पाडून बोलण्याचा अगदीं वीट आला आहे. तुम्हांला माझा स्वभाव तर्कट आहे तें माहीत आहे. मी सदा त्रासलेली, तर्कट, रागीट—ही अशी असतें. कशाला माझ्याशीं बोलण्याचा प्रसंग आणतां? तुम्ही सगळीं चांगलीं आहांत. मी वाईट आहें. मेलं घर आहे का महारवाडा आहे? जेव्हां पहावं तेव्हां यांची ही तऱ्हा."

आईनें आपल्या भाषणानें सुचवलें कीं ही मुलाखत आतां संपविलेली बरी. बाबांशीं हें बोलणें काढावें किंवा कसें याचा मामा विचार करूं लागले. शेवटीं, गोष्टी मुळांतच आहेत तोंपर्यंत निकाल लावलेला बरा, नाहीं तर निकराची बाजू आल्यावर मग जाग येऊन काय उपयोग, या विचारासरशीं मामा तडक बाबांच्याकडे गेले.

बाबांनीं सरळ सांगितलें कीं "त्याचं माझं या जन्मीं पटणं शक्य नाहीं. तुम्ही मुळींच रदबदलीच्या खटाटोपांत पडूं नका." तेवढ्या अवधींत मीं बन्याला बोलावून आणलें.

"हें पहा भाऊसाहेब— मला तुमच्यापेक्षां व्यवहार जास्त कळतो असं मी मुळींच म्हणणार नाहीं. हाताखालीं राहून मला तुमचीच शिकवण मिळाली आहे. तरी पण जनदृष्ट्या कांहीं कांही गोष्टी अगदीं मनाविरुद्ध कां असेनात—पण त्या करणं भाग पडलं. सदू कांहीं कोणी धरून आणलेला चोर नाहीं. या घरांत पुढंमागं तोच मालक रहाणार. आपल्याप्रमाणंच मुलांनाहि भावना असतात. त्याचा मालकीचा हक्क तुम्ही तिऱ्हाइताला देऊं लागलांत तर त्याला काय वाटेल, याचा विचार नको का करायला? सगळ्या गोष्टींत पुढचं धोरण थोडंसं पाहिलं म्हणजे नसत्या भानगडी उद्भवण्याचं कारणच पडणार नाहीं. आज तुम्ही बन्याला दुकानची व्यवस्था पहायला

सांगितलंत. शेजारधर्म म्हणून, किंवा अडलेल्या जिवाला साहाय्य करणं हें आपलं कर्तव्य म्हणून तो उदारमनानं तुमच्याकरितां त्रास सोसून दुकानावर बसायला तयार झाला. यांत त्याचा मोठेपणा दिसून येतो. त्याच्याकडे काडीइतकाहि बोल नाहीं. पण इकडे निसर्गाच्या नियमांप्रमाणं तुमच्या अपरोक्ष सदूचाहि तोच हक्क आहे. आतां अशा प्रसंगीं जोडाजोडी होईल त्यांची. कदाचित् आजन्म टिकणारं असं वितुष्टहि दोघांमध्यें येण्याचा संभव आहे. आणि या वितुष्टाला कारण त्या दोघांपैकीं एकहि नसून आपणच होऊं. म्हणून म्हणतों, तुम्ही बरे होईतोंपर्यंत सदूलाच सर्व व्यवस्था पहायला सांगावी—"

मामांच्या व्याख्यानाचा बाबांच्यावर कांहींहि परिणाम झाला नाहीं. व्याख्यानाला पूर्णविराम मिळेतोंपर्यंत त्यांनीं डोळे मिटून घेतले होते. 'आणखी थोडंसं राहिलं असेल' अशा व्यंजक स्वरूपांत त्यांनीं मामांकडे पाहिलें.

"तुम्ही सगळ्यांनीं मिळून माझ्या जिवावर उठण्याचा कट केला आहे. मी तुम्हाला नकोसा झालों आहें. ह्या कार्ट्याचं निमित्त पुढं करून तुम्ही धूळ फेंकतां माझ्या डोळ्यांत ? आपलींच माणसं धड नाहींत; लोकांना कशाला बोलूं ? बायको पण बायको ! पोरगं पण पोरगं ! मी बरा होऊं द्या ! लाथ मारून हांकलून लावतों एकेकाला ! कांहीं मला नातीं नकोत आणि गोतीं नकोत. बायको अन्नान्न करून रस्त्यावर मेली तरी मला परवा नाहीं. कोणी कुणाचा नाहीं. सगळे खाबू लेकाचे ! चलतीच्या दिवसांत नाचले भोंवतालीं. आजारी पडलों तर एकाचा पाय ठरेल माझ्याजवळ तर शपथ ! मला काय डोळे नाहींत !" अगदीं स्पष्ट आवाजांत बाबांनीं आपला निर्णय जाहीर केला. जरा वेळ थांबून ते म्हणाले, "कशाला माझ्याजवळ बसतां ! मी मेलों म्हणजे तुम्हांला आपोआप कळेल. सडलेल्या प्रेताचा गिधाडांना तेव्हांच वास लागतो—तुम्हांला काय माझं करायचं असेल तें करा—मी दुकान फुंकून टाकीन; पण त्या कार्ट्याला एक क्षणभर त्या दारांत उभा राहूं देणार नाहीं !—" इतकें म्हणून बाबांनीं डोळे मिटले.

बोलण्याच्या श्रमानें त्रास मात्र व्हावयाचा, दुसरातिसरा कांहींएक फायदा होणार नाहीं, हें पाहून मामांनीं बन्याला आणि मला खालच्या बाजूस चलण्यास खूण केली. खालीं गेल्यावर मामांनीं मोठ्या प्रेमभावानें बन्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हटलें, "बन्या, तूं समजूतदार आहेस. आज धुमसत रहाणाऱ्या आगीनं उद्यां पेट घ्यावा अशी तुझी इच्छा आहे का? सदू आणि तूं लहानपणापासून एके ठिकाणीं वाढलेले आहांत. तो माझा भाचा असला तरी तुझ्यापेक्षां कांहीं जास्त प्रिय नाहीं. त्याला जेवढ्या सवलती मी देतों तेवढ्या मी तुलाहि देत असतों. तुम्ही दोघांनीं असा हेवादावा करावा हें युक्त नाहीं. माझी इच्छा अशी आहे कीं तूं आपलं आंग काढून घ्यावंस या भानगडींतून—"

"पण मामा—यांत माझा काय दोष? सदूच्या वडिलांचं मीं ऐकलं नसतं तर तिकडून—" बन्या म्हणाला.

"तुझा दोष नाहीं हें मीं आधींच म्हणून सोडलेलं आहे. आतां तुझं कर्तव्य एवढंच कीं त्यांनीं कांहींहि सांगितलं तरी लख्ख नाहीं म्हणून म्हणत जा. लक्षांत ठेव, आपण सगळ्यांना एकदमच खुष करूं म्हटलं तर तें शक्य नाहीं. पण सदूच्यामुळं त्याच्या वडिलांची अन् तुझी घसट, हें विसरतां कामा नये. सदू प्रथम अन् मग त्याचे वडील. तूं या बाबतींत पूर्ण विचार कर. बाजू तुझ्यावर असती तर तूं काय केलं असतंस तें स्वतःला विचार. तुझ्या दूरदर्शित्वाची मला खात्री आहे. खेळीमेळीनं राहून दिवस काढायचे तिथं हा कसला वाद घालून बसतां?" मामा म्हणाले.

मामांच्या देखत आम्हां दोघांचा तात्पुरता समेट घडून आला. पण बन्याविषयीं मला यापुढें खात्री देतां येणें शक्य नव्हतें. लहानपणीं मासिकाच्या बाबतींत मला त्याचा अनुभव आला होता. पण त्या वेळीं मी झाल्या गेल्या गोष्टी विसरायला तयार होतों. आज माझी मनस्थिति त्या वेळेइतकी उदार नव्हती. मला त्याच्या मनाचा नीचपणा पुरतेपणीं कळून आला होता. आतां यापुढें फक्त लोकांना दाखवायला म्हणून मी त्याच्याशीं दोस्ती ठेवणार होतों.

" विचार कसला चालला आहे ? " बन्यानें हंसत प्रश्न केला.

" विचार ? छेः ! आपली लहानपणापासून जडलेली एक खोड आहे, झालं ! " मींहि हंसत उत्तर केलें.

---

# प्रकरण १७ वें



## समाजसुधारक

तात्परतें कां होईना पण वसाहतींचें स्वराज्य मीं मिळविलें होतें. माझा जीव नेहमींच असंतोषी असल्याकारणानें आहे या अधिकारांत काय काय नवीन सुधारणा करतां येतील याचा मी विचार करूं लागलों. शक्य असतें तर एक दिवसभर मीं सगळें दुकान उन्हांत शेकत टाकलें असतें. बाबा दुकानावर आपली मालकी सांगत होते, पण प्रत्यक्ष पाहिल्यावर प्रश्न पडे कीं हें दुकान ह्या मनुष्यप्राण्याचें कीं या जन्तुजीवांचें ! त्या आगंतुक पाहुण्यांना नोटीस द्यायला माझें मन अधीर झालें होतें—पण राहू (ग्रह तो) आडवा आला !

"नाहीं. सदूभाऊ—विलायती थाट, ते गोट मॅट—कांहीं आपल्याला नको. नुसत्या भपक्यानें इतरांचे डोळे दिपतात, म्हणजे त्यामुळं आपण त्यांच्या डोळ्यांत भरत नाहीं. संथपणानं जळणारी मेणबत्ती जशी आनंद देते तसा विजेचा दिवा देत नाहीं. दुकानाला भपका उपयोगी नाहीं. मी चार दिवस दुकान चालवतों; तुम्ही नुसतं लांबून पहा. सचोटी, प्रामाणिकपणा, अन् साखरेंतली जीभ—बस्, झाला दुकानदार ! वेळ प्रसंग पडलाच तर खोटं बोलायला कांहीं हरकत नाहीं. पण जमेल तितकं खरं बोलणं केव्हांहि फायद्याचं आहे. जग बेइमान असलं तरी आपण इमान सोडतां कामा नये. आपण इमान सोडलं कीं जगाला बेइमान म्हणण्याचा आपल्याला अधिकार रहाणार नाहीं."

राहूच्या म्हणण्यांत अगदींच तथ्य नव्हतें असें मला वाटेना. तरी पण

शक्य तोंवर नव्याजुन्या पद्धतींची योग्य सांगड घालून धंदा पुढें चालवायचा हें ध्येय सोडण्यास मी तयार नव्हतों. मात्र सोयीसोयीनें तें साध्य करावें लागणार होतें.

संध्याकाळच्या सुमारास मी दुकानांत इतस्ततः विखुरलेल्या फूटपट्ट्या नीट जमा करीत होतों. इतक्यांत बाहेरच्या बाजूनें मला साठ्यानें हांक मारली. हातांतलें काम टाकून मी उभा राहिलों.

" या हो साठे, आंत या ना ! का, गडबडींत आहांत ? " मी हंसत म्हणालों.

" अरे—थोडक्यांतच सांग ना आम्हांला जा म्हणून ! उगीच आम्हांला गडबडींत आहांत का हे टोमणे कशाला ? "

" पाहिलंस साठे, असा तुझा मेंदू कुचका आहे बघ. साध्या शब्दांचे हे तेढे अर्थ कशाला ? " मीं म्हटलें.

बराच वेळ इकडे तिकडे गप्पा झाल्यावर मीं त्याला हळूंच प्रश्न टाकला, " साठे, अरे तूं या पुण्याच्या पोरांना दाखवणार होतास नं? त्याचं काय झालं ? "

एकदम साठे गंभीर झाला. पुढें जाण्यासाठीं ज्याप्रमाणें प्रथम गाडी थोडीशी मागें जाते त्या तत्त्वावर कांहीं वेळपर्यंत तो स्तब्ध राहिला. नंतर आवेशासरशीं पुढें होऊन म्हणाला,

" देव, आयुष्याची गुंतागुंत उकलण्याच्या बाबतींत मी पंगु ठरलों. आपण सर्वजण असेच हीनबल आहोंत. त्या दिवशीं घरीं गेल्यावर मीं मनाशीं पक्की गांठ बांधून ठेवली कीं, काय वाटेल तें होवो—आज त्यांनीं माझी हेटाळणी केली काय ! बरं आहे. चारदोन महिन्यांतच यांना दाखवतों !—निश्चय करायला फार सोपं जातं; पण त्याची अंमलबजावणी तितकी सोपी नसते. मी त्यांना काय दाखवणार ? सर्वसाधारण विद्यार्थ्यांसारखं राहून मला कोण विचारणार ? सोलापूरसारख्या निर्बल ठिकाणीं माझं आयुष्य गेल्याकारणानं पुण्यांतला चळवळ्या स्वभाव मी कसा पैदा करणार ? तुला खोटं वाटेल, देव, पण मला सायकलवरसुद्धां बसतां येत नाहीं. बोल पुढं ! अरे, ज्या ठिकाणीं बारा बारा वर्षांच्या पोरी

खुशाल परकराचा काचा मारून सायकल म्हणजे खेळण्याप्रमाणं मिरवितात, त्या ठिकाणीं पुरुषजातींत जन्माला येऊन, उणींपुरीं एकोणीस वर्षं झालीं तरी सायकल हें एक अगम्य शास्त्रच असावं असं मला वाटतं. आहे कीं नाहीं ! ”

“ सुडाची लहर इतक्या लवकर जिरली याचंच मला आश्चर्य वाटतं आहे.” मी म्हणालों.

“ मग काय करणार ? देव, एक अभ्यासिक मुलगा म्हणून पुढं यावं अन् मग ह्यांची जिरवावी ह्या विचारानं मीं काय काय खटपटी केल्या त्याची तुला कल्पना यायची नाहीं. त्या दिवशीं रात्रीं घरीं गेलों. प्रत्येक विषयाकरतां निराळी वही तयार केली. आंतल्या पानावर सुवाच्य अक्षरानं ‘विष्णु नरहर साठे, सीट नं. २५, कॉलेजचं नांव, शहराचं नांव, सालमजकूर’ इत्यादि व्यवस्थित प्रकार केला. प्रत्येक वहीच्या प्रारंभींच्या दहावीस पानांना एकचतुर्थांश मुडपण घातलं. हेतु हा कीं, दुसऱ्या दिवसापासून वर्गांत पेन्सिलीचं काम आणि घरीं शाईनं शुद्धलेखन. ज्या दिवशीं अनध्याय त्या दिवशीं उपोषण. ‘कष्टाशिवाय काय आहे, विष्णुपंत’ म्हणून स्वतःची समजूत करून घेतली. प्रथम जिवाची राळ करावी लागते तेव्हां त्या राळेंतून सुखाचीं स्वप्नं दिसूं लागतात. सदुभाऊ, मनाचे मनोरे जगांतल्या कुठल्याहि दगडमातीच्या मनोऱ्यांना लाजवणारे होते. काव्याच्या भाषेंत बोलायचं म्हणजे गगनाला गवसणी घालणारे होते, तारामंडळाला जाऊन भिडणारे होते——पण——? देवसाहेब, काव्याला व्यवहार पोषक असला तरी व्यवहाराचं काव्याशीं शत्रुत्वाचं नातं असतं. रमणीचं रमणीयत्व काव्याच्या स्पर्शानं तिला स्वर्गांगना बनवते; पण व्यवहारांत तें रमणीयत्व तिच्या नाशाला कारणीभूत होऊन ती एक क्षुद्र पण्यांगना बनते ! कलासक्ति या बड्या नांवाखालीं हलके लोक तिच्याशीं सलगी ठेवूं लागतात ! हा जो व्यवहार तो माझ्या काव्यमय निश्चयाच्या आड आला. आज जवळ जवळ एक महिना होत आला आहे, मलपृष्ठ सोडून साऱ्या वह्या कोऱ्या आहेत. कारण——कारण कांहींच नाहीं. तसं म्हटलं तर आहे. कारण नाहीं कसं ? आळस ! चालढकलीची संवय !

हेंच तें कारण. आजच सुरुवात करून काय करायचं आहे—अजून सबंध वर्ष आहे. अभ्यास अभ्यास तो काय ? इंग्रजी पुस्तक म्हणजे २५० पानांचं भरताड !

" मनुष्याचा आशावादीपणा असेच बेतावर बेत ठरवून ठेवीत असतो. महिन्यांतला माझा जीवनक्रम खरोखरीच अनुकरणीय आहे. सबंध दिवसभर मी घरांत नसतों. रात्रीं दंवबिंव पडलं तर मलेरिया लागेल या भीतीनं कुठं तरी आश्रयाला पडायचं म्हणून घराची गरज. सदू, माझी ताई अगदीं साधीभोळी, सोन्याची पुतळी आहे. तिला यांतलं कांहींहि समजत नाहीं. ताईचा नवरा म्हणजे तूं त्या दिवशीं दाखवलास तसा त्या रामभाऊचा मासला आहे. 'अंकित पदांबुजाची दासी ' हें ह्यांचं साहेबापुढलं संगीत. घरांत संध्याकाळीं जेवायच्या वेळेला हा your most obedient servant मला भेटतों. पण त्या वेळेस दुपारीं हपिसांत झालेल्या गोष्टींचं वर्णन करण्यापलीकडे त्याला दुसरं कांहींच सुचत नाहीं. 'आज साहेबाला मीं यंव सांगितलं, अन् तो त्यंव म्हणाला—' व 'आज तो लेकाचा देशपांडे काय गुर्मीत होता ? पांच मिनटांत मीं त्याला चीत केला. माझ्यापुढं गमजा ! अरे, जा म्हणावं लेका, तुझ्यासारख्या अशा छप्पन कारकुंड्यांना मीं कोलांडे घातले आहेत.—' इत्यादि वीररसानं ओथंबलेलीं, कांहीं संबोधनात्मक, कांहीं अशीं, कांहीं तशीं संभाषणं ऐकून घेतां घेतां माझा जीव रंजीस येतो. तरी पण बहिणाबाईना राग येऊं नये म्हणून मी शान्तपणें ऐकून घेत आहें. मधून मधून सांगितलेली माहिती मला समजते आहे हें दर्शविण्यांकरितां—'हो, अस्संच !' 'अरे चोरा !' 'शाबास !' 'यंव रे गब्रु' इत्यादि प्रोत्साहनात्मक उद्गारचिन्हालंकृत वाक्यें टाकणें भाग पडतें.

" दर आठवड्याला एक पत्र, हा करार मी आपल्या जन्मदात्याशीं करून चुकलों आहें—म्हणजे तसा करार करण्यांत खरोखरीच माझ्या हातून चूक झालेली आहे. दर खेपेला वडिलांना पत्र तरी काय लिहिणार ? पुण्याला धरणीकंपाचे धक्के फार क्वचित बसतात. पुण्याला रोज विमानांची टक्कर होऊन दहा माणसं जखमी, पांचसहा मयत असे अद्भुत

प्रकारहि घडत नाहींत. हवा नेहमींच समशीतोष्ण असते. पावसानं गांव कधीं वाहून गेलं नाहीं कीं उन्हानं करपून गेलं नाहीं. नाहीं म्हणायला कॉलेजमधल्या मुलींचे बदलते पोषाख हा विषय आहे. आज जिलबीची वेणी, तर उद्यां नारळी अंबाडा, तर परवां साधाभोळा खोपा—मला वाटतं, कॉलेजांत अजून कुणी 'शेपटा फॅशन' आणलेली नाहीं हें वर्णन करण्याजोगं आहे. आज गुलाबी पातळ, तर उद्यां किनारीचं पातळवजा लुगडं, तर परवां पिना लावून चिकटवलेलं धोतरजमा शुभ्र पातळ ह्या गोष्टीं-वर पानंच्यापानं खरडतां येतील. पण वडिलांना तीं वर्णनं कशीं काय आव-डतील हा प्रश्नच आहे. देव, लहानपणीं आमच्यासारखे हेहि टोळभैरवीपणा करीत किती तरी पोरींच्यामागं धांवत सुटले असतील. पण आतां कोण-त्याहि स्त्रीचं नांव काढायचा अवकाश, कीं यांचे डोळे लाल होतात. मला वाटतं पूर्वाश्रमींचीं पापं यांना स्वस्थ अन्न खाऊं देत नसतील. हें आयुष्य— आयुष्याचा हा असा मासला आहे! इतक्या सव्यापसव्यांतून मी शीरसलामत सुटेन तेव्हां कुठं ती सुडाची कल्पना माझ्या टाळक्यांत शिर-णार—बरं आहे. तो पगडीवाला जन्टलमन् बघ कसा त्या सोनसळीकडे रोंखून पहातो आहे. असाच धांवत जाऊन त्याचा कान पकडूं का ?"

मीं त्याला सांगितलें कीं स्वतःचे कान कापून मग त्याचा कान पक-डायला जायला कांहीं हरकत नाहीं. म्हणजे परतभेट आली तर निदान त्याच स्वरूपाची नको. त्यांत कांहीं तरी नाविन्य असलें म्हणजे बरें.

" उद्यां जर तुझी हरकत नसेल तर मी येईन—" साठे जातां जातां म्हणाला.

" माझी हरकत नाहीं. फक्त येतांना जिभेला दोन टांके मारून ये किंवा शेंदूर खाऊन ये." मी हंसत म्हणालों.

" नको. माझे विचार म्हणजे कारंजाच्या पाण्यासारखे चौफेर उडणारे आहेत. मला बोलायची मोकळीक आहे तोंपर्यंत तुला खर्च तरी नाहीं पडणार. माझी जीभ कापलीस तर तुझ्या दुकानांतल्या कागदांवर मी माझे विचार मांडीन." साठे म्हणाला.

साठे मला उद्देशून जरी बोलला होता तरी राहूनें सर्व कांहीं ऐकलें होतें. साठे जातांच राहूनें म्हटलें,

" सदूभाऊ, हे कोण साहेब ? अन् बोलायला जबरा मनुष्य ! "

" हा साठे होय ? अरे, सोलापूरसारख्या निर्जल प्रदेशांत भरमसाट वाढणारं हें एक रानटी झाड आहे. रुक्ष प्रदेशांतून सूर्याच्या तापाखालीं करपून जाणाऱ्या मनुष्यप्राण्याला सांवली मात्र छान देईल. पुण्याच्या हवेनं त्याच्यावर थोडासा वाईट परिणाम झाला आहे. प्रथमदर्शनींच त्या झाडाच्या फांद्या कुणी तरी दुष्टानं तोडून टाकल्या. तरी पण कांहीं वेळानं हा तोडिलेला तरु आणखी जोरानं फूटेल ! " मी हंसत म्हणालों.

" सदुभाऊ, कांहींहि म्हणा, पण अगदीं थेट तुमच्या स्वभावाचा मासला आहे—" सदू म्हणाला.

" अरे म्हणूनच समानधर्मे एके ठिकाणीं आले आहेत. " मीं उत्तर केलें.

त्या दिवसापासून आमचें स्टेशनरी सामानाचें दुकान म्हणजे साठ्याचें शिवाजीमंदीर झालें. दिवसाच्या घडामोडींत चारदोन विचार डोक्यांत जमा झाले कीं त्या विचारांचें प्रदर्शन दुकानांत, हा क्रम सुरू झाला. गिऱ्हाइक आलें कीं तात्पुरती तोंडाला रजा, पुन्हां आपली सजा चालूच आहे. जगाच्या बेइमानपणाविषयीं प्रश्न निघाला कीं आमच्याजवळ एक तज्ज्ञ तयार होता. स्वानुभवाच्या जोरावर राहु आपलें मत पुढें मांडीत असे. आम्ही त्या बाबतींत त्याला पूर्ण स्वातंत्र्य देऊन ठेवलें होतें. त्यांतून साठेला राहूवांचून करमेनासें झालें. ' राहू म्हणजे सोनें आहे सोनें ' म्हणून साठे त्याच्या तोंडावर वारंवार म्हणत असे. मी राहूला सोनें म्हणून म्हणायला तयार नसलों तरी ' सोन्या ' म्हणून म्हणायला तयार होतों !

पुढें पुढें आम्ही तिघेहि समाजसुधारक बनलों. आहे ह्या समाजाची सर्वांगीण छाननी करून काय केलें असतां समाज इष्ट ध्येयाला जाऊन पोहोंचेल याविषयीं आमचा उहापोह चालू असे. राहूला त्याच्या समाजाची विशेष काळजी असणें केव्हांहि रास्त होतें. मधुनमधून त्याच्या समाजालाहि आम्ही हातभार लावीत असूं. समाजाला आमची सुधारणा

खरोखरीच कितपत पटली असती ?—बहुतेक पटलीच नसती. तरी पण सुधारणा बोलून दाखवायला काय हरकत आहे ? मनांतली खळबळ एरवीं शान्त कशी होणार ? साठे कोंपऱ्यांत मांडलेल्या तक्याशीं टेंकून ऐसपैस लोळत पडे. मी खुर्चीवर बसून एक डोळा गिऱ्हाइकाकडे आणि एक डोळा साठ्याकडे असा बसत असें. राहूचें वरकाम चालूच असे.

कशावरून वाद निघाला कुणास ठाऊक, एके दिवशीं आम्ही ( वस्तु-विपर्यास नको असेल तर साठे एकटा म्हणणें सत्याला धरून होईल. ) हल्लींच्या मुलींवर घसरलों. साठे आपलीं विधानें मांडूं लागला—

" हल्लींच्या मुली हा एक तुम्हां आम्हांपुढं प्रश्नच आहे. त्यांना काय केलं असतां वटणीवर आणतां येईल हा भावी पिढीच्या तरुणांपुढं एक मोठा प्रश्न आहे—" साठे म्हणाला.

" वा: ! पण साठे, आज ह्याच वेळीं, ह्याच पुणें शहरांत किती तरी मुली ह्या 'पुरुषांना काय केलं असतां ते वठणीवर येतील, हा भावी पिढीच्या तरुणींपुढं एक मोठा प्रश्नच आहे ' म्हणून विचार करीत असतील त्याची काय वाट ? पूर्वींचे दिवस आतां विसरा. बापानं धरून आणलेल्या हणगो-बाशीं मुकाट्यानं संसार करायचा हें हल्लींच्या मुलींना मुळींच पसंत नाहीं." मी म्हणालों.

" हें पसंत नसलं तरी हें मुकाट्यानं करावं लागतं आहे त्याची वाट काय ? सदुभाऊ, तुम्ही चुकतां आहांत. शिक्षणामुळं मुलींच्या मार्गांत नवी-नच संकटं उपस्थित झालीं आहेत. एकंदर मुलींचे किती भाग पाडतां येतील आपण पाहूं—" साठे हातांत फूटपट्टी घेऊन काल्पनिक भाग पाडूं लागला.

" म्हणजे, मुलींना तूं तरवारीची धार दाखवणार कीं काय ? " मी हसून म्हणालों.

" थिल्लरपणा सोडून दे. गंभीर मुद्रा धारण कर. तेव्हां प्रथम पहिला विभाग—बिनशिकलेल्या मुली. म्हणजे दोनन् दोन किती हें दुसऱ्याला विचारण्याची तयारी करणाऱ्या—"

"म्हणजे हा जवळ जवळ विभाग सत्यसृष्टींत नाहीं असंच आपण धरून चालू. " मी म्हणालों.

"चूक ! सदू, पुण्यामुंबईत हा विभाग दृष्टीस पडणार नाहीं हें मला कबूल आहे. पण पुणं–मुंबई म्हणजे कांहीं जगाची आदिअंत मर्यादा नव्हे. खेडेगांवांतून पहा. आमच्या सोलापूरच्या काळ्या मातींत उगवणारीं रानटी झाडं पहा. शिक्षणाचा गंध असेल तर जीभ कापून देईन. दुसरा विभाग म्हणजे इंग्रजी चार यत्तांपर्यंत शिक्षण झालेल्या छन्नुक तारा. पहिल्या विभागांतील मुलींचा फार त्रास होत नाहीं. घाण्याला जुंपलेल्या बैलाप्रमाणं आयुष्याचे आदि, मध्य आणि अंत हे सर्व प्रकार त्यांच्या बाबतींत निमूटपणं पार पडतात. नवरा बेताचाच शिकलेला—कदाचित् एखादा नांगऱ्याहि असूं शकतो. पण स्वतःची पडती बाजू त्या मुलींना पटलेली असल्यामुळं नवरा देव समजून त्या निमूटपणं आला दिवस साजरा करीत असतात. पण हा दुसरा विभाग थोडासा कठीण आहे. ह्याच्यांत थोडासा ताठरपणा, अहंकार आणि अर्ध्या हळकुंडानी गोरं होण्याची भावना जागृत असते. इंग्रजी शिक्षणानं त्यांची बुद्धि प्रगल्भ न होतां थोडीशी फांकल्यासारखी होते. यांतच त्यांच्या नाशाचं बीज असतं. इंग्रजी शिक्षणानं जीभ अरळ होते—कोणत्याहि विरामचिन्हाकडे लक्ष जात नाहीं. अफाट दर्या जसा पौर्णिमा आणि आमावास्येच्या दिवशीं सारखा आन्दोलन पावत असतो तद्वतच यांच्या जिभेला पूर्णविराम कधींच नसतो. मुली धीट झाल्या पाहिजेत या तत्त्वानें पिसाटून गेलेली मंडळी प्रत्यहीं तिला धीट करण्याकरतां नवीन नवीन मार्ग शोधून काढीत असतात. परिणाम असा होतो कीं, मुली खरोखरीच धीट होतात—स्त्रीस्वभावानुरुप शोभून जाणारी लज्जा झुगारून देतात ! आणि पुरुषवळणाच्या स्त्रियांशीं आम्हा पुरुषांना संसार करावा लागतो. हा विभाग तयार करणारी मंडळी म्हणजे आमच्या मागची पिढी. त्यांत त्यांचा कांहीं दोष होता असं मी मुळींच म्हणणार नाहीं. पण सत्कार्य करण्याच्या नादांत मनुष्य कालमर्यादा झुगारण्याचं पाप कसं करीत असतो हें मला सांगायचं आहे. अजूनहि ती पिढी अस्तित्वांत आहे. अजून 'मडबिणी' थाटाच्या मुली शाळेंत जात आहेत. मुलांना जें शिक्षण मिळतं तें शिक्षण अजूनहि त्या मुलींना मिळत आहे. पण आपली पिढी—पुढली पिढी तें चालू देईल कीं नाहीं हा प्रश्न आहे—"

" तूं आपल्या मुलीला झाडाला बांधून ठेवणार आहेस वाटतं ? " मी दौतीशीं खेळत म्हणालों.

" हा वस्तुविपर्यास आहे. मुलींच्या बाबतींत ही मारहाण कधींहि करूं नये. मुली फुलांसारख्या वाढवाव्या, पण फुलाच्या पाकळ्या गळतील अशी फुलाची स्थिति करूं नये. मला जुन्या मताचा म्हण, काय वाटेल तें म्हण, पण मुलींच्या शिक्षणाची दिशा चुकते आहे हें मी मरेपर्यंत म्हणत रहाणार. मुलगी शाळेंत जाणार म्हणून आई लाड करणार, बाप पैसे पुरवणार आणि पुढं येणाऱ्या नवरोबाच्या डोक्यावर ती हात फिरवणार—हें आयुष्य. हा आयुष्याचा एक मासला आहे. त्यानंतर तिसरा विभाग म्हणजे प्रीव्हिअस इंटरपर्यंत ध्वजारोपण करणाऱ्या मुलींचा. त्या वेळींच सावध होतात. आपलं तारू भडकलं आहे, आईबापांचा आसरा फार थोड्या दिवसांचा आहे, आपल्याला आपली सोय पाहिलीच पाहिजे ह्या विचारानं सांपडेल तो तरुण पकडून त्या संसाराच्या मार्गाला लागतात. या मुलींना जगाचा पुष्कळच अनुभव असतो. विचाराची शक्ति त्यांच्यांत आलेली असते. प्रस्तुतचं शिक्षण आपल्या काडीमात्र उपयोगाचं नाहीं हें त्यांना पटतं. मांजराच्या पिलाप्रमाणं येणाराजाणारावर फिस्फिस् करणाऱ्या तीनचार यत्तांच्या मालकिणींना पाहून या मनांत हंसत असतात. एखाद्या मुरलेल्या तत्त्वज्ञान्याप्रमाणंच मनाशीं पुटपुटत असतात कीं ' काय हा खेळ आहे ? आयुष्याची या पोरींना काय कल्पना आहे ? यांना वेळींच सावध कोण करणार ? ' पण सदुभाऊ, आपणासारख्या तत्त्वज्ञान्याप्रमाणं चालत्या गाड्याला खीळ घालण्याचं त्यांना धैर्य होत नाहीं. आपण हीनबल तशाच त्याहि हीनबल आहेत. निदान स्वतःपुरतं तरी पहावं या विचारानं त्या विवाहहोमाकडे धांव घेतात. या मुलींच्या संसाराचं चित्र काढ पाहूं—" साठे म्हणाला.

" तें चित्र काढायला माझ्याजवळ पुरेसे रंग नाहींत." मीं हंसून उत्तर केलें.

" मी काढतों तें चित्र.— घरांत एक प्रकार आणि बाहेर तिसराच अवतार. मनाजोगता नवरा मिळतो. इंटर झालेल्या मुली बहुतेक

M. A. LL. B. किंवा अशाच लांब शेंपटाच्या गाढवाशीं संसार मांडीत असतात. या मुलींच्यापुढं मोठी महत्त्वाची कामगिरी असते—एक तुटेल इतकें नवऱ्याशीं चढेल वर्तन ठेवणं त्यांच्या हिताचं नसतं. पण अगदीं नमतें घेणें त्यांना रुचत नसतं. बाहेर इतर बायकांना तर आपला अधिकार मोठा आहे हें दाखविणं प्राप्त असतं. पुन्हां शिक्षणाशीं बेइमान होणं रास्त नसतं. शिक्षणाचा जरी कटु अनुभव आलेला असला तरी वरपांगीं 'बाई ! शिक्षणाशिवाय काय आहे ?' हा डांगोरा पिटविण्याचं सत्र चालूच असतं. ह्यालाच धंदेवाईक मंडळींचा प्रामाणिकपणा म्हणून संज्ञा प्राप्त होते ! ही छपवेगिरी त्या जन्मभर करीत असतात. पण मन खात असतं. लवकरच त्या संसाराच्या नवीनपणाला कंटाळतात. पोराबाळांचं लेंढार मार्ग लागतं आणि अशा या कंटाळवाण्या जीवनांत त्यांना खिचपत पडावं लागतं. त्यानंतरचा विभाग म्हणजे बी. ए. झालेल्या आणि त्याहि वरच्या पंडितांचा. अगदीं केवीलवाणी स्थिति, कुत्रा हाल खायला तयार नसतो ! सदू, मनाशीं विचार कर. बी. ए. बाईशीं लग्न करणं आपल्याला परवडेल का ? आपली पुरुषांची समजूत असते कीं ह्या डिग्रीवाल्या मुली म्हणजे वाघिणी असतील. शिक्षणाचं उच्चतम शिखर गांठलेल्या या वाघिणी घराच्या पिंजऱ्यांत कोंडून ठेवाव्यात तरी कशा ? अन् वेळोवेळीं ह्या पंजा मारायला मागं घेणार नाहींत. ही आपली कल्पना. पण वस्तुस्थिति याहून अगदीं निराळी आहे. या वाघिणी आतां अगदीं गोगलगाई बनलेल्या असतात. आधीं विचार पुरतां न केल्यामुळं आपली फसगत झाली आहे हें त्यांना वारंवार जाणवत असतं. मला अश्लील म्हणालास तरी चालेल, पण मी स्पष्ट सांगेन कीं ह्या मुली संसार मांडायला अगदीं टपून बसलेल्या असतात. त्यांना शिक्षणाची महती कळलेली असते. आपल्याला इतकं शिकवण्यांत आईबापांची दिशाभूल झालेली आहे हें त्यांना कळतं; पण बोलणार कोणत्या तोंडानं ? तोंड दाबून बुक्क्याचा मार म्हणून म्हणतात तो हा प्रकार. लग्न करणार नाहीं या धमक्या वयाच्या चोवीस वर्षांपर्यंत ठीक असतात. पण आतां जिवाला आंच लागते. आपल्या इतर मैत्रिणी इंटर, प्रीव्हिअस होऊन संसारकर्त्या झालेल्या आहेत, हें पाहून

त्यांना स्वतःचा मनस्वी संताप येतो. निसर्गाला दडपून किती दिवस ठेवणार? इतके दिवस पुढं ठेवायला कांहीं तरी एक विशिष्ट ध्येय होतं. पण ध्येयाची पूर्तता झाल्यावर 'पुढं काय?' हा प्रश्न 'आ' वासून उभा रहातो. ध्येयपूर्तता झाल्यामुळं रिकामं बनलेलं मन पुन्हां निसर्गाकडे खेंचलं जातं. पण आतां अवसानाबाहेर उडी घेतलेली असल्यामुळं मागें जातां येत नाहीं आणि पुढचा मार्ग दिसत नाहीं. लग्न होण्याची आशा बहुतेक वठलेली असते. तूं आपल्या बाजूनं विचार कर. बी. ए. मुलीशीं मी प्राण गेला तरी लग्नाला तयार होणार नाहीं."

"आणि तीहि पण प्राण गेला तरी तुझ्याशीं लग्न लावायला तयार होणार नाहीं—" मी मध्येंच म्हणालों.

"पुन्हां चुकलास. झंझावातांत सांपडलेला एकटादुकटा जीव, ज्याप्रमाणं हरळीच्या मुळीलासुद्धां घट्ट पकडायला धांवतो त्याप्रमाणं या मुली पाहिजे त्याला—फक्त मवाली वगैरे जात सोडून—माळ घालायला तयार असतात. मी बोलतों आहें हें तुला खरं वाटणार नाहीं. कोणत्याहि शिकलेल्या मुलीला हें पटणार नाहीं. ती तुला खरं कधींहि सांगणार नाहीं. स्वतःची नालायकी तोंडानं कोण कबूल करील? पण हें सत्य आहे, हें सूक्ष्म विचार करणाराला लागलींच दिसून येईल. निसर्गाच्या नियमानुसार वाटणारं अपत्यप्रेम दडपून टाकणं सोपं नाहीं. शेजाऱ्यांच्या शेंबड्यालेंबड्या मुलांना, कुठं बोंडल्यानं दूध पाज, कुठं त्यांचं कोडकौतुक कर हे प्रकार प्रत्यहीं दृष्टीस पडतात. आयुष्य म्हणजे एक शिक्षा आहे असं वाटूं लागतं. कुठं नवराबायकोचं जोडपं रस्त्यांतून हातांत हात अडकवून चाललेलं पाहिलं कीं मनाला विषाद वाटूं लागतो. नवराबायकोचा प्रेमसंवाद कानीं पडला कीं 'नको हा जीव' असं होऊन जातं." साठ्याची बडबड थांबण्याचें चिन्ह दिसेना.

"मग असं जर आहे तर लग्न करून मोकळं व्हावं—" मी म्हणालों.

"यंव रे पठ्ठे! काय बोललास पण माझ्या राजा! तूं एक गोष्ट विसरतो आहे. 'माझं लग्न करा हो' म्हणून उघडपणानं दुसऱ्याच्याजवळ याचना करण्याइतकी मनुष्यजात निर्लज्ज झाली नाहीं, हें तूं लक्षांत घे.

कसं बोलणार ! काय सांगणार ? या बाबतींत जी प्रथम विभागांतल्या मुलीची स्थिति तीच ह्या बी. ए. बाईची ! हा दोष मुलींचा नाहीं— हा दोष वडील माणसांचा नाहीं—"

"समाजाचा कां ? वाटेल त्यानं समाजावर कोरडे ओढावेत !" मी हंसून म्हणालों.

"छेः ! समाजाचा यांत कांहींच दोष नाहीं. आपण होऊनच निर्माण केलेल्या परिस्थितीचा हा दोष आहे. केव्हां परिस्थिति सुधारेल हें आज सांगतां येणार नाहीं. पण सुधारेल; सुधारेल यांत शंका नाहीं. परिस्थतीचा दोष पहा कसा तो—मुलींना आपण शिकवतों; म्हणजे त्यांना वाईट म्हणा, चांगलं म्हणा विचार करण्याचं साधन मिळवून देतों. न शिक-लेल्या मुलींना विचार करतां येतात, नाहीं असं नाहीं. पण विचार दड-पून टाकण्याचं त्यांच्या अंगवळणीं पडलेलं असतं. शिकलेल्या मुलींना आपले विचार व्यक्त करण्याचा मोह अनिवार होतो. त्यांना ती दडप-शाही अन्यायाची वाटते. पण मुलींना आपण शिक्षण ज्याप्रमाणं देतों त्या प्रमाणांत स्वातंत्र्य देत नाहीं. आपली मुलगी रात्रीं थोडासा उशीर करून आली कीं तात्काळ त्या उशिराचं कारण आपण विचारतों. तें कारण विचारूं नये असं माझं म्हणणं नाहीं. पण कारण विचारण्याचं कारण काय असतं ? स्वतःच्या मुलीवर इतका विश्वास नाहीं ? चारदोन मुली बहकल्या कीं साऱ्या मुली तशाच निघतील असं समजण्याचं कारणच मला मुळीं दिसत नाहीं.—मुलींचीं आपण लग्नं लावून देतों. त्यां-ना कधीं तरी विचारतों का ? We take their consent for granted. 'हा नवरा मला नको' असं उघडपणानं मुली कशा सांगतील ? मुलांमध्यें मिसळण्याची बंदी असल्यामुळं अनुरूप पतीची निवड करणं त्यांना शक्यच नसतं. अगदीं कालची गोष्ट. टेनिस-कोर्टावर स्त्रीपुरुषांनीं एकत्र खेळावं कीं नाहीं हा वाद चालला होता. आपल्या कॉलेजांतील एकां स्त्रीदाक्षिण्यप्रेमी प्रोफेसरनीं सरळ उत्तर केलं कीं, बाहेर कांहींहि प्रकार होत असले तरी या कॉलेजांत मी तसं करावं असं मुळींच म्हणणार नाहीं. सदू, विचार कर. कां ? असा निर्बंध कां ? भर दिवसाढवळ्या

आमच्याबरोबर खेळणाऱ्या मुलींशीं आम्ही अतिप्रसंग करूं हें त्यांना संभवनीय वाटलं तरी कसं ? आम्हांलाहि कांहीं लाजलज्जा परमेश्वरानं दिली आहे !"

"पण प्रेमाच्या राज्यांत लाज वाटण्याइतकी लाज असेल तर ना ?" मी म्हणालों.

"तरी पण स्थलकाल पहाण्याइतकी अक्कल असते. सहशिक्षणाची ग्वाही फिरवायची अन् हे असले लपंडाव कशाला ? यामुळं होतं काय, कीं जो प्रकार आपण टाळायला पहातों तो हटकून घडतो. कृत्रिम बंधनं निर्माण करून नदीचा ओघ अडवूं म्हटलं तर बंधारे तोडून वाहण्याची नदीची प्रवृत्ति दिसून येते. जगांतल्या निम्या पापांचीं कारणं ह्या कृत्रिम बंधनांत उगम पावतात. मुली चरफडतात—संतापतात—गप्प बसतात. करणार काय ? त्यांचं ह्या बाबतींत कोणीहि चालू देत नाहीं. शिक्षणानं मोकळं वागावंसं वाटूं लागतं; पण ज्यांनीं शिक्षण देण्याची तयारी केली तेच असलीं कृत्रिम बंधनं तयार करतात. अशामुळं मनाला खात रहाण्यांची दुष्ट संवय जडते. आपल्या महाराष्ट्रांत पुरुषांचा द्वेष करणाऱ्या ज्या स्त्रिया दिसून येतात त्याला कारण आपण—आपले शिक्षणक्रम—आणि आपलीं कृत्रिम बंधनं ! मागच्या पिढींतील स्त्रीशिक्षणप्रेमी निघून गेले, पण आतां त्यांनीं करून ठेवलेला पसारा निस्तारणं या पिढीवर पडलं आहे. पण आतां तें काम बिकट आहे." साठे बोलतां बोलतां थांबला.

"हें चित्र तूं रेखाटलं आहेस त्यांत अतिशयोक्तीचा भाग नाहीं असं तुझं म्हणणं आहे ?" मीं विचारलें.

"मुद्दाम मीं अतिशयोक्ति केली आहे. भडक रंगांचा उपयोग केल्याविना त्या चित्राकडे सामान्य लोकांचं लक्ष वेधलं जात नाहीं. आणि आपण सामान्य लोकांना उद्देशून बोलतों आहोंत हें विसरतां कामा नये. मोठ्यांची गोष्ट अलाहिदा आहे. नाण्याच्या झंकारासरशीं जगांतलीं भुतं त्यांना वळवतां येतात. आपली तशी स्थिति नाहीं. मी स्त्रीदाक्षिण्याचा द्वेष करतों हें म्हणणं चुकीचं आहे. रस्त्यांत दिसली बाई कीं काठीनं

फोड तिचं टाळकं, हा शुद्ध रानटीपणा आहे. पण योग्य मार्ग दाखवायला कुणाची हरकत आहे?"

"मग तुझ्या मतानं काय करावं म्हणजे परिस्थिति सुधारेल? दोष दाखविणाराच्या अंगांत ते सुधारण्याची शक्ति असेल तर त्याच्या शब्दाला किंमत. एरवीं गांवांतले सगळेच लोक बडबडतात." मी म्हणालों.

"मी दाखवीन तो मार्ग—पण तो कुणालाहि पटणार नाहीं. एक तर कोणत्याहि मुलीनं अठरा वर्षांच्यावर अविवाहित राहूं नये ही माझी पहिली सूचना आहे. अठरा वर्षं ही किमान मर्यादा. त्यावर अविवाहित रहाणारी कुमारिका कायद्यानं धरून आणून विवाहाच्या होमापुढं ढकलावी. आतां प्रश्न येतो शिक्षणाचा. हल्लींचं शिक्षण मुळींच उपयोगी नाहीं. इंग्रजी शिकवायला कोणतीच हरकत नाहीं. भाषेनं आपलं घोडं मारलेलं नाहीं. कोणत्याहि भाषेवर आपण बहिष्कार टाकणार नाहीं. सुमारें ८ व्या वर्षापासून शिक्षणास आरंभ करावा. एकंदर दहा वर्षांत दाही दिशांचं ज्ञान होईल अशी माझी पक्की खातरी आहे. मराठी भाषेला पोषक होईल या बेतानं संस्कृतचा अभ्यास असावा. संस्कृतचा एरवीं संसारांत काडी-इतका फायदा नाहीं.—मुख्य व्यवस्था करायची ती पाकशास्त्राची—" म्हणून म्हणत तो थांबला.

"स्वयंपाकिणीचा धंदा शिकवायचा, असंच तुझं म्हणणं ना?" मी म्हणालों.

"अर्थाचा अनर्थ करूं नकोस. स्वयंपाक करण्यांत लाज कसली? मला माझ्या आईबापांनीं शिकवलं असतं तर मींसुद्धां मोठ्या खुशीनं स्वयंपाक केला असता. त्याच्यांत तर इतर खेळांपेक्षां प्रसंगावधान, कौशल्य, चपळाई इत्यादि गुण जास्त प्रामुख्यानं लागतात. वैलावर वरण, चुलीवर भाताचा कड, शेगडीवर भाजीचं साहित्य, पुढं भाकरीचं पीठ, पुढ्यांत सातमजली आवाजांत रडणारं कार्टं, अन् बाहेर उगींच इकडून तिकडे धांवणारे गबाळे पतिराज—इतक्या भानगडींकडे एकाच वेळीं लक्ष पुरवायचं—फारसं सोपं नाहीं हें काम. याला शतावधानी मनुष्य लागतो! पण तें जाऊं दे. तर ही असली शिक्षणपद्धति मुलींच्याकरितां आंखली पाहिजे.

पुण्यांत अशी एक संस्था आहे. त्यांना माझीं तत्त्वें पटलेलीं दिसतात— किंवा त्यांचीं तत्त्वें मला पटतात असंहि म्हटलं तरी चालेल—"

"दुसरंच जास्त सत्याला धरून आहे असं मला वाटतं—" मी हंसून म्हणालों.

"कसंहि म्हण. मुद्दा हा कीं, स्त्रियांनीं आपला धर्म सोडतां कामा नये. मनुष्याच्या पाशवी शक्तीला आपल्या सौन्दर्याच्या जोरावर पायबंद घालण्याचा स्त्रियांचा धर्म आहे. सौन्दर्याबरोबरच निसर्गानं त्यांच्याजवळ दुसरींहि अनेक शस्त्रास्त्रं देऊन ठेवलेलीं आहेत. मधुर वाणी हाहि एक अलंकार आहे. तुला मी स्पष्ट सांगतों—थांब; मनुष्यानं स्त्रियांशीं फटकून वागूं नये या कारणाकरितां स्त्रियांजवळ एक प्रकारची आकर्षक शक्ति असते. या शक्तीचा आणि सौन्दर्याचा फारसा संबंध नाहीं. उलट, तुला हें तत्त्व माहीतच आहे कीं, प्रेमाचं माणूस सुंदर नसलं तरी सुंदर भासतं. हें असं भासवायला लावणाऱ्या शक्तीला आकर्षक शक्ति म्हणून म्हणूं. ह्या शक्तीचा उपयोग त्या करूं शकतात. सहजच मागं वळून पहाणं, गालांतल्या गालांत स्मितहास्य करणं, पदराशीं खेळत बसणं इत्यादि गोष्टी अगदीं साध्या दिसत असल्या तरी त्या आकर्षक शक्तीमुळं त्यांना महत्त्व येतं. आपल्या हल्लींच्या शिक्षणपद्धतीमुळं या आकर्षक शक्तीचा नायनाट होईल अशी माझी पक्की खातरी. फटकून रहाणाऱ्या मुली दिवसेंदिवस वाढत आहेत हें समाजाच्या दृष्टीनं अनिष्ट आहे. ज्या गोष्टींकरितां स्त्रियांचा जन्म त्या गोष्टी करण्याचं त्या टाळतात, तर मग पुरुषांचं आणि स्त्रियांचं एके ठिकाणीं वास्तव्य अशक्य होऊन बसेल. म्हणजे कांहीं दिवसांनीं चार पेठा बायकांची वस्ती आणि चार पेठा पुरुषांची वस्ती असा प्रकार या पुण्यांत दिसूं लागेल. या प्रसंगाला तोंड देण्याची तुम्हां लोकांची तयारी असेल तर कांहींच हरकत नाहीं. चाललं आहे हें उत्तम आहे—"

"तुला आंग्ल संस्कृतींतले दोष दिसत नाहींत—?" मीं प्रश्न केला.

"छेः छेः! आंग्ल संस्कृति आपल्याकडे आणावी असं माझं मत नाहीं. फक्त जरूर तेवढी मोकळीक स्त्रियांना द्यावी, वर पालकांची नजर असावी,

असं माझं मत आहे. मात्र पालकांनीं आपली नजर आहे हें दर्शवितां कामा नये. अन् विलायती सुधारणा तुम्ही इतक्या तुच्छ कां मानतां रे? केवळ पत्रांचा खप वाढविण्याकरितां चार गटार–बातम्या प्रसिद्ध केल्या जातात, त्या जोरावर तुम्ही त्यांच्या संस्कृतीला नांवं ठेवणार! अन् तुमच्याकडे अशा गोष्टी घडत नाहींत? त्या कां प्रसिद्ध होत नाहींत? तूं माझं ऐक. कोणाचीहि झाली तरी संस्कृति पूर्णतावस्थेला जाणं शक्य नाहीं. बदलत्या काळाबरोबर दृष्टीहि बदलत असते. आंग्ल संस्कृति तुमच्या आमच्या संस्कृतीहून मुळींच हिणकस नाहीं. दडपशाही करून दाबून ठेवलेल्या जिवांचे उमाळे म्हणजे ह्या Sensational बातम्या. त्या त्यांच्याकडे आहेत तशा तुमच्याकडेसुद्धां आहेत—"

"आतां तूं स्त्रियांची ही कापाकापी केलीस त्याप्रमाणं पुरुषांची कत्तल मी उडवतों—" मींहि आवेशानें घसा साफ केला.

"नको—माझे आई!—हात जोडतों. तेवढं करूं नका. जगांतलं दुसरं कुठलंहि पाप चालेल, पण तेवढा उद्योग—" साठे हात जोडून म्हणाला.

"साठे, हा पक्षपात आहे निव्वळ. अन्याय आहे. जुलूम आहे! आतां मान डोलावलीस कीं आपला विचार बघ." मी म्हणालों.

"नाहीं—मी अशीच नकारार्थदर्शक मुंडी हालवत रहाणार. त्याला कारण आहे. स्वतः आपल्या दोषांची चर्चा कधींहि करूं नये. स्वतःचे दोष सुपाएवढाले असले तरी ते माशीच्या पंखाएवढे चिमुकले दिसतात. पुरुषांचे कान पिरगळायचं काम स्त्रियांनींच करावं.—बाकी तें त्यांना सांगायला लागत नाहीं म्हणा—" साठे मोठ्यानें हंसूं लागला.

"साठे, हे विचार तूं महाराष्ट्रांतल्या गृहिणींपुढं कां मांडीत नाहींस!" मी सहजच म्हणालों.

"सदू, अजून दगडफेंक सोसण्याइतकं माझं शरीर कणखर झालं नाहीं. असले विचार मी बोलायचा अवकाश, कीं सगळ्या मायमाउली स्वयंपाकगृहांतील नानाविध अस्त्रांच्या सहाय्यानं मला गांवाची वेस पहायला लावतील. हें अजून निर्भीडपणं चारचौघांत मांडण्याइतका वावदूकपणा

माझ्यांत नाहीं. माझ्या ह्या प्रामाणिक समजुती आहेत. आज जरी त्या कुणाला पटल्या नाहींत तरी एक काळ असा येईल—असा काळ लवकरच येईल—कीं त्या वेळेला साठे नांवाच्या मुलाचीं मतं सगळ्यांना ग्राह्य वाटूं लागतील ! मला आशा आहे, आशा आहे......."

मीं त्याला गाशा गुंडाळण्यास सांगितलें. 'आतां घरीं जा बाबा' म्हणून मी त्याला घेऊन दुकानाबाहेर पडलों. साऱ्या रस्त्यानें पुन्हां त्यानें आपले विभाग स्पष्टपणें मांडून दाखविले. त्याच्या शरीराचे विभाग करण्याची मला अनिवार इच्छा झाली.—

अशाच एका मुलाखतीच्या प्रसंगीं मीं साठ्याला राजकारणांत पडण्याविषयीं सुचविलें.

"आमच्या सोलापूरच्या वातावरणांत राजकारणाचें बीं रुजत नाहीं. सोलापूरचं काम म्हणजे अखिल महाराष्ट्राला साडीचोळी आणि धोतरबंडी पुरवण्याचं आहे. आमचं गांव माती–विटांनीं बांधलेल्या चिमण्यांचं आहे. त्या चिमण्यांच्या खालच्या बाजूस राष्ट्राला अत्यावश्यक अशी वस्तु तयार करण्याचं आम्ही कंकण बांधलं आहे. हेंच आमचं राजकारण. निदान आम्ही, मुंगीच्या पावलानं का होईना पण, चालण्याचं कार्य सुरू केलं आहे. तुम्ही काय करतां ? महाराष्ट्राला मेंदू पुरवतां पुरवतां हल्लीं तुमच्याजवळ संग्रहीं कांहीं शिल्लक नाहीं. आतां तुम्हांला कुणी तरी मेंदू पुरविण्याचं पाहिलं पाहिजे. वायफळ बडबड हें तुमचं भांडवल. या नेटावर तुमचं राजकारण चालू आहे. पुण्यांत परवां जोगीश्वरीपाशीं एक देशभक्त व्याख्यान देत होते. 'अखिल भारतवर्षांत गृहिणी, देवता प्रभातसमयीं काय करतात ?' म्हणून ते जमलेल्या टोळभैरवांना विचारीत होते. एका कार्ट्यानं असं कांहीं नमुनेदार उत्तर दिलं आहे म्हणून सांगू ? मीं कानांत बोटंच घातलीं. आतां हा खुळ्यासारखा प्रश्न विचारणारा शहाणा, का जिभेचा कंडू शमवून घेणारा शहाणा ? सकाळीं उठून गृहिणी काय करतात, हा काय प्रश्न आहे ? सांगायचं कारण कीं, हें असं तुमचं राजकारण चालू आहे. राजकारणाकरतां एके काळीं प्रसिद्धीस आलेलं पुणं आज असल्या देशभक्तांनीं भरलं आहे—"

" हा तुझा प्रान्तिक अभिमान आहे." मी जरा कुर्यानें म्हणालों.

" सोलापुराविषयीं तरी माझं काय मत आहे ? फरक ऐवढाच कीं, सोलापूरला अजून पेठेवारी देशभक्त जमा होऊं लागलेले नाहींत. गिरणीच्या भुंग्यासरशीं धडपडून उठणारा मजूर, अस्तुरींच्या हातांतली चटणी-भाकर घेऊन धांवत जाणारा मजूर, व्याख्यान देण्याला उभा रहात नाहीं कीं ऐकायला उभा रहात नाहीं. "

" कांहींहि म्हण, तुझ्यासारख्या जहाल मताच्या मुलानं राजकारणांत भाग घेतलाच पाहिजे. " मी म्हणालों.

" त्याला अडचणी पुष्कळ आहेत. पहिली अडचण ही कीं, आपल्या देशांत व्यक्तिमाहात्म्य अगदीं कळसाला जाऊन पोहोंचलेलं आहे. एके काळीं राजाला विष्णूचा अंश समजणारी खुळी जनता आज पुढाऱ्याला विष्णूचा अंश समजूं लागली आहे ! या अंध श्रद्धेचे परिणाम फार विलक्षण आहेत. समज, तूं पुढारी आहेस. तूं कांहीं तरी एक विशिष्ट मार्ग आंखलास. आतां मी एक शंकेखोर सामान्य जीव आहे. लोक तुझं ऐकतील हें निर्विवाद आहे. येथपर्यंत ठीक आहे. पण लोक एवढ्यावरच न थांबतां भावनेच्या भरांत मला तुझं म्हणणं अट्टाहासानं कबूल करायला लावतात. हा जुलूम आहे. तूं कितीहि मोठा पुरुष असलास तरी माझ्या व्यक्तिशः प्रामाणिक मतांना कांहींच किंमत नाहीं ? आणि मोठ्या पुरुषाच्या हातून चुका घडतच नाहींत असा तुझा आग्रह आहे ? "

" पण साठे—तुला गोडीनं सांगून पाहिलं, तरी तूं ऐकलं नाहींस—तर सार्वजनिक हिताकरतां म्हणून तुला धाकानं तें आम्ही करायला लावणारच. सर्वत्रांची स्थिति तीच तुझी. तूं कोण एवढा मोठा लागून राहिलास ?" मी म्हणालों.

" जुलमानं मनं वळतात, हा तुझा नवीन शोध वाटतं ? स्वराज्य सुखाकरतां मिळवायचं हें तर तुला कबूल आहे ना ? जिवाला स्वस्थता मिळावी, अन्यायापासून संरक्षण व्हावं, परकीयांपासून उपसर्ग पोहोंचूं नये इत्यादि सुखसोयींसाठींच स्वराज्याची आशा ना ? तें साध्य करण्याचे तुमचे आणि माझे मार्ग भिन्न असूं शकतील. त्याला काय करणार ? मी तुमच्या

मताला मिळत नाहीं, एवढ्या कारणावरून तुम्ही माझ्या अंगावर हात टाकणार ? ज्या राज्यांत प्रामाणिक मतं बनविणं म्हणजे मार खायला तयार होणं तें राज्य स्वराज्याच्या कल्पनेशीं कितपत सुसंवादी आहे ? ”

“ मग तूं पुढारी होऊन आपला मार्ग लोकांना समजावून सांग—” मी म्हणालों.

“मी पुढारी होऊं ? वेड्या, सगळेच पुढारी कसे होणार ? पुढारीपण जरी पुष्कळ अंशीं कर्तबगारीवर मिळत असलं तरी त्याला अनुकूल परिस्थिति थोडी तरी लागतेच. हल्लीं आहेत त्या पुढाऱ्यांशीं टक्कर खेळणं म्हणजे हिमालयाला डोक्यानं मार्ग रेटण्यासारखं आहे. त्यांचा शब्द वेदवाक्य असल्याकारणानं माझ्या शब्दांना कोण विचारणार ? अलोट देशभक्ति हा गुण पुढाऱ्यांमध्यें असावा लागतो. पण तो गुण तुझ्यामाझ्यांतहि आहे. स्वयंसेवक म्हणून पुढें होणाऱ्या प्रत्येकाच्या हृदयांत देशभक्तीची ज्योत पेटलेली आहे. पण त्यांना का पुढारी होतां येत नाहीं ?—छे ! तें शक्य नाहीं. राजकारण हा प्रान्त आपला नव्हे. लोकांच्या मार्गांत आडवं येण्याची माझी इच्छा नसल्यामुळं त्यांना मी तो मार्ग अगदीं मोकळा ठेवला आहे. विष्णु नरहर साठे—No politics—माझ्या म्हणण्याचा तुला अर्थ समजावून घेणं असेल तर जरा वर्तमानपत्रं वाचण्याचे श्रम घेत चल. कौन्सिलांत जाऊन अडवणुकीचा मार्ग चोखाळणारे आज त्या बाबतींत अगदींच उदासीन आहेत. म्हणजे त्यांच्यावर जो आम्ही विश्वास टाकला होता त्या विश्वासाला हा केवढा धक्का बसला ? कांहीं नाहीं तरी वाळलेल्या पानावरचा आपला अधिकार सरकारकडून हे कबूल करून घेतील ही आमची कल्पना. आज ते लोक घरीं बसले आहेत. बाहेरचं राजकारण तितकंच घोंटाळ्याचं आहे. राजकीय चळवळींना धार्मिक मोहिमांचं स्वरूप येऊं लागलं आहे. कोणत्याहि गोष्टींत परमेश्वराचं अधिष्ठान पाहिजे या शिकवणुकीचा आतां तर अतिरेक होऊं लागला आहे. विचारवंतांची अक्कल गुंग होऊन जाते. पुढलीं वर्षं याच घोंटाळ्यांत जाणार. कांहीं तरी एक अस्तिपक्षीं किंवा नास्तिपक्षीं निकाल लागे तोंपर्यंत आपल्याला सुखाची झोंप विसरणं प्राप्त आहे. या बजबजपुरीमध्यें आपलं

पाप नको या विचारानं मी राजकारणांत शिरलों नाहीं. त्याकरतां दंड म्हणून या देशाच्या बाहेर जायला सांगितलंस तरी मी गाशा गुंडाळून चालता होईन. राजकारण म्हणजे ऐहिक स्वास्थ्याकरतां धडपड. मी त्या पलीकडचा मनुष्य आहें. कुणाला कधींहि न पटणारं असं माझं तत्त्वज्ञान आहे. पण माझा पुढच्या पिढीवर विश्वास आहे. त्यांना माझीं मतं पटतील कदाचित्—पण तो पल्ला दूर आहे—"

" साठे, तुझीं राजकारणाविषयींचीं मतं पुन्हा कोणाजवळ बोलूं नकोस. फुकट मार खाशील." मी हंसून म्हणालों.

दुकानाखालीं उडी टाकून तो हंसत हंसत म्हणाला, " आजपासून तो विषय परस्त्रीप्रमाणं मानून मी त्याकडे ढुंकूनसुद्धां पहाण्याचा धीर करणार नाहीं."

---

# प्रकरण १८ वें

---

## शकुन्तलाख्यान

टर्मच्या अखेरीस आमच्या कॉलेजांत अपूर्व उत्साह दिसून येऊं लागला.

### अंक १ ला ( प्रवेश १ ला )

[ स्थळः—कुठलीहि चौकांतली जागा; कोंपऱ्यावर कचऱ्याची पेटी आहे. आनंद पोटांत मावेनासा झाला म्हणजे ज्याप्रमाणें आपण शब्दांच्या द्वारें त्याला वाट करून देतों तद्वतच ह्या पेटीनेंहि कचरा बाहेर ढकलून देण्याचें कार्य चालू केलें आहे. पेटीचा रक्षक या नात्यानें एक म्हातारडें कुत्रें शेजारींच निजलेलें आहे. जगाचा त्याला कंटाळा आलेला आहे. मनुष्याचा त्याला अतोनात तिरस्कार आहे. 'या जन्मीं मला इकडून तिक-

ऊन थपडा मारतां काय? बरं आहे. पुढल्या जन्मीं राजाचा जन्म घेईन अन् मग घेईन तुमचा समाचार ' या मोहक कल्पनेंत त्याची तंद्री लागली आहे. ह्या जन्मांतलें त्याचें कार्य बहुतेक संपलेलें आहे. पण दरबारचा खलिता येईपर्यंत आणि यमाच्या दूतांना येथपर्यंत येण्याचे श्रम दिल्याशिवाय सुखासुखीं आपण होऊन वर जायचें नाहीं हा त्याचा निश्चय दिसतो आहे. याला म्हणावें स्वाभिमान. चौकांत येणाराजाणारांच्या गैरसोयीकडे बिलकूल लक्ष न देतां आपल्याच बोलण्यांत गर्क असलेले चारपांच विद्यार्थी मोठमोठ्यानें कांहीं तरी बडबडत आहेत. प्रत्येकाच्या हाताशीं एक एक दुचाकी पण आहे.]

१ लाः—( मोठ्यानें ) हाण टाळी ! [ ' चल घे ' म्हणून त्याला आठवडाभर आठवण राहील अशी टाळी देतो. ]

२ राः—[ हातांतल्या मळक्या कागदाकडे पहात, ] एकंदर मतं १७५. पैकीं ७० सॉलीड, ५० देतों म्हणून Promise करीत आहेत अन् सुमारें चाळीसएक अजून गटवायचे आहेत. अरे, तूं बिलकूल मागं घेऊं नकोस. सगळ्यांना असं दाबून ठेवतों मी कीं नाहीं? मताच्या वेळेला एक एक गंप्या पेन्सिल तोंडांत घालून उभा ! [ ' काय पुरुषार्थ आहे ! ' अशा मुद्रेनें बाकीचे त्याच्याकडे पाहूं लागतात. ] अरे, आज चार दिवस मला झोंप नाहीं. अभ्यासाला शिवलों असेल तर ह्या जानव्याची शपथ. [ म्हणून आधार देण्याकरितां गळ्यांतली माळ हुडकूं लागतो. ' जाऊं दे रे. घरीं राहिलं असेल ' म्हणून म्हणत बाकीचे त्याचा शब्द हाच पुरावा असें दर्शवितात.]

३ राः—पण तूं त्या सान्याला विचारलंस का? प्रत्येकाच्या पायां पडतां पडतां जीव गेलेला पुरवला असं मला वाटूं लागलं आहे. Father ला घरीं राहून ह्या अडचणी कशा कळणार? त्यांचीं पत्रावर पत्रं येत आहेत. कसा अभ्यास होणार? [सगळेजण ' खरंच कसा होणार? ' म्हणून पुटपुटतात.]

४ थाः—तुला पत्रं तरी येत आहेत. पण मला तर तेंहि सौख्य नाहीं. मे महिन्याची सुट्टी संपली कीं आमचे पितृराज सरळ सांगतात कीं

‘ तूं दिवाळींत घरीं नाहीं आलास तरी चालेल, पण सुट्टींत पुण्यांत राहून अभ्यास कर—’ हाच आमचा या जन्मींचा ऋणानुबंध. माझी गाडी एकदां स्टेशनांतून बाहेर पडली कीं वडील माझं अस्तित्व विसरून जातात. दर महिन्याला धांवत्या पोस्टमनकडे मोठ्या आशेनं पहावं तरी देवाला माझी करुणा येत नाहीं. लागोपाठ चार पत्रं धाडावींत तेव्हां कुठं आमच्या वडिलांना माझ्या अस्तित्वाची जाणीव पटूं लागते. काय जग आहे ! [इतर, काय जग आहे तें पहाण्याकरितां आसपास पाहूं लागतात.]

२ राः—ती तुझी रडकथा जाऊं दे. तुझ्या ताब्यांत क्रिकेट आहे. वर्षाला इतकी रक्कम तुला काय करायची आहे रे ? सगळा चोरांचा बाजार—

४ थाः—[रागानें] वा ! चेंडूची किंमत अकरा रुपये आहे. गन अँड मूरला कमींतकमी तीस रुपये पडतात. खर्च भागावा कसा ! आहेत तेच पुरे पडत नाहींत—

२ राः—हें बघ, हें अवसान तिसऱ्याच्या पुढं चालेल. अरे काय सांगतोस ? जसं कांहीं आम्ही आजच या कॉलेजांत पाऊल टाकतों आहोंत—चल [बाकीचे त्याला चालण्याकरितां पाठीमागून ढकलतात. ]

---

## अंक १ ला ( प्रवेश २ रा )

[ स्थळः—चहापानगृह. दोनचार पुढारी आपापसांत खल करीत आहेत. ]

१ लाः—मी काय करणार ? त्यानं मतं फोडायला सुरुवात केली तेव्हां मी काय करणार ?

२ राः—[त्याला वेडावून] मी काय करणार ? तूं काय बांगड्या भरल्या आहेस का हातांत ? तूं त्यांचीं मतं फोड—

[ इतक्यांत एक साधा भोळा मुलगा आंत प्रवेश करतो. हे आपली तयारी करतात.]

१ लाः—[ नूतन प्रवेश करणाऱ्या विद्यार्थ्यास ] हें पहा—मी उभा राहिलों आहें. [हात जोडून] यंदांचें आपलें वार्षिक संमेलन दरवर्षींच्यापेक्षां

जास्त धडाडीनं पार पडावं. या स्तुत्य हेतूमुळं मी चार स्नेह्यासोबत्यांच्या सूचनेस मान देऊन ह्या जागेकरतां उभा राहिलों. तुमचें मत मलाच—

नवीन गृहस्थः—अहो, पण उभे आहांत हें उभा राहून कशाला सांगतां ? तें बसून सांगितलं तरी चालेल. अन् माझा सल्ला तुम्हांला ऐकायचा असेल तर, तुम्ही चार लोकांच्या शब्दावर विश्वास टाकूं नये हेंच बरं. अहो, दिलेली शिदोरी आणि शिकवलेली बुद्धि का कुठं कुणाला जन्मभर पुरली आहे ? स्नेह्यासोबत्यांवर कधींहि विश्वास टाकूं नये. मित्र म्हणजे एक नाहीं कामाचा अन् 'गांव मामाचा' अशी स्थिति आहे. पहा बुवा, मला जें काय वाटलं तें मीं तुम्हाला सांगितलं. ज्याचं त्यानं आपलं पहावं.

[बाकीचे खालीं माना घालून हा उपदेश ऐकून घेतात. दोरी म्हणून समजावें अन् सापाचें शेंपूट बाहेर यावें असला प्रकार झाला होता. पण करतां काय ? सुसरीबाई तुझी पाठ मऊ—]

१ लाः—तुमचं म्हणणं बरोबर आहे. स्नेह्यासोबत्यांनीं जगामध्यें काय काय अनर्थ माजवले आहेत ते मला ऐकून ठाऊक आहेत. आतां मी स्वतःच—कुणाच्याहि सांगण्यावरून नाहीं—उभा राहिलों आहें—

नवीन गृहस्थः—आधीं चहा पितो अन् बघेन मग. पण तुम्ही खालीं बसा कीं—ए पोरा—एक चहा—

१ लाः—ए पोरा, एक चहा अन् दोन बिस्किटं आण पाहूं—['तुम्ही नको'चा गोंधळ माजतो.]

नवीन गृहस्थः—भारीच तुम्ही आग्रही दिसतां बुवा ! [चहाचा घुटका घेत] तसं म्हटलं तर तुमचा माझा मुळींच परिचय नाहीं. तुम्ही कोण, कुठं असतां, मला कांहीं माहित नाहीं—

१ लाः—[विनयानें] अहो, प्रसंगानं ओळखी होत असतात. उगीच कोण कुणाशीं बोलतो ?

नवीन गृहस्थः—बरं, पण मला तुमचीं qualifications नको का कळायला ? हा मताचा प्रश्न आहे म्हणून म्हणतों !

२ राः—[घाईनें] qualifications पुष्कळ आहेत हो त्यांच्याजवळ. Body-beautiful आहेत ते.

नवीन गृहस्थः—[आश्चर्यानें] अस्सं, अरे वा:! कांहीं बक्षीस वगैरे—?

१ लाः—तसं बक्षीस कांहीं अजून मिळालं नाहीं. पण पुढल्या वर्षी त्या चढाओढींत मी भाग घेणार म्हणतों.

नवीन गृहस्थः—बरं, बरं. कांहीं हरकत नाहीं. जयापजयाची परवा न करतां 'युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि.' कांहीं हरकत नाहीं. आणखी कांहीं आजपर्यंत मिळवलेलीं अशीं शिफारसपत्रं? तुम्ही कॉलेजांत आहांत तेव्हां मॅट्रिक झालां असालच—नाहीं नाहीं, रागावूं नका हं. मॅट्रिक झाल्याशिवाय नांव दाखल करणारीं कॉलेजं आहेत म्हणून म्हणालों. पण तीं शिंप्याचीं, वाण्याचीं, बोहऱ्याचीं अशीं आहेत. बरं, मी जातों आतां. तुमचा बराच वेळ घेतला. मला घरीं गेलंच पाहिजे.

१ लाः—[आशेनें] पण तेवढं मताचं विसरूं नका हं. I depend on you, हं!

नवीन गृहस्थः—[बाहेरूनच] पण मला ऑफीसला त्या दिवशीं सुट्टी आहे कीं नाहीं हें पाहिलं पाहिजे. [बाकीचे 'म्हणजे?' म्हणून ओरडतात.] मी तुमच्या कॉलेजांत किती तरी दिवस नाहीं. मी हल्लीं शिक्षणाचा नाद सोडला असून नोकरपेशा पत्करला आहे. बरं आहे, आज सुट्टी होती म्हणून आपली गांठ पडली. प्रसंगानं मनुष्याच्या ओळखी होतात. उगीच कोण कुणाशीं बोलायला जाणार? अच्छा! [निघून जातो. इतर लोक एकमेकाकडे पहातात.]

१ लाः—[खेदानें] जगांत हल्लीं प्रामाणिकपणा कसा तो राहिलाच नाहीं. वैताग येतो अगदीं जिवाचा—

२ राः—[त्याला शांत करण्याकरितां] एवढं संमेलन पार पडूं दे, मग पाहिजे तर वैतागामुळं जिवाचा त्याग केलास तरी चालेल. आपल्याजवळ माणसांची तूट आहे, त्यांत आणखी ही भर नको. तुझ्याएवढा मुलगा तयार करूं म्हटलं तरी अजून वीसएकवीस वर्षं वाट पहावी लागेल. जाऊं दे रे, जगांत लुच्चेगिरी आहे म्हणून सच्चेपणाला मान आहे–'सततं कार्यं कर्म समाचार' हा शिकवणूक डोळ्यांपुढं ठेवली पाहिजे.

[इतक्यांत एक मावळभटी थाटाचा विद्यार्थी धोतराच्या सोग्यानें घाम पुशीत ( घर्मबिंदु निवारीत ) प्रवेश करतो. हे सावध होतात.]

१ लाः—[हात जोडून] आपण या कॉलेजांतच असतां का ?

विद्यार्थीः—[ आश्चर्यानें ] छेः ! माझा घरचा पत्ता रास्तापेठेंत आहे. मी फक्त शिकण्यापुरतां या कॉलेजांत येतों.

१ लाः—तसं माझं म्हणणं नाहीं. पण इतक्यांतच आम्हांला थोडासा कटु अनुभव आला म्हणून आपणांला असं विचारणं भाग पडलं. आपण या कॉलेजांत नांव घातलं आहे हें नक्की ना पण ?

विद्यार्थीः—[ रागानें ] काय तऱ्हेवाईक आहांत हो ? एक एक प्रश्न किती वेळां तुम्ही मला विचारणार ? मी काय बहिरा वगैरे आहें अशी तर तुमची समजूत नाहीं ? हा काय चावटपणा ?

१ लाः—[ उघड उघड अपमान गिळून ] तुम्हांला आतां सांगितलं ना, कीं आम्हांला कटु अनुभव आला असल्यामुळं—

विद्यार्थीः—[ धोतराच्या सोग्यानें विजेच्या पंख्याचें काम भागवीत ] हूंः ! fiddlesticks-! रबिश !

१ लाः—[ चिकाटी दांडगी पोराची ! ] रागावूं नका. आम्हांला कटु अनुभव—[जीभ चावून] ए पोरा, एक चहा अन् दोन बिस्किटं आण पाहूं—

विद्यार्थीः—[ रागानें ] हें तुम्ही माजवलेंत काय ? मला तुम्ही चहा प्यायला लावणार कीं काय ? काय म्हणून ?

२ राः—तुम्ही जरा शान्तपणानें आमचं ऐकून घ्या. मित्रत्वाची एक खूण म्हणून चहा मागवला आहे.

विद्यार्थीः—अरेच्या ! पण मी तुमचा मित्र कुठं आहे ? साऱ्या जन्मांत मी तुम्हांला आज प्रथम पहातों आहे. हें काय ?

२ राः—पण आजपर्यंत पाहिलं नसलं म्हणून नवीन ओळखी पाडूं नयेत असा कुठं कायदा आहे ?

विद्यार्थीः—अहो, पण तुम्ही माझ्यावर हा जुलूम चालवला आहेत त्याची काय वाट ? मी चहा घेत नसतों. चहा सोडल्याला आज मला

उर्णीपुरीं चार वर्षें झालीं. [ काय त्रास आहे ? अशा मुद्रेनें १ला दूध आणायला सांगतो.] बरं पण तुम्हांला काय पाहिजे आहे ?

१ लाः—मी संमेलनाला उभा राहिलों आहें; निवडणुकीकरितां मला तुमच्या मताची गरज आहे ?

विद्यार्थी—[दुधाचा घुटका]अस्सं ! You are a candidate then ? [ जसें कांहीं या वाक्याला मराठींत प्रतिवाक्यच नाहीं ! ] तर तुम्ही या जागेकरितां उभे आहांत. ठीक, ठीक. छान, वाहवाः ! [ मान डोलावतो ] पण काय हो, ह्या जागेकरितां तुम्ही उभे आहांत त्याप्रमाणं मी कां उभा राहूं नये ? [१ ला थक्क होतो. पण वेळींच सांवरून घेऊन हा दुष्ट विचार त्याच्या डोक्यांतून काढण्याकरितां तयारी करतो. ] श्री काय म्हणतों तें आलं का लक्षांत. मी म्हणतों, Why should I not stand as you do ? अं ?

१ लाः—फार त्रासाचं काम असतं हो तें. तुम्ही त्या भानगडींत पडूं नका. तुम्ही पडाल, तुम्हांला एक मत मिळणार नाहीं. [अवसानांत येऊन] तुम्ही रहा तर खरे उभे ! पहातों कसे उभे रहातां ते.

विद्यार्थीः—[ रागानें उठतो ] मला शिव्या देतां ? तुम्ही काय समजलां आहांत ? परकर नेसलेली पोर तुमच्यापुढं उभी आहे असं तुम्ही समजतां काय ? बस्स झाला तुमचा संबंध ! [म्हणून निघून जातो.]

२ राः—( उठून ) चला आतां. मनुष्यस्वभावाची जों जों परीक्षा पहावी तों तों नाठाळ गाईप्रमाणं ते आपल्यालाच लाथा मारायला धांवतात. चल रे बाबा, आणखी उगाच चारदोन आणे खर्च मात्र व्हायचे. चल–पैसा मिळवायला कोण खटपटी लटपटी कराव्या लागतात तें सांगून समजणार नाहीं.

३ राः—( उठून ) कितीं बिलें जुळतीं करावीं लागतात हें तिसऱ्याला सांगून उपयोग काय ? [ सगळे जातात. ]

## अंक १ ला ( प्रवेश ३ रा )

[ स्थळः—स्त्रियांकरितां खास राखून ठेवलेलें कॉलेजांतील एक दालन. बाहेर बंधुराजांचा धुमधडाका अन् आंतल्या बाजूस भागिनीसाहेबांचा तडाखा ! ]

१ लीः—-यमू, अग तुझा अंबाडा सुटला. कशी लोळती आहेस डुकरासारखी—ऊठ.

यमूः—शकू, तुला मत देण्याचं मीं कबूल केलं तर माझा अंबाडा बांधशील ? बघ—विचार कर. तोंपर्यंत मी तशीच बसतें.

शकुन्तलाः—पगार देऊन ठेवलं नाहींस मला ! म्हणे अंबाडा बांधशील का ? तुझे हात मोडले आहेत का ?

यमूः—शकू, निवडणुकीकरितां उभं रहाणाऱ्यानं असं अद्वातद्वा बोलणं चांगलं नाहीं. तुला कधीं व्यवहार कळणार देव जाणे ! सदा आपला धसमुसळी खाक्या. लहान आहेस नाहीं आतां अगदीं ? आ ऽऽऽ हा हा ! काय नाक उडवते !

शकुन्तलाः—-माझ्या नाकावर माझी सत्ता नाहीं कीं काय ? तुझं तर नाक मी धरायला आलें नाहीं ना ?

यमूः—(आळसानें जांभई देऊन) तूं काय माझं नाक धरणार, म्हणा ?

शकुन्तलाः—-मी नाहीं माझा भाऊ धरणार आहे. कशी आमच्या घरांत येतेस ती पहातें. नाक मुठींत धरायला लावीन तरच नांवाची करवली !

यमूः—( लाजून ) बोलूं नकोस हं इथं कुणाजवळ. तुला एक मत देण्याचं तेवढ्याकरितां मी कबूल केलं आहे.

[ इतक्यांत एकजण हातांत पुस्तकांचा भारा घेऊन लगबगीनें आंत येते ]

नवीन मुलगीः—इश्श ! तुम्हांला तास वगैरे कांहीं नाहीं का ? शिळोप्याच्या गप्पा मारायला लाज नाहीं वाटत ?

शकुन्तला व यमूः—( तिच्या हाताला झोंबून पुस्तकें खालीं पाडतात.) आम्हांला तूं Support करणार कीं नाहीं ? आम्हांला तुझं एक मत पाहिजे. देशील कीं नाहीं, सांग.

नवीन मुलगीः—( संतापानें ) नाहीं–नाहीं–नाहीं–. I won't–won't, झालं ? तुम्ही नेहमीं माझ्याशीं अशी धिंगामस्ती करतां, मी तुमच्या बाजूला कधींच येणार नाहीं. जगांतली सारी स्त्रीजात खालसा झाली आणि तुम्हीच काय त्या उरलांत तरीदेखील मी तुमच्यावर विश्वास ठेवणार नाहीं. तुम्ही शुद्ध कैदाशिणी आहांत—माझ्याशीं तुम्ही मुळींसुद्धां अंगझटीला येत जाऊं नका—!

शकुन्तलाः—[तिच्या पाठीवर हात टाकून] अगबाई! वन्सं रागावल्या बरं का? असं काय पण रागवायचं ते गडे? ( लाडीकपणानें तिच्या कानांशीं तोंड नेऊन ) तुम्हांला मी अन् मला तुम्ही. आपणंच जर अशीं एकमेकावर रागवारागवी केली तर, गडे, मी कुणाच्या जिवावर दिवस काढूं? दासीचा अपराध पोटांत घालायचा ना? ( अगदीं काकुळतीला आल्यासारखें करून) म्हणतें, एक वार नाहीं का माझं ऐकायचं! नाहीं तर मी अश्शी धरून उभी राहीन. [ तिच्या मानेला विळखा घालून उभी रहाते. ती ओरडते. ]

यमूः—शकू, जाऊं दे बाई कहार. तूं नको तिच्या वाटेस जाऊंस—

नवीन मुलगीः—[ रागानें फणफणत ] Shameless! मी काय पुरुष आहें का माझ्याशीं असं बोलायला?

शकुन्तलाः—( खवचटपणानें ) पुरुषांशीं का असं बोलत असतात! बाऽऽई! हा अनुभव तुला कसा मिळाला?

नवीन मुलगीः—( संताप न आवरून ) जास्ती बोललीस तर जीभ कापून देईन—

शकुन्तलाः—( गंभीर मुद्रेनें ) कुणाची? तुझी? [ नवीन मुलगी रागानें निघून जाते. ]

यमूः—शकू, तूं अत्ती करतेस. तिला चिडवण्यांत तुला काय मिळतं?

शकुन्तलाः—अग गम्मत, दुसरं काय? माणसानं असं वागलं म्हणजे मला जोर येतो. परवां तर अशीच मीं मजा केली. आम्ही कीं नाहीं, ‘चुईचुई’चा खेळ खेळत होतों. तेव्हां अशी गम्मत झाली—

यमूः—( आश्चर्यानें ) चुईचुई! हा कुठला चिनी खेळ?

शकुन्तलाः—( मोठेपणानें ) तो खेळ मीं स्वतः शोधून काढला आहे.

चारपांच मुलींनीं शक्य तितक्याजवळ एकमेकींच्या गळ्यांत हात घालून उभं रहायचं आणि कुणी तरी खूण करतांच ' चुई ऽऽऽ ' म्हणून सगळ्या जणींनीं ओरडायला सुरुवात करायची. ज्याचा आधीं दम जाईल ती कंडम. अशा रीतीनं जिचा सगळ्यांत जास्त दम टिकेल तिनं बाकीच्यांच्या पाठींत दोनदोन धपके घालायचे. ह्या खेळांत ( गौरवानें ) आजपर्यंत मी जास्त दम टिकवतें. ( लाडानें ) आहे कीं नाहीं मी शहाणी ?

यमू:—इश्श ! कांहीं तरीच तुझं आपलं. दिवसेंदिवस वाढत्या वयाबरोबर तुझ्या अकलेला उतरती कळा लागलेली दिसते.

शकुन्तला:—( तिच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून ) तर परवां मीं काय केलं ? ह्या रुसुबाईला त्या खेळांत ओढली. ' चुई ' सुरू झालं तशीं मीं हातांतल्या रबरी चेंडूनं तिच्या तोंडांत पाणी उडवलं—अश्शी नाचली म्हणून सांगूं—!

यमू:—तुझा हा नाठाळपणा तुला नडल्याशिवाय राहणार नाहीं हं. फार शहाणी आहेस तूं—

[ इतक्यांत एक पंडिता प्रवेश करते ]

पंडिता:—काय ग, तुम्ही तासाला आला नाहींत ? लक्षांत ठेवा—' विद्येनेंच मनुष्या आलें श्रेष्ठत्व या जगामाजीं—'

शकुन्तला:—पण ती विद्या वर्गांत बसून मिळेल असं का आपल्याला वाटतं ? तें जाऊं दे—पण मला सांग कीं मत देणार आहेस कीं नाहीं ? तुला आम्ही धाकदपटशा मुळींच दाखवणार नाहीं; पण लक्षांत ठेव, गांठ माझ्याशीं आहे. पुन्हां या कॉलेजांत तुला पाऊल ठेवूं देणार नाहीं. तुला चिडवून चिडवून पुरेसं करीन. तुझे केंस विसकटून टाकीन. तुझ्या पिना मोडून तोडून टाकीन. तुझीं पुस्तकं मुलांच्या बाकांवर टाकून देईन. तुला धाक दाखविण्याची माझी बिलकूल इच्छा नाहीं. उलट तुझ्याशीं अगदीं सख्ख्या बहिणीसारखी मी वागेन. मग काय विचार ठरला ?

पंडिता:—मला विचार करायला पुरेसा वेळ तरी देशील कीं नाहीं ? असल्या गोष्टी तडकाफडकी होत नसतात—

शकुन्तला—विचार करायला एक मिनिटभर अवधि देतें. तेवढ्यांत बघ.

नाहीं तर लक्षांत ठेव, शकुन्तला तुझ्यापुढं उभी आहे. थांबा, मी अंक मोजतें. [तोंडानें एक, दोन, तीन, चार—इत्यादि साठांपर्यंत मोजते.]

यमूः—अग, सत्तेचाळीस झाल्यावर लगेच त्रेपन्न कसे? [शकुन्तला तिला डोळ्यानीं गप्प बसवतें.]

पंडिताः—( घोटाळ्यांत पडून ) ए बाई! तुम्ही अगदीं निकरावरच आलांत. मी कांहींच उत्तर देत नाहीं.

शकुन्तलाः—नाहीं? अजून नाहीं? अच्छा, देखेंगे! यमू—एक, दोन, तीन. [तीन म्हणतांच दोघीजणी तिला खांद्याला धरून खालीं बसवतात. पंडिताबाई सुटण्याकरितां धडपड करतात. शकुन्तला हातांतल्या रुमालानें तिचे हात बांधते. घाईघाईनें तिची नक्षीची चकरी फॅशनवेणी सोडते. आणि लहान मुलांना भीति दाखवण्याकरितां ज्याप्रमाणें शेंडीच्या मिशा करतात त्याप्रमाणें तिचे केंस पुढें आणून सैलशी गांठ मारतात.]

यमुः—बोल, भुता बोल. आहेस कबूल? देणार का नाहीं शकूला मत? का आणखी थोडीशी गम्मत करूं?

शकुन्तलाः—[ पंडिताबाईकडे पहात. ] ओहो रे दाढीदिक्षीत! काय मिशांचा झुपका आहे पण! कसं काय मियासाहेब, सूरत क्यूं ऐशी? [ पंडिताबाई हात सुटण्याकरितां धडपड करते. ]

पंडिताः—देईन देईन. माझ्या मैत्रिणींचींसुद्धां तुम्हांला मी मिळवून देईन—पण आधीं हात सोडा—

[ शकुन्तला तिचे हात सोडते ‘ ढालगज! आक्रस्ताळी! शनिदेव!’ इत्यादि सुमनांचा वर्षाव होतो.]

---

आणखी असे कित्येक प्रवेश लिहितां आले असते. फुरसुतीच्या वेळीं शकुन्तलेच्या मदतीनें मी ‘संमेलन’ नांवाचें नाटक लिहीत होतों. त्यांतले कांहीं भाग वर दिलेले आहेत. आमचें नाटक पूर्ण मात्र लिहून झालें नाहीं. पुढें शकुन्तलेचा आणि माझा बेबनाव झाला म्हणून तें तसेंच राहून गेलें. शकुन्तलेची ओळख व्हायला कारण साठे.

इतक्या धडाडीनें संमेलनाची तयारी चाललेली असतांना आपण हात जोडून स्वस्थ बसणें युक्त नाहीं, हा साठ्याचा युक्तिवाद मला पटला. अफाट दर्या आसपास खवळलेला असतांना आपण लाटांचे तुषार नुसते अंगावरसुद्धां घ्यायचे नाहींत हा खुळेपणा आहे, असें साठ्याचें स्पष्ट मत पडलें. माझें म्हणणें होतें, कीं या समुद्रांत शिरायचें, कबूल; पण कोणत्या नदीमुखानें प्रवेश करावा ? दोघांच्या विचारानेंसुद्धां ठाम निश्चय होण्याचा रंग दिसेना.

"देव, चार मुलांप्रमाणं आपण त्या दिवशीं मखमलीचा पोषाख करून उगीचच नवरदेवासारखं मिरवायचं हें मला पसंत नाहीं. मी एकदां लहानपणीं मखमलीचा सेलर–सूट, चार बोटं जर असलेली टोपी, पायांत चढाव–बूट इत्यादि रंगीबेरंगी थाटांत एकाच्या लग्नाला गेलों होतों. तो फार्स आतां पुन्हां नको. आतां जर हातांत कडी, गळ्यांत हासळी, कानांत बिकबाळी हा थाट केला, तर जगांत तोंड काढायची सोय उरेलसं मला वाटत नाहीं. आतां आपल्याला या संमेलनाच्या कार्यकारी मंडळींत शिरकाव करून घेतला पाहिजे. त्याशिवाय आपल्याला कोण विचारतो ? तुझं काय म्हणणं आहे ?" साठे म्हणाला.

"मी तोच विचार करतों आहें. पण निवडणुकीला लागणारा खटपटी स्वभाव अन् त्या गफलती हें आपल्याला कितपत साधेल याची मला खात्री देतां येत नाहीं. कार्यकारी मंडळ हें आपल्या अवसानाबाहेरचं खटलं आहे—" मी म्हणालों.

"पण मग खळीची बादली अन् हिरवीं–तांबडीं निशाणं घेऊन नाटकाच्या जाहिराती लावीत हिंडणाऱ्या गंप्यासारखं मिरवणं तुला पसंत पडेल का ? छे बुवा ! कांहीं तरी केलंच पाहिजे." साठे कांहीं तरी केलेंच पाहिजे ह्याची सत्यता पटविण्याकरितां सुपारीचे खांड चघळूं लागला.

"हें बघ.—देव, नाटकाच्या गोंधळांत तुला शिरतां येईल का ? तिकडे तुला प्रवेश मिळाला तर फार छान होईल—" साठे म्हणाला.

लहानपणीं नाटक करण्याचा मीं एकदां प्रयत्न केला होता. त्या वेळच्या अनुभवावरून पहातां आतां मी प्रख्यात नट म्हणून नांवालौकि-

काला येईनसें मला वाटेना. एकदां मला ठेंच बसली होती. मी साठ्याचें म्हणणें खोडून काढलें.

" देव, कसलेल्या नटासारखी तुझी तयारी नाहीं हें मलाहि दिसत आहे. पण एक दिवस रंगायचं, त्याला अभिनय, कौशल्य या गोष्टी इतक्या बारकाईनं कोण पहाणार ? आपला मुद्दा तो नाहीं. आपला मुद्दा हा कीं त्या दिवशीं सारा वेळ छाती पुढं काढून चालायला मिळालं पाहिजे. नाटकाविषयीं माझं मत......" साठे पुन्हां रंगांत आला.

" बाबा, पाया पडतों. तुझीं मतं ऐकतां ऐकतां माझं डोकं उठून जायची वेळ आली आहे. जगांतल्या यच्चयावत् विषयांवर तुझीं मतं नेह-मींच तयार असतात. पण ऐकणारांच्या जिवाबद्दल थोडीशी तरी सहानु-भूति बाळगीत जा ना ?" मी म्हणालों.

ज्या दिवशीं होतकरू वरांची परीक्षा घेण्यांत येते त्या दिवशीं साठ्यानें मला त्या ठिकाणीं ओढत नेलें. एक कोणसासा बुवा बसला होता. त्याच्या-पुढें पाळीपाळीनें प्रत्येकजण आपआपलें कौशल्य प्रकट करीत होता.

" हें पहा, तुम्ही पुरुषाची भूमिका करीत आहांत हें कसं विसरतां ? तुमचा आवाज म्हणजे माजवरांत बसलेल्या साळुबाईसारखा निघतो आहे. जरा ठसकेबाज आवाजी काढा—" त्या गृहस्थानें सूचना केली. माजघरां-तल्या साळूबाईनें ठसकेबाज आवाजाऐवजीं मरणसमयींची किंकाळी फोडली. ' अगबाई, इश्शबाई ! ' वगैरे प्रकार कोट टोपी घालून चाललेला पहा-तांच मला अतोनात हंसूं कोसळलें. पण या गंभीर विषयाचा असा उप-हास करणें बरें नाहीं म्हणून मीं तें हंसूं दाबून धरलें. साठ्याची पाळी आली. आमच्या दुकानांत सिंहाप्रमाणें गर्जना करणारा वीर, रंगभूमि-देवतेला अगदींच मेंगरूळ वाटूं लागला. साठ्यानें आपली शिकस्त केली; पण नाट्यदेवता त्याच्यावर संतुष्ट होण्याचें चिन्ह दिसेना !

मीं कांपऱ्या आवाजांत सुरुवात केली. माझ्या अंगांत कांपरें भरलें होतें. पण मी कांहीं तरी ओरडलों. माझ्या आवाजावर माझा स्वतःचाच विश्वास बसेना. कैचींतून सुटलेल्या जिवाप्रमाणें मी भाषण संपवून रुमा-लानें घाम पुशीत खालीं उतरलों.

" साठे, जरी त्यानं मला निवडून काढलं आहे तरी, आपण नाहीं बुवा ह्या सोंगाच्या भानगडींत पडणार." मी रस्त्यानें जात असतांना साठ्यांस उद्देशून म्हणालों. साठ्यानें उत्तरादाखल नुसतेंच 'हॅ हॅ' म्हणून म्हटलें. जरा वेळानें तो म्हणाला,

" मी तुला स्त्रियांच्या आकर्षक शक्तीवर त्या दिवशीं सांगितलं ना, त्याप्रमाणंच पुरुषांच्याहि अंगांत स्त्रियांना खेंचून धरण्याची आकर्षक शक्ति असावी असं मला कालपासून वाटूं लागलं आहे. क्षणिक लहर म्हण, क्षणभर टिकणारी विद्युल्लतेची चमक म्हण, किंवा काय वाटेल तें म्हण, पण आमच्या शकुन्तलेला तुझा फार ध्यास लागला आहे—" साठे म्हणाला.

" तुझी शकुन्तला ! अन् तूं कण्व मुनी कधींपासून झालास ?" मी त्याच्या पाठीवर थाप मारून म्हणालों.

" ती एक लांबचलांब कथा आहे. थोडक्यांत सांगायचं म्हणजे बायकांना वळविण्याची ती आकर्षक शक्ति माझ्या अंगांत जवळजवळ शून्य आहे. शकुन्तला माझी मैत्रीण. सोलापूरपासून पुण्यापर्यंतच्या सहा तासांच्या अवधींत आम्ही एकमेकांना कांहीं नाहीं तरी सहा वर्षांपूर्वीचे दोस्त समजूं लागलों. प्रथम प्रथम मी दुष्यन्ताची भूमिका घेण्याचा प्रयत्न केला. पण प्रेम करणं आपण म्हणतों तितकं सोपं नाहीं हा अनुभव मला आल्यामुळं मीं तो नाद सोडून दिला. हल्लीं आम्ही शकुन्तला आणि प्रियंवदा या नात्यानं एकमेकांशीं बोलत असतों. सदू, जगामध्यें प्रेम करणं ही एक हलकट गोष्ट समजण्यांत येते. पण माझ्या मतं प्रेम करणं ही एक अतिशय अवघड अशी कला आहे. ही कला इतर बोलणं, चालणं, हंसणं इत्यादि नैसर्गिक गोष्टींप्रमाणं सहजासहजीं येत नसते. येते म्हणून समजणं चूक आहे; किंव तो भ्रम असतो. या कलेचे सामान्यतः तीन विभाग पाडतां येतील. वयाच्या पंधरा वर्षांपर्यंत बरोबरीच्या मुलींवर केलेलं प्रेम बालप्रेम म्हणून समजलं जातं. हें इतकं भयंकर नसतं म्हणून मोठीं माणसं त्याकडे दुर्लक्ष करतात. या वयांत आकर्षक शक्ति नसल्यामुळं केवळ खेळायला सोबती या नात्यानं आपण एकमेकांत मिसळत असतों. सौन्दर्याची पुसट पुसट

" नाटक कोणतं आहे हें लक्षांत आहे ना ? आपण 'सत्तेचे गुलाम' नाटक करणार आहोंत; लक्षांत ठेव. नाहीं तर स्वयंवरांतील रुक्मीचं भाषण बडबडायला सुरुवात करशील. हो ! तुझे मामा आले आहेत बाहेर—" साठे म्हणाला.

" हूं ! " म्हणून धडधडणाऱ्या छातीवर हात ठेवून मी म्हणालों. वैकुंठाचें काम करतांना जर मी वैकुंठवासीं झालों तर काय मौज होईल, असा भ्याडपणाचा विचार माझ्या डोक्यांत घोळत होता. मी मन आंवरून पुन्हां उद्योगाला लागलों. It is in moments of frenzy that great deeds are done ही म्हणे त्या दिवशीं मीं खरी केली. आतुर असलेल्या बावरलेल्या मनानें मीं त्या दिवशीं बहार करून सोडली. प्रथम विजेच्या झगझगीत प्रकाशामुळें मला पुढचें कांहींच दिसेना. पण दृष्टी मेली आणि मी घरांतल्यासारखा मोकळा बोलूं लागलों. माझा उजवा हात उजव्या बुइंगमध्यें खुर्ची टाकून स्वस्थ आरामशीर पडला होता. पहिल्या प्रथम वाटणारी भीति हळुहळू ओसरली. काय करूं आणि काय नाहीं असें मला होऊन गेलें. मात्र मध्येंच चित्रा-सारखे तटस्थ बसलेले प्रेक्षक पहातांच 'आपलें कांहीं चुकलें नाहीं ना !' ही भीति उपस्थित होई. पण अंकाच्या शेवटीं तो भासहि दूर झाला. मामा आंत आलेले मीं पाहिलें.

" सदू, तूं व्यर्थ शिक्षणाच्या नादीं लागतो आहेस. तूं नाटकधंद्यांत शीर ! " मामा हंसून म्हणाले.

" त्याला या रंगारूपाला आणण्याचा मान मला मिळाला पाहिजे. रडेराऊंना घोड्यावर बसवायला मी पुढं झालों होतों." साठे विजारीच्या खिशांत हात अडकवून म्हणाला.

दुसऱ्या अंकाच्या शेवटीं साठ्यानें नवीन प्राणी माझ्यापुढें आणून उभा केला. मी डोळे ताणताणून पाहूं लागलों.

" सदुभाऊ, ह्या आमच्या शकुन्तलाताई—" म्हणून साठे हंसत म्हणाला. स्टेजवर म्हणण्याचें भाषण पाठ असल्यामुळें तेथें मला कांहींच अडचण भासण्याचें कारण पडलें नाहीं. पण प्रेक्षकवर्गातील एका

व्यक्तीच्यापुढें काय बोलावें हें मला सुचेना. भाषण विसरलेल्या गबाळ्या नटाप्रमाणें मी कान खाजवूं लागलों.

"मला तुमचं काम आवडलं—" शकुन्तला म्हणाली. "पण मला निराळाच भास झाला. दोनशें मैल लांब असणाऱ्या ठिकाणाहून बोलणाऱ्या मनुष्याचा फोनतर्फे जसा आवाज येतो त्याप्रमाणं मला वाटलं."

मीं उत्तरादाखल कोणत्या पक्षासारखं आवाज काढले तें मला आज पूर्णपणें आठवत नाहीं—!

# प्रकरण १९ वें

## पिसाट जीव

तारूं भडकलें. बंदाराला बांधून ठेवलेलें जहाज दोऱ्या तोडून निसटेल. वाऱ्याची क्षुल्लक झुळूक, पण इतका वेळ आंवरून धरलेलें जहाज अथांग पाण्यावर स्वैर आन्दोलन पावूं लागलें. किनारा दूर गेला—अगदीं दिसेनासा झाला.

साध्याच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे मी 'पिसाट' बनलों होतों. आपला म्हणून आजवर बाळगलेला पोपट उनाड ठरला. पिंजऱ्याचें दार उघडतां क्षणींच त्यानें पंखांना गति दिली. आणि क्षणार्धांत कानांत वारें शिरलेल्या पक्षाप्रमाणें मालकाला जुमानीसा झाला. पुन्हां पिंजऱ्यांत येण्याची कल्पना त्याला ग्राह्य वाटेनासी झाली. सदू बदलला हें मी मोकळ्या मनानें कबूल करतो. त्यानें बदलण्यांत चूक केली हेंहि मला कबूल आहे. पण त्याच्या हातून घडलेला हा प्रमाद अक्षम्य होता किंवा मनुष्यरीतीस सोडून होता हें म्हणणें मात्र निखालस खोटें आहे.

साऱ्या जन्मांत माझा स्त्रीजातीशीं बोलण्याचालण्याचा प्रसंग म्हणजे एक आई, मामी आणि सुलोचना. तिघींच्या बाबतींत मला तीन अनुभव आले. आईचा अनुभव सुरुवातीला सांगितलाच आहे.

कोणतीहि गोष्ट करण्याबद्दल बक्षिसी म्हणून थपडा मारायला निर्माण केलेली जी स्त्री ती आई, हा माझा अनुभव होता. त्यानंतर मामी. मामीच्याविषयीं मला जीव लावावेंसें वाटे. पण जीव लावण्यांत प्रकार आहेत. सुलोचनेच्या बाबतींत मला एक आडमुठी पोर याशिवाय जास्त कधींच वाटलें नाहीं. पण शकुन्तलेनें मला नवीन दिशा दाखविली. मला तसें नीटपणें सांगतां येणार नाहीं—पण एवढें मात्र नक्की कीं शकुन्तलेच्याविषयीं मला निराळेंच कांहीं तरी वाटूं लागलें. घटकान् घटका तिच्याशीं बोलत बसावेंसें वाटूं लागलें. आपल्या मनांत खळबळणाऱ्या विचारांना वाट करून द्यावेंसें वाटूं लागलें. आजपर्यंत ज्या ज्या गोष्टी मीं पाहिल्या असतील किंवा स्वतः केल्या असतील त्या तिच्यापाशीं बोलून टाकाव्यासें वाटूं लागलें. आणि त्याप्रमाणें मीं तिच्याजवळ बोलून दाखविलेंहि——

तिच्याशीं बोलतांना मला, जगामध्यें मनुष्याला जगण्यासारखें आमिष आहे खास असें वाटूं लागलें. मला तिच्या प्रत्येक कृतींचें कौतुक वाटूं लागलें. तिच्या न कळत ( कदाचित् तिला तें कळतहि असावें ) मी तिच्या हनुवटीवरच्या तांबुस रंगाकडे किती तरी वेळ टक लावून पहात असें. वाऱ्यानें इतस्ततः विखुरलेल्या कपाळावरच्या केसांना चूप रहाण्याची जेव्हां ती हातानें सूचना करी त्या वेळीं तिच्या हाताकडे माझें लक्ष जाई. मूळचा गौरवर्ण हात पातळाच्या रंगानें निळसर झालेला पाहून मला वेड्यासारखें होई.

साठ्याच्या ‘ आकर्षक ’ शक्तीची मला वारंवार आठवण होई. तरी पण यांत आकर्षक शक्तीचा कांहींच भाग नाहीं ही समजूत मी आपल्या मनाची करून घेतली होती. जी खरोखरीच सुंदर आहे ती केव्हांहि झालें तरी सुंदरच दिसणार, हा युक्तिवाद मी आपल्या मनाशीं खेळूं लागलों. माझ्याशीं बोलतांना शकुन्तला नाना चाळे करी. बसलेल्या जागेशेजारीं उगवणाऱ्या हरळीच्या हिरव्या, वाळलेल्या काड्या चघळण्यांत ती पटाइतच होती. हीच गोष्ट जर सुलोचनेनें केली असती तर मी कदाचित् तिला टाकून बोललों असतों. पण शकुन्तलेला एकाहि शब्दानें दुखवावेंसें मला वाटेना. ती करते आहे तेंच योग्य आहे, हाच माझा ग्रह. गाणें संपलें

तरी थोडा वेळ त्या गाण्याचे सूर हवेंत कायम असतात, त्याप्रमाणें शकुन्तलेचें भाषण संपलें तरी अजून ती बोलतेच आहेसें मला वाटत असे. तिच्या उडत उडत बोलण्यांत विश्वाचें सार भरलेलें आहेसें मला वाटूं लागलें. थोडक्यांत सांगायचें म्हणजे मला शकुन्तलेविषयीं बऱ्याच गोष्टी वाटूं लागल्या होत्या.

माझ्याशीं बोलतांना माझ्याचप्रमाणें तीहि कांहीं कांहीं ठिकाणीं अडखळते हें पाहून मला खरोखरीच अभिमान वाटूं लागला. लोकांना बोलतांना अडखळविण्याचें माझ्याजवळ सामर्थ्य आहे ह्या कल्पनेंत मला आनंद वाटूं लागला.

सदू बदलला. पूर्वीचा सदू अजिबात बदलला. सदू बदलल्याबरोबर सदूचा शिंपीहि पण लगेच बदलला. कोटाचें कापड बदललें. धोतर विणणारी गिरणी बदलली. वहाणा शिवणारा चांभार बदलला. टोपीचा रंग बदलला. मालकाबरोबर इतर जिनसा आपोआप बदलल्या. सदू बदलला यांत शंका नाहीं—

जगाच्या प्रारंभाला पहिल्याप्रथम प्रेम करणारा जीव कसा वागला असेल ? त्याच्याजवळ, प्रेम करावें हें शिकवायला पूर्वदाखले मुळींच नव्हते. मग त्याची त्रेधा काय उडाली असेल ? त्याची गोष्ट बाजूला केली तर त्याच्या प्रेमकहाणीनंतर आजपर्यंत प्रत्यहीं किती तरी प्रेमाच्या कहाण्या झालेल्या आहेत. पुस्तकांपासून किती तरी ज्ञान घेण्यासारखें आहे. इतकीं साधनें उपलब्ध असतां देखील प्रेम करण्याला निघणारा तरुण स्वतः कोरा तो कोराच? त्याची वाणी स्पष्ट नसते, विचार कांहीं डोक्यांत, कांहीं तोंडांत असे सैरावैरा धांवूं लागतात—कांहीं कांहीं जण तर विचार प्रदर्शित करण्याच्या भानगडींतच पडत नाहीं. कांहींना विचारच रहात नाहीं. वास्तविक आजपर्यंतच्या अनुभवानें मनुष्यानें कांहीं तरी प्रगति दाखविली पाहिजे. पण तें नाहीं. प्रेम व्यक्त करावयाला पहिला प्रेमी जीव जसा धडपडला असेल, अडला असेल, अडखळला असेल, थांबला असेल तसाच आजचा जीवहि धडपडतो, अडतो, अडखळतो अन् शेवटीं हताश होऊन थांबतो ! हेंच कां अनुभवाचें ज्ञान ?

स्त्रियांनीं तरी या बाबतींत प्रगति करावी—! तेंहि नाहीं. पहिल्या जीवाला प्रेम व्यक्त करण्याच्या संकटांत आणून सोडणारी पहिली महामाया आहे तशीच आहे. अजून तीनतीनदां मान उडविण्याचें तिनें बंद केलें नाहीं. आज इतकीं वर्षें ती पदर सांवरीत आहे, तरी पण अजून तें कांहीं काम संपल्यासारखें दिसत नाहीं. अजून ती प्रसंगानुसार चिमणीसारखे डोळे करून पुढें बसणाऱ्या जीवाला रडवायला लावण्याचें सोडीत नाहीं. अजून तिची जीभ बोलतांना अडखळते. अजून ती उगीचच हंसल्या-सारखें करते. अजून ती ओठावर बोट ठेवून आपला मुग्ध हेतु दर्शवि-ण्याचें सोडीत नाहीं. अजून तिचे उसासे संपलेले दिसत नाहींत.—तिच्या लीला आहेत तशा कायम आहेत. तिला आपल्याशीं बोलणाराचा हेतु दिसत नाहीं म्हणावें ? का असें खिजविण्यांतच तिला गंमत वाटते ! स्वतः पुढाकार घ्यायचा नाहीं हें तिचें तत्त्व अजून कायम आहे. स्वतः पुढाकार घेण्याची शक्ति नसली तरी दुसऱ्याला पुढाकार घ्यायला लावण्याची शक्ति अजून तिच्यांत कायम आहे.

शकुन्तलेला माझी स्थिति ओळखतां येत नव्हती असें म्हणण्याचें धारिष्ट मी कसें करणार ? तिनें आपला मनोदय कधींच उघड केला नाहीं;—पण मी ओळखून होतों कीं, तिला माझी ओळख पटली आहे. पण मला तसें बोलण्याचें धैर्य होईना. पहिला जीव जसा भित्रा बनला असेल तसाच मीहि भित्रा बनलों होतों !

शकुन्तलेला मोकळें मोकळें हिंडावेंसें वाटे. मलाहि अगदीं तस्सेंच मोकळें मोकळें हिंडावेंसें वाटे. शकुन्तलेला अभ्यासाचा अगदीं कंटाळा येऊन गेला होता. मलाहि पण, अभ्यास पाहिला कीं संताप येत असे.

“ पण करणार काय ? ” शकुन्तला म्हणाली.

“ खरोखरच, करणार काय!” मीहि पण एक उसासा सोडून म्हणालों. शकुन्तलेला माणसानें मोकळें बोललेलें फार आवडत होतें. “ मोकळं बोलणं हा तर माझा बाणा आहे.” मीं उत्तर केलें.

“ तसं म्हणायचं तर लहानपणापासून माझा स्वभाव असा नादिष्ट आहे—” तोंडांतल्या काडीचें चर्वण करीत ती म्हणाली.

" अन् तसं म्हणायचं तर लहानपणापासून माझा स्वभाव असा छांदिष्ट आहे--" मी तिच्या तोंडाकडे पहात म्हणालों.

" इश्श् ! म्हणजे काय ? मिळून एकच ! छांदिष्ट काय अन् नादिष्ट काय—एकच अर्थ !" ती हंसून म्हणाली.

" खरंच कीं—व्यक्ती तितक्या प्रकृति म्हटलं तरी पहा कसे जुळते स्वभाव येतात ते—" मी हंसून म्हणालों.

तिऱ्हाइतानें आमचें बोलणें ऐकलें असतें तर त्याला याचा काय अर्थ-बोध झाला असता ? एक स्वभावाचीं माणसें एक कां होत नाहींत, हें गूढ उकलण्यास त्याला जन्म पुरला नसता. आम्हांलासुद्धां या एक स्वभावाचें राहून राहून आश्चर्य वाटायचें. "कसा बाई इतका तुमचा स्वभाव माझ्याशीं जुळतो—?" तिनें आश्चर्यानें म्हणावें.

मीं परमेश्वराच्याकडे बोट दाखवून मोकळा होई. " परमेश्वराची करणी अन् नारळांत पाणी—" मी थट्टेनें म्हणत असें.

मी स्वतःशीं विचार करून पाहिलें. शकुन्तलेला ज्या गोष्टींची आवड त्या गोष्टींची मला आवड--आवड नसली तरी आवड वाटूं लागली. तिला ज्या गोष्टींचा तिटकारा त्या गोष्टी मला बिलकूल आवडेनाशा झाल्या. खरोखरच, इतक्या जुळत्या स्वभावाचीं माणसें एके ठिकाणीं आणण्यांत विधात्याचा कांहीं डाव तर नसेल !

पुणें शहराच्या आसपास मंडळींना फिरण्यासाठीं पुष्कळ जागा आहेत हा शोध मला आत्तां लागला. आणि संध्याकाळच्या सुमारास बुधवारांतल्या खिचाडखान्यांत बसल्यानें करमत नसतें हा शोध शकुन्तलेनें माझ्याकरितां लावून दिला. पर्वतीच्या बाजूस हिंडण्यानें पाय मोकळे होतात हा शोध मीं लावला. शेवटीं आम्ही ठरविलें कीं, हे शोध दसरीं दाखल करण्यापेक्षां रोज अमलांत आणले तर फायदा, नाहीं तर शोध तरी कशाला लावायचे ? राहूला संध्याकाळीं दुकानची व्यवस्था पहावयास सांगून मीं शकुन्तलेबरोबर फिरावयास जायचा पायंडा पाडला.

एके दिवशीं फिरतां फिरतां मौज झाली—निसर्गदेवीचें आम्ही कौतुक करीत होतों. चढाओढींत शकुन्तला पुढें होती.

" निसर्गाच्या या एकेक कृतीकडे पाहिलं म्हणजे मन कसं गोंधळून जातं—" शकुन्तला म्हणाली.

" खरंच गोंधळून जातं—" कां गोंधळून जातें हें न समजल्याकारणानें मी स्वतःच गोंधळून गेलों होतों !

" शहरांत राहून नेहमीं सुधारलेल्या जगांत वावरण्यापेक्षां निसर्ग-सुंदरीच्या सन्निध रहाण्यांत मौज असेल—" शकुन्तला म्हणाली.

" पण एकटंच—?" मी सहजच म्हणालों. शकुन्तलेनें चटकन् माझ्याकडे पाहिलें. मी दूरच्या एका झाडाकडे पाहूं लागलों.

दुसऱ्या एका प्रसंगीं मुलींच्याविषयीं आमच्यामध्यें प्रश्न निघाला.

" कुणी कांहींहि म्हटलं तरी माझं ठाम मत आहे कीं, मुलींची जात चतुर असते. मुलांची जात मठ्ठच नाहीं तरी—" ती म्हणत होती.

" तुम्ही जर असं बेधडक बोलूं लागलां तर कोण काय म्हणणार ?" मी हंसून म्हणालों.

" ता म्हटलं म्हणजे ताकभात हें मुलींना तात्काळ कळतं. मुली नेहमीं डोळ्याच्या धाकांत असतात." ती म्हणाली.

" माझा तर्क याउलट आहे. मुली दुसऱ्याच्या डोळ्यांच्या धाकांत रहात नसून त्या दुसऱ्याला आपल्या डोळ्यांच्या धाकांत ठेवतात, हें म्हणणं जास्त सयुक्तिक दिसेल—" मीं हंसत म्हणालों. शकुन्तला थोडा वेळ स्तब्ध होती.

" इश्श ! म्हणजे माझ्या डोळ्यांचा तुम्हांला धाक वाटतो असं मी समजूं काय ?" ती चटकन् बोलून गेली. मीं चमकून तिच्याकडे पाहिलें. तिनें चमत्कारिकपणें माझ्याकडे पाहिलें. मला काय वाटलें कुणास ठाऊक, मीं आपली दृष्टि दुसरीकडे वळवली. अनिवार झालेलें मन मोठ्या प्रयासानें मीं दाबून धरलें. मुलींची जातच चतुर म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. मला धीर होईना. एक वेळ वाटे, काय हरकत आहे ! पण पुन्हां वाटे नको तो विचार.

साठ्यानें मला ताळ्यावर आणण्यासाठीं मुद्दामच हा प्रश्न उकरून काढला. मीं त्याचें म्हणणें मुकाटपणें ऐकून घेतलें.

" सदू, तूं काय करतो आहेस तें नीट विचार करून कर. माझ्या मतानं पाहिलं तर तूं एका मुलीबरोबर हिंडण्यांत कांहीं पाप करतो आहेस असं मुळींच नाहीं. पण ह्या हिंडण्याचं पर्यवसान गोड करण्याचं तुझ्या हातांत असेल—तुझ्या म्हणण्याप्रमाणं तुझे वडील आणि मातोश्री लग्नाला कबूल असतील तर तूं हें असंच चालू ठेव. तिला आशेला लावून तिला जगांतून उठविण्याचं पातक डोक्यावर घेऊं नकोस. आपल्याकडे असल्या प्रकाराबद्दल प्रायश्चित्त म्हणजे देहान्त प्रायश्चित्त आहे. अब्रू बचावण्यासाठीं मुलीला विहीर जवळ करावी लागते. तर एका जीवाला खाऊन टाकण्याची वासना तुझ्यासारख्यानं मनांत आणावी हें कांहीं युक्त नाहीं. माझ्या सल्ल्याबद्दल रागावूं नकोस. सध्यां तुझी चलती आहे. तूं म्हणण्याचा अवकाश आहे. आजूबाजूचे लोक तुझं म्हणणं लगेच कबूल करतील. तूं आपल्याभोंवतीं एक प्रकारचं वातावरण तयार करून ठेवलं आहेस. तुला चार लोक चांगलं म्हणत आहेत. चार लोकांच्याप्रमाणं ती खुळी पोरगी बावरून गेलेली आहे. तिला सध्यां तुझा शब्द परमेश्वर-स्वरूपी दिसतो आहे. तिचा तूं परमेश्वर आहेस. अशा स्थितींत तिच्या गोंधळलेल्या मनाचा तूं अवास्तव फायदा घेणार नाहींस असं मीं समजूं का ? मीं त्या मुलीची आणि तुझी दोस्ती घडवून आणलेली आहे म्हणून मध्यें बोलणं मला प्राप्त आहे. थट्टा कर तिची, विनोद कर, काय लागेल तें कर—फक्त ती एक अजाण पोर आहे हें विसरूं नकोस. नाहीं तर मला नाइलाजानं तुझ्या मामांना सांगून त्या भेटी बंद पाडणं भाग पडेल—"
साठे गंभीर मुद्रेनें म्हणाला. मी हंसलों मात्र.

प्रेमी जीवाला आपल्या आराध्य देवतेचेच काय ते डोळे दिसत असतात; त्यामुळें दुसऱ्याचे डोळे आपल्यावर आहेत हें तो अजिबात विसरतो. पण तो जगाला विसरला तरी जग त्याला विसरायला तयार नसतें. माझ्या आयुष्यांत हें वर्ष चिरस्मरणीय होऊन रहाणार यांत शंका नाहीं. मुलींच्या ओळखीबरोबर मुलांच्या ओळखी होणें हें क्रमप्राप्त आहे. शकुन्तलेच्यामुळें माझ्या मुलींमध्यें पुष्कळच ओळखी झाल्या. त्या ओळखी झालेल्या नवीन मुलींची ओळख पाडण्यासाठीं त्यांचे भगत माझ्याशीं ओळख पाहूं

लागले. सहा महिन्यांपूर्वी अज्ञान असलेला सदाशिव Squire of Dames म्हणून ओळखण्यांत येऊं लागला. कोठल्याहि Miss अमकी तमकीशीं ओळख पाहिजे असेल तर प्रथम माझ्याकडे येणें मुलांना प्राप्त असे. मी शकुन्तलेशीं एवढ्या गप्पा तरी काय मारतों, आम्ही कोठें जातों वगैरे प्रश्नांचा भडिमार सुरू झाला—

त्या दिवशीं तासाला न बसतां लायब्ररीमध्यें Tip-Bits चा नवीन अंक चाळीत मी बसलों होतों. अंक वाचण्याची माझी बिलकुल इच्छा नव्हती. शकुन्तला तास संपल्यावर घरीं जाईल तिला वाटेंत अडवावें हा माझा हेतु होता. बराच वेळ पानांची चाळवाचाळव केल्यावर कंटाळून तो अंक मीं टेबलावर भिरकावून दिला आणि तेथेंच बांकावर डोकें टेकून स्वस्थ पडलों; इतक्यांत बन्या आणि त्याचे चार मित्र आंत आले.

" अरे हा दुष्यन्त तर इथंच बसला आहे कीं—" एकजण माझ्याकडे पाहून हंसत म्हणाला.

" ध्यान चाललं असेल रे ! सविकल्प समाधि म्हणतात ना, त्यांतला हा एक प्रकार आहे." दुसरा म्हणाला.

" काय असेल तें असो, पण काल परवां मीं तुम्हाला आमच्या घरावरनं जातांना पाहिलं खरं—" पहिला म्हणाला.

" अरे त्यांत काय आहे ? तुला Telepathyचें तत्त्व नाहीं का माहीत ? हा घरून निघाला असेल. ती घरून निघाली असेल. ती एका रस्त्यानं आली, हा विरुद्ध दिशेनं पण त्याच रस्त्यानं आला. गांठभेट सहजासहजीं पडली. आतां शिष्टाचाराच्या नियमांना अनुसरून ती म्हणाली असेल, येतां का ? हा म्हणाला असेल—नेतां का ? " दुसरा म्हणाला.

मीं बन्याकडे पाहिलें. बन्या डोळे तिरपे करून माझ्याकडे पहात होता. मला वाटतें तो हंसतहि पण असावा.

" सदू, नाटकांत काम घेणं इतक्या फायद्याचं असतं हें मला अगाऊ कळलं असतं तर मित्रत्वाच्या जोरावर मी वैकुंठाचं काम तुला करूं दिलं नसतं. मींच तें स्वतः केलं असतं—" बन्या माझ्याकडे पाहून म्हणाला.

" म्हणजे ! तुझ्या तोंडाला पाणी सुटलं वाटतं ! जाऊं दे रे ! कुणाच्या भाग्याच्या आड येण्याचं पाप करूं नये—" तिसरा म्हणाला.

" बाकी, देव, मी तुझें मनापासून अभिनंदन करतों—शिकार पण शिकार गवसलीस, लेका—" पहिला म्हणाला.

याहिपेक्षां पुष्कळच फवारे उडत होते. सभ्यपणाचे नियम बाळगण्याचें त्यांचें ध्येयच नव्हतें. वस्तुस्थितीचा विपर्यास करण्याचें माणसाला शिकवावें लागत नसतें. एरवीं ही चाललेली थट्टा मला मनापासून आवडली असती. पण बन्याच्यादेखत चाललेला हा प्रकार मामांना कळल्याशिवाय रहाणार नाहीं ही माझी खात्री होती. म्हणून मी शक्य तितका गंभीर चेहरा करून तेथून सटकण्याचा मार्ग शोधूं लागलों.

" बसा हो देव, आम्हीहि माणसंच आहोंत कीं—आमच्याशीं एक घटका बोललात म्हणून कांहीं रागावणं होणार नाहीं. बसा; कांहीं हरकत नाहीं. तुम्ही माणसांशींच बोलतां आहांत—" एकजण माझ्या हाताला धरून म्हणाला.

" शंका वाटते आहे मला. तुम्ही माणसें आहांत याला पुरावा काय ?" मी निकरावर येऊन म्हणालों.

" जाऊं दे रे ! रागावला आहे तो. अन् हो, बरोबर आहे ! देव, ती बघ तुझी महामाया चालली—पळ !" दुसरा म्हणाला.

मी त्यांच्या उपहासाकडे पूर्ण दुर्लक्ष करून घाईघाईनें बाहेर पडलों. पण गर्दीगर्दीत टेबलावर काढून ठेवलेली टोपी घेण्याचें मात्र अजिबात विसरलों. शकुन्तला एकटीच घरीं जात होती. मी तिच्याबरोबर चालूं लागलों.

" देव, तुम्ही टोपीशिवायच कधींपासून कॉलेजांत येऊं लागलांत ?" शकुन्तला हंसून म्हणाली.

मीं डोक्याला हात लावून पाहिलें. " आज संध्याकाळीं दुकानाकडे यायचं हं—" म्हणून तिला बजावून सांगत मी टोपीसाठीं परत फिरलों.

बन्यानें माझ्याकडे पाहिलें. " आवांक्याबाहेर हें प्रकरण जाऊं लागलं आहे. वेळींच सावध रहा. हा कांहीं शाहाणपणा नाहीं." बन्यानें कुत्सित भावनेनें म्हटलें. पण दोष माझ्याकडे असल्यामुळें मीं त्याच्याकडे रागानें

पहाण्यापलीकडे काय करणार होतों ? "बरं. बरं तुम्ही नको मला शाहाणपणा शिकवायला !" असें आपल्याशींच पुटपुटत बाहेर पडलों.

असंभाव्य गोष्टी संभाव्य करून दाखविण्याचा मीं जणुं काय विडाच उचलला होता. शकुन्तला संध्याकाळीं दुकानांत आली. राहू तिला गिऱ्हाइक समजून काय पाहिजे म्हणून विचारूं लागला. तिनें माझ्याकडे बोट दाखविलें. राहू स्वतः संसारांत पडला नव्हता, तरी त्यानें प्रसंगाचे धागेदोरे तात्काळ ओळखले. आपण येथें राहिलों तर अडचण होण्याचा संभव आहे, तेव्हां ही मुलाखत पार पडेपर्यंत दुसरें कांहीं तरी बाहेरचें काम काढावें या स्तुत्य विचारानें प्रेरित होऊन तो उदारात्मा मुकाट्यानें बाहेर पडला. मीं त्याला एका शब्दानें त्याच्या जाण्याचें कारण विचारलें नाहीं.

"हें कां तुमचं दुकान ! इतकं प्रशस्त असूनसुद्धां एका गड्यावर कसं बाई भागतं—!" शकुन्तला इकडे तिकडे पहात म्हणाली.

"एक गडी ? आमचा राहू दहा गड्यांना भारी आहे. आणि स्वतः मी आहेंच ना ?" मी हंसून म्हणालों.

"याच्यापासून सरासरी प्राप्ती काय पडते महिन्याची ?" शकुन्तला म्हणाली.

"हें पहा, ज्याप्रमाणं मुलींचं वय कधींच खरं सांगत नाहींत त्याप्रमाणं आपली प्राप्तीहि कुणी खरी सांगत नाहीं !" मी किंचित् आढ्यतेनें म्हणालों. शकुन्तला मोठ्यानें हंसली.

"बाई ! तुम्हाला काय पाहिजे ? पिना पाहिजेत ? आकडे पाहिजेत ? फाउंटनपेन्स पाहिजेत?" मी हंसतहंसत म्हणालों. माझ्याकडे पाहून शकुन्तला हंसूं लागली "अहो दुकानदार, म्हटलं मला किनई आंकडे नकोत, पिना नकोत, नि फाउंटनपेन्स पण नकोत. ह्या खुर्चीवर बसायला मात्र पाहिजे ! बसूं ?" माझ्या परवानगीची वाट पहाण्याची कांहींच जरूरी नसल्यामुळें ती खुर्चीवर बसली. मी टेबलावर तिच्याकडे तोंड करून बसलों.

"आज रात्रीं वेस्ट-एण्ड्ला याल का ? नाहीं म्हणायचं नाहीं. मीं रागावेन बरं का—" मी हंसत म्हणालों.

" यायला कांहीं हरकत नाहीं—पण दादा सोडणार नाहीं. आई विचारील. त्यांना काय सांगणार ?" शकुन्तला म्हणाली.

यानंतर वडील माणसांच्या आडमुठेपणाविषयीं आम्ही बराच वेळ बोलत होतों. शेवटीं मीं मार्ग सुचविला—

" असं केलं तर ? दादाच काय तो आडवा येईल. त्याला म्हणावं कीं चारदोन दिवसांत आमचं मुलींचं संमेलन आहे कॉलेजांत. तेव्हां तयारी करण्याकरतां मला कॉलेजांत जावं लागणारच—" मी तिच्याकडे पाहून म्हणालों.

" खरंच गडे !—" लाजून तिनें एकदम खालीं मान घातली. मी मोठ्यानें हंसूं लागलों. शकुन्तला निघून गेल्यावर मी मनाशींच पुटपुटूं लागलों—' खरंच गडे ' ' खरंच गडे '—' गडे ' ' गडे ' ' गडे !' आंत आलेला राहू माझ्याकडे आश्चर्यानें पहात असलेला मला दिसतांच मी एकदम भानावर आलों. राहूच्या चौकसपणाला तर्क करण्याची संधी मिळूं नये म्हणून मी होऊन त्याला माहिती पुरवली—" राहू, या बाईचं नांव शकुन्तलाबाई, हुषार आहेत कीं नाहीं ? आमच्या वर्गांत आहेत. सहजच आपलं दुकान पहायला त्या आल्या होत्या. पण तूं कशाला बाहेर गेलास ? तूं राहिला असतास तरी चाललं असतं—त्यांच्याशीं माझं कांहीं सुद्धां काम नव्हतं—"

" सदुभाऊ, मला त्यांत काय कळणार ? मला बाहेरचं थोडं काम होतं म्हणून मी बाहेर गेलों." राहू म्हणाला. पण त्याच्या बाहेर जाण्याचें कारण मीं ओळखलें होतें. अशा वेळीं जास्त बोलण्यांत आपलाच तोटा आहे हें जाणून मीं त्याला उत्तर दिलें नाहीं. राहू स्पष्ट बोलून दाखवीत नव्हता तरी तो घडलेल्या प्रसंगाचें कल्पनाचित्र खरडण्यांत गुंग होता. मधूनमधून तो माझ्याकडे पहात असे. पण त्याच्या दृष्टींत बदल झालेला माझ्या लक्षांत आल्यावांचून राहिला नाहीं.

आजपर्यंत कॉलेजांतील मित्रानें कॉलेजांतल्या मैत्रिणीला सिनेमाला नेणें—त्यांतून वेस्ट–एण्ड्ला जाणें म्हणजे जवळ जवळ अशक्य कोटींतली गोष्ट समजण्यांत येत असे. पण मी त्या दिवशीं शकुन्तलेला घेऊन वेस्ट–एण्ड्ला

गेलों. वेस्ट–एण्ड् सिनेमाला अगदीं जवळचा रस्ता म्हणजे पृथ्वीपर्यटन करावें लागलें असतें तर मला अत्यानंद झाला असता. अन् शकुन्तला पाळीव मांजराप्रमाणें माझ्यावर विश्वास टाकून टांग्यांत मला खेटून बसली होती. शकुन्तला माझ्या बरोबर यायला तयार होईल ही कल्पनाच मुळीं माझ्या डोक्यांत नव्हती. इतक्या जवळ बसलेल्या शकुन्तलेचें अस्तित्व मला खरेंसुद्धां वाटेना. रस्ता संपेपर्यंत बोलण्याचें काम तीच करीत होती. मी फक्त तिच्या अपेक्षेप्रमाणें 'हो'—'नाहीं' म्हणून उत्तरें देण्याचें पहात होतों. तिची बडबड चालूच होती.

"किनई, दादा आला. 'कुठं जातेस?' म्हणून दरडावूं लागला. ठरल्याप्रमाणं मीं उत्तर करतांच असा चिडला! 'ह्या कार्ट्यांना साखळीनं बांधून ठेवलं पाहिजे. संमेलनं भरवीत आहेत—' पुष्कळ त्याची बडबड चालू होती. मी आईला पुढें करून पळून आलें. मला घरापर्यंत पोहोंचवायला आलं पाहिजे हो—! काय—? मी काय बोलतें आहें? लक्ष कुठं आहे?" शकुन्तला माझ्या कोटाच्या बाहीला धरून म्हणाली. मी शुद्धीवर आलों.

टांग्यांतून खालीं उतरतांच बन्या आलेला मला दिसला. त्याला बातमी कुणी दिली? का सहजासहजींच तो आला असावा? माझ्याकडे त्यानें टक लावून पाहिलें. मीं त्याच्याकडे पाहिलें न पाहिल्यासारखेंच केलें. आणि त्याच्याशीं बोलण्याचा प्रसंग टळावा या उद्देशानें शकुन्तलेशीं बोलण्यांत गर्क झालों. बन्यानें घसा खरडून आपल्या अस्तित्वाची मला जाणीव करून देण्याची पराकाष्ठा केली. पण इच्छाच नव्हती तेथें खांकरला—नाहीं आणखी ओरडला तरी काय उपयोग होता? शेवटीं शकुन्तलेच्या लक्षांत आलें. तिनें मला खूण केली—

"ओऽहो! कोण, बन्या—अरे वाः! तूंहि पण आजच?—"म्हणून बतावणी तर मीं खूप केली. बन्यानें खिशांतल्या रुमालानें स्वतःच्या तोंडावर आच्छादन टाकलें. पाण्यांत टाकलेल्या ढेकळाप्रमाणें माझी अवस्था झाली.

नशीब आज माझ्यावर उलटलें होतें का हंसत होतें हेंच मला समजेना.

बन्या आमच्या पाठीमागल्या बाजूस येऊन बसला. शेजारींच मागच्या बाजूस Cheshire रेजिमेंटमधले दोन Corporals बसले होते. पूर्वजानें महत्प्रयासानें शोधून आणलेल्या वह्लीचा धूर हवेंत कोंदटला होता. शकुन्तलेनें नाकाला रुमाल लावला.

" अं ! अन् वरीं पतिराज याच पंथाचे मिळाले तर ! " मी थट्टेनें हंसून म्हणालों. शकुन्तलेनें माझ्याकडे चमकून पाहिलें. ह्याच वेळीं तिच्याकडे पहाण्याची मला बुद्धि झाली. पुन्हां माझ्या मनानें उचल घेतली.

बन्या यू. टी. सीं. त असल्यामुळें समदुःखी या नात्यानें त्यानें त्या Corporals शीं बोलणें सुरू केलें. 'Beg pardon'चा मंत्र लाखों वेळां पुटपुटत त्यानें संभाषणांत खंड पडूं दिला नाहीं—त्यांनींहि पण कौतुकानें प्रश्न विचारण्यास सुरुवात केली. Regulars मधील लोक इतके विनोदप्रिय असतील ही कल्पना मला यापूर्वीं शिवलीसुद्धां नव्हती. मिलिटरी खात्याचा मनुष्य म्हणजे Damn, Devilsचा ओतप्रोत भरलेला सांडपाण्याचा नळ, अशीच कांहींशीं आपली सर्वसाधारण समजूत असते. पण प्रत्यक्ष अनुभवानें पहातां मनुष्य परिस्थितीमुळें कसा नरम पडतो याचें उदाहरण त्या कॉर्पोरल्सच्या रूपानें माझ्यापुढें उभें होतें. बन्याएवढा लहानसा मुलगा एका वर्षांत corporal कसा होऊं शकतो याचें त्यांना आश्चर्य वाटत होतें. कारण, त्यांना एक एक जागा वर जायला कितीं वर्षें घालावीं लागतात याचा नियम नसतो. बन्याशीं बोलणारा कार्पोरल तर छत्तीस वर्षांचा होता. अन् मिलिटरीमध्यें Private Soldier म्हणून लागल्यास त्याला आज पंधरा वर्षें होऊन गेलीं होतीं.

शकुन्तलेला मधून मधून मी त्यांचें संभाषण समजावून सांगत होतों. मला तरी त्यांचें बोलणें सगळें थोडेंच समजत होतें ! पण जें काय समजत होतें तेंच मी अभिमानानें तिला सांगत होतों.

होतां होतां व्यक्तिविषयक प्रश्नांवर बाजू येऊन ठेपली. 'आम्ही कोण, कुठं असतों ' इत्यादि प्रश्नांना बन्यानें कांहीं तरी तोंडाला येतील तशीं उत्तरें दिलीं. बोलतां बोलतां एकानें शकुन्तलेकडे पाहून ' Is that girl his wife ? ' म्हणून बन्याला प्रश्न केला. बन्यानें हंसून 'हो'कारार्थक मान

" अजून आपला सुलेमानखां शाळेंतून आला नाहीं का ? अन् मामा आले का हपीसांतून !"

" तूं हल्लीं फार महाग झाला आहेस रे आम्हांला ! का तुला फुरसतच होत नाहीं आमच्याकडे यायला !" मामी म्हणाली.

उडवाउडवीचीं उत्तरें देऊन वेळ मारून नेण्याच्या उद्योगाला मी लागलों. मामी माझ्या खांद्यावर हात ठेवून म्हणाली,

" सदू, तुला कांहीं तरी होतं आहे. तूं माझ्यापासून आजपर्यंत एकहि गोष्ट लपवून ठेवली नाहींस. मग आतां हा नवीन कुरटेपणा करायला कधींपासून शिकलास ? आम्ही तुझीं मायेचीं माणसं ना ? आमच्याजवळ तूं विश्वासानं सांगणार नाहींस तर दुसऱ्या कुणापाशीं बोलणार ? आंत चल. तुला चहा देतें. आत्तां येतील ते. अन् सुलींचीहि येण्याची वेळ झाली आहे—" मामीनें मला हाताला धरून आंत नेलें. म्हणजे, मामी-च्या कानावर या गोष्टी गेल्या नव्हत्या. मला या विचारानें तेवढाच आराम वाटला. चहाच्या डब्याशीं खेळत मी मामीचें बोलणें ऐकून घेऊं लागलों.

" सकाळीं वन्या आला होता. बराच वेळ बसला होता. मीं त्याला विचारलं तर मला इकडनं उत्तर देणं झालं कीं 'सदू आतां बदलला आहे. त्याला पूर्वीच्या लोकांची संगत नकोशी झाली आहे. तो सध्यां नवीन नवीन ओळखी पाडण्याच्या उद्योगांत आहे.' काय समजावं माण-सांनीं ? नवीन ओळखी ह्या होणारच. नवीन माणसं भेटलीं म्हणजे 'बोलूं नका हो आमच्याशीं' असं का त्यांना सांगायचं ? इश्श ! कांहीं तरीच यांचं बोलणं. अन् आमची ओळख विसरायला आम्ही कुणी तिऱ्हाईत का आहोंत ! चांगलीं नात्यानं बांधलेलीं आहोंत कीं—! मीं लक्षच दिलं नाहीं त्यांच्या बोलण्याकडे. पण सदू, स्वारीची मुद्रा मात्र नेहमींसारखी आनंदी नव्हती. कांहीं तरी झालं असावं ! बाबांची प्रकृति आहे तशीच आहे हें मीं सुलीला आज सकाळीं पाठवून समजून घेतलं. मग काय बाई असावा गोंधळ !" मामी म्हणाली.

तो गोंधळ काय असावा हें मामांना पुरतेपणीं समजलें होतें. मला तो

गोंधळ मामीला समजावून सांगतां आला असता. पण तसें करण्यास माझें मन घेईना. मामी इतकी जवळची असतांनादेखील या बाबतींत ती परकी वाटूं लागली. मी चहा घेत होतों तोंच मामांची सायकल वाजली. मीं दचकून दरवाजाकडे दृष्टि फेंकली.

“ हॅलो ! कोण ? सदुभाऊ का ? काय रे आज तुला इकडे येण्याइतकी स्वतंत्रता कशी मिळाली ? ” मामा म्हणाले.

“ इश्श ! काय हें बोलणं ! इकडे यायला स्वतंत्रता कशाला लागते ! अन् तो कुठं कुणाचा परतंत्र आहे ? ” मामी म्हणाली.

“ तें मी काय सांगूं ? तें तोच जास्त खुलासेवार सांगेल. पण त्याला त्रास देऊं नकोस. मोठ्या नवससायासांनीं तो आज आपल्या घरीं आला आहे. पुन्हां येणार नाहीं असं त्याचं स्वागत करणं बरं नाहीं. सदू, मला चहा ठेवला आहेस का ? म्हाताऱ्या नवऱ्याला विचारतो कोण घरांत ! ‘ आल्यागेल्याचा सन्मान अन् म्हातारबाबा, धरते तुमचा कान !’ म्हातारपणीं मनुष्याची अशी दाणादाण उडते बघ, सदू—” मामा पाटावर येऊन बसत म्हणाले.

“ पण पंक्तिप्रपंच करायला मी शिकलेंच नाहीं मुळीं—” मामी चहाचा कप मामांच्यापुढें करून म्हणाली.

“ काय पण टेंभा मिरवते आहेस ! आज सकाळची गोष्ट, फार लांब नको जायला—” मामा हंसत म्हणाले.

“ पहा हो बाई ! कुठलं कुठं नेऊन भिडवायचं, त्याला कांहीं सुमार तरी ? शिळा भात वाढणं बरं दिसेल का ? सुली कितीहि केलं तरी बायको आहे. बायकांच्या जातीला घरांत काटकसर करायची संवय झालीच पाहिजे. अन् मी नाहीं का शिळा भात खात ? तो पुरुषांना वाढणं बरं दिसत नाहीं—” मामी म्हणाली.

“ कुणाला बरं दिसत नाहीं ? कोण पहायला येणार ? आम्ही घरांत काय वाटेल तें करूं—” मामा म्हणाले.

“ तुम्ही काय वाटेल तें कराल पण मला कांहीं तरी मनाची वाळ-

गली पाहिजे. अन् वरकामांत नाहीं तरी पुरुषांनीं इतक्या बारीक नजरेनं पहाणं चांगलं नाहीं—" मामी म्हणाली.

"छान ! तिकडून म्हणाल संसाराची काळजी नाहीं म्हणून ! त्यांत एक तंत्र आहे का ?" मामा उठले.

एकीकडे नेऊन मामांनीं मला अभ्यासाविषयीं प्रश्न केला. जें टाळण्याचा मी प्रयत्न करीत होतों तेंच पुढें आलें.

"तूं अभ्यास करीत नाहींस हें चांगलं नाहीं. हें वय शिकण्याचं आहे. इतर गोष्टी वयोमानाप्रमाणं केल्या म्हणजे शोभून जातात. भाऊंचा भरंवसा देतां येत नाहीं. पुढंमागं लवकरच तुला घरचं पहावं लागेल. अजून घराची जोखीम अंगावर नाहीं. इतक्यांतच तूं शिकलास तर पुढं फायद्याचं होईल. हल्लींची शिक्षणपद्धति सदोष असो किंवा निर्दोष असो, आपल्याला शिकण्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. मोठा झालास म्हणजे तुला याचा पश्चात्ताप होईल. वेळींच सावध झालेलं बरं. आजपर्यंत किती तरी जीव फुकट वाया गेलेले आहेत. त्यांना योग्य दिशा दाखविणारांची उणीव होती. पण तुला तशी पाळी येऊं नये ही माझी इच्छा आहे. आयुष्याचे धिंडवडे उडवून घ्यायची जर तुझी इच्छा असेल, अन् माझं बोलणं तुला कठोर वाटत असेल तर, मीं बोललेलं विसरून जा." मामांनीं कपडे काढीत म्हटलें.

मामांनीं शकुन्तलेविषयीं एका शब्दानें मला विचारलें नाहीं. पण मामांच्या वाक्यांतून निघणारा प्रत्येक सूर कोणत्या रागाचा होता तें मी जाणत होतों.

दुसऱ्या दिवशीं मीं साठ्याला सर्व कांहीं सांगितलें. शान्त मुद्रेनें साठे ऐकून घेत होता. त्यानें एक लांबलचक व्याख्यान देऊन मला शान्त करण्याचा प्रयत्न केला. पण मला त्याच्या म्हणण्याचा अर्थबोध मुळींच झाला नाहीं.

"देव, मनुष्याच्या स्वभावाविषयीं जों जों विचार करावा तों तों मन अधिकच घोंटाळ्यांत पडतं. हा बन्या तुझा आज इतक्या दिवसांचा मित्र, पण त्याचं आणि तुझं मुळींच जमत नाहीं. जी गोष्ट पुढंमागं मला करावी लागली असती—म्हणजे तुझ्या मामांना कळवावं लागलं असतं—

ती गोष्ट त्यानं केली. पण ती करण्यांत त्याचा हेतु काय होता? मत्सर! केवळ कुत्सितबुद्धि. माणसामध्यें इतर गुण पुष्कळ असले तरी मत्सरानं साऱ्या गुणांची माती होते. रूपानं दहाजणींना खाली मान घालायला लावणारी स्त्री केवळ या मत्सरानं आपलं रूप हिडीस करून टाकते. रामरावणाच्या कथा खऱ्या मानल्या तर कैकेयीचं उदाहरण हेंच सांगतं. कैकेयी रूपगर्विता होती. मत्सरानं तिला खग्रास ग्रहण लावलं. तिचं रूप सर्पाच्या कान्तीप्रमाणं भयप्रद झालं. मैत्री शेवटपर्यंत टिकत नाहीं याचं मूळ कारण मत्सर. मैत्री सुंदर बाईप्रमाणं जवळ करावीशी वाटते, पण मत्सराचे कांटे वाढूं लागले कीं—! मी विचार करून दमलों. नंदनवनाप्रमाणं दिसणारं जग इतकं कंटाळवाणं कां वाटतं? तसं पहायला गेलं तर स्वर्गाची कल्पना किती फोल आहे हें तत्काळ दिसून येईल. स्वर्गाला जाणारे पुण्यात्मे अमृतावांचून दुसरं कांहींएक चाखीत नसतात. करमणुकीकरतां इंद्राच्या अप्सरांखेरीज दुसरं कोणतंच साधन नाहीं. आणि मुक्ति मिळवून जर ह्या रीतीनं दिवस काढायचे तर मग पुनर्जन्माची कल्पना काय वाईट?—स्वर्गामध्यें सगळ्या गोष्टी जय्यत तयार असतात. हांताशीं असणाऱ्या वस्तु प्राप्त करून घेण्यांत आनंदाचा भाग येतो कुठं? ज्या गोष्टी दिसायला अप्राप्य वाटतात त्या गोष्टी दीर्घप्रयत्नानं आपल्याशा करून घेण्यांत शौर्य आहे. उन्हांतून चार मैल रपेट मारून आल्यानंतर बर्फांतला सोडा पिण्यांत मौज असते. एकंदरीनं पहातां असंच दिसून येईल कीं, स्वर्गाच्या सुरळीत चाललेल्या आणि कधींहि न बदलत्या अशा चकारींतून फिरण्यापेक्षां पृथ्वीवरील—वेळोवेळीं बदलत्या आणि चमत्कृतिजन्य अज्ञानमार्गावरून फिरणं जास्त सुखाचं आहे. पृथ्वीला मी जास्त मान देतों."

"तुझी दृष्टि कोती आहे. तुला शेणांतल्या किड्याप्रमाणं पृथ्वीच बरी वाटणार!" मी म्हणालों.

"तुमची दृष्टी तरी काय कमी कोती आहे! मुक्तीचा मार्ग चोखाळणारे वीर पृथ्वीला कां रे शिव्या देतात? पृथ्वीनं तुम्हांला जन्म द्यायचा, तुम्हांला लहानपणीं नाचूं बागडूं द्यायचं, मोठेपणीं तुमच्या लत्ता सोसा-

अबाधित सत्ता गाजवणारा परमेश्वर उद्यां जर जगांतल्या माता-देवींप्रमाणं चिडखोर वृत्ति धारण करूं लागला तर प्रलयकाळ फारसा लांब रहाणार नाहीं." साठे हंसून म्हणाला.

"परमेश्वर म्हणून सत्ता आहे हें तर तुला कबूल आहे? का देवच नाहीं म्हणणारा तूं आहेस?" मी म्हणालों.

"देव असेल किंवा नसेल; व्यक्तिशः मी परमेश्वर नांवाच्या सत्तेला फारच थोडी किंमत देईन. पण परमेश्वरी सत्ता म्हणजे निसर्ग, असा एक माझा तर्क आहे. आणि ती सत्ता सर्वज्ञानी नाहीं. तीसुद्धां आपल्या-प्रमाणंच चुकीस पात्र आहे. जगांतल्या व्याधिग्रस्त जीवांचं कोडं एरव्ही कसं उलगडणार? मुद्दाम विकृत स्वरूपाचा जीव कोण तयार करील? सर्व-ज्ञाता असा चितारी मुद्दाम घाणेरडं चित्र कां काढील? ती सत्तासुद्धां नवशिक्या शास्त्रवेत्त्याप्रमाणं प्रमाणं बसवीत असावी. ज्याप्रमाणं शास्त्रवेत्ता अमुक एक ॲसीड इतक्या प्रमाणांत अमक्या एका वस्तूशीं मिसळलं कीं अमुक एक नवीन वस्तु तयार होते, असा शोध लावतो त्याप्रमाणं ही परमेश्वरी सत्ता मनुष्यप्राणी निर्माण करीत असतांना करीत असावी. एकादे वेळेस प्रमेय बरोबर येतं, एखादे वेळेस चुकतं. आणि चुकलेलं प्रमेय म्हणजे निष्कारण विकृत झालेला व्याधिग्रस्त जीव! परमेश्वराच्या चुकीबद्दल आपल्याला त्याचं प्रायश्चित भोगावं लागतं. पण तें तसं रहाणा-रच. त्याला इलाज नाहीं. जोंपर्यंत परमेश्वराला बरोबर अंदाज आलेला नाहीं तोंपर्यंत जगांत व्याधींनीं पीडलेले जीव रहाणारच."

"मग त्या experiment च्या तत्त्वानं पाहिलं तर मनुष्यप्राणी निर्माण करून देव थांबला असं म्हणतां येणार नाहीं. experiment चा हा मधला टप्पा आहे असंच म्हणावं लागेल—" मी म्हणालों.

"केव्हांहि! मनुष्यप्राणी ही परमेश्वराच्या कौशल्याची किमान मर्यादा नव्हे. मनुष्यप्राण्यामध्यें अजून मत्सरासारखा भयंकर दोष कायम आहे. अजून वासना मेली नाहीं. चढाओढीच्या कल्पनेंत वासना आणि मत्सर या दोन गोष्टींचा मुख्यत्वेंकरून प्रादुर्भाव होतो. त्यामुळं राष्ट्रीय कल्पना उगम पावते. राष्ट्राचा अभिमान बाळगणं ही कोती समजूत आहे. पुष्कळ

लोक विश्वबंधुत्वाच्या तत्त्वांची टिंगल करतात. पण लक्षांत ठेव, सदू, आपण त्याकरतां धडपडलं पाहिजे. जगांत रहाणारे आपण जीव बंधुत्वाच्या नात्यानं जखडलों गेलों पाहिजे. विश्वबंधुत्वाच्या उदात्त कल्पनेची टिंगल करणारे स्वतःस मोठे शहाणे समजत असले तरी, त्यांना कवडीइतकं ज्ञान नसतं असं म्हणावं लागेल. मनुष्यप्राण्यानंतरची निर्मिति कदाचित् या विश्वबंधुत्वाच्या नात्याला मान देईल. कदाचित् त्यांना तीं तत्त्वं पटतील—" साठे म्हणाला.

साठे आणखी बराच वेळ बोलत होता. त्याचे विचार खरोखरीच पटण्यासारखे होते. मला समजत नव्हते हा माझा दोष आहे—पण त्यानें विचार करण्यांत स्वतःकडून कसूर ठेवली नव्हती एवढें मात्र खरें.

---

# प्रकरण २१ वें



## दरबारचा खलिता

बाबांची प्रकृति पुन्हां सुधारली नाहीं. दिवसेंदिवस प्रकृति खालावत चालली होती. पण आयुष्याच्या तंबूला लोंबकळत रहाण्याची त्यांची चिकाटी जबर होती. बाबांना आजारी पडल्याला आज जवळजवळ सहा महिने झाले होते. डोळे निस्तेज पडले होते. अंगाची कांतडी, रक्ताचा पुरवठा नसल्यामुळें काळी पडली होती.

पण अजून त्यांचा मेंदू पूर्वी होता तसा तरतरीत होता. विचार करण्याची शक्ति अजून कायम होती.

शेवटीं शेवटीं आम्हांला कळून चुकलें कीं, मानवी प्रयत्न वृथा आहेत. काळाचें भयंकर स्वरूप बाबांच्या अस्थिपंजर-शरीराभोंवतीं घोटाळूं लागलें होतें. बाबांनासुद्धां आपला भविष्यकाळ स्पष्टपणें दिसूं लागला होता.

मामांनीं त्यांना धीर दिला. पण त्यांनीं मामांना मोडून काढलें—"माझा भरंवसा नाहीं. मी मरणार. मी मेल्यावर वाटेल तो धिंगाणा घाला. मला मुळींच पर्वा नाहीं." इत्यादि बाबांचें पुराण अखेरपर्यंत चालू होतें.

आजाऱ्याच्या शेजारीं बसणें ही एक शिक्षा आहे. बाबांच्या शेजारीं मी बसत असें. दिवसा कांहीं एवढा त्रास नसे, पण सर्वत्र सामसूम झाल्यावर रात्रीं मात्र मला अतिशय भीति वाटे! आतां बाबांचें भय वाटण्याचें वास्तविक कांहींच कारण नव्हतें; तरी पण मनुष्य सवयीचा गुलाम असतो. जन्मभर बाबांना भिण्याचें माझें व्रत होतें. अजूनहि बाबांची मला भीति वाटत असे. डोक्यांत नाना तऱ्हेचे वेडगळ विचार धुमाकूळ घालीत. त्यांपैकीं एक विचार हा होता कीं, बाबा जर यांतून सुधारले आणि पहिल्यासारखे हिंडूंफिरूं लागले तर घरांत मला थारा मिळेल कीं नाहीं? स्वार्थी विचार! पण डोक्यांतून बरेच दिवस जाईना. एखादे वेळेस बाबा मला धरण्यासाठीं उठण्याची धडपड करीत आहेत असा भास होई. बाबांच्या दुखण्याच्या जोडीला मीहि दुखणें घेऊन बसेन कीं काय ही मला भीति वाटूं लागली.

रात्रींच्या शान्त वेळीं दिवा बारीक करून मी आरामखुर्चीवर डुलक्या घेत असें. बाबांचें कण्हणें कानीं पडलें कीं मी दचकून जागा होई. ज्या माडीवर आम्ही लहानपणीं नाटक करण्याचा धुडगूस घातला होता तीच माडी मला खायला उठल्यासारखी भीषण वाटूं लागली. आई खालच्या बाजूस माझ्या पायापाशीं एका घोंगडीवर पडत असे. तिचें घोरणें मला स्पष्ट ऐकूं येई. मोत्याचें मधून मधून रखवालीचें काम अंगणांत चालू असे. एके दिवशीं मी आमच्या घड्याळावर इतका संतापलों कीं, संतापाच्या भरांत मी तें फोडून टाकण्याच्या विचारांत होतों. इतक्यांत आई या अंगावरची त्या अंगावर झाली. माझा बेत तसाच राहिला.

बाबांची झोंप रात्रीं स्वस्थ नव्हती. मधूनच ते दचकून जागे होत. त्यांना धीराच्या गोष्टी सांगण्याकरितां खुर्चीवरून उठणें मला भाग पडे. मी अगदीं कंटाळून गेलों. कांहीं नाहीं म्हटलें तरी सहा महिने मीं अशा तऱ्हेनें घालवले होते. जगांत येऊन जन्मभर आजाऱ्याची शुश्रूषा करणें

हींच जर आयुष्याची इतिकर्तव्यता असेल, तर त्यापेक्षां जन्माला न येणेंच चांगलें असें मला वाटूं लागलें. आजाऱ्याच्या औषधाच्या त्या बाटल्या पाहिल्या कीं माझें मस्तक खवळत असे. ज्या घरांत मी लहानाचा मोठा झालों त्या घराचा मला वीट आला. घराची पायरी पाहिली कीं मला घरांत शिरणें नकोसें होई. घर म्हणजे कैदखाना, ही मी घराची व्याख्या करूं लागलों.

मधून मधून सुलोचना माझ्या मदतीला येत असे. मदतीला म्हणून आलेल्या सुलोचनेच्या दिमतीला मला सारखें उभें रहावें लागे. रात्रीं शिकस्त म्हणजे बारापर्यंत ती कांहीं तरी माझ्याशीं बडबडत असे. पण मिनिटाला बारा जांभया देणारा जीव कोठवर जागृतावस्थेंत रहाणार? बसल्या जागेवर पेंगणारी सुलोचना लहान पोरासारखी उठवून माझ्या जागेवर नेण्याचें काम मला करावें लागे. तिचा अपराध कांहींच नव्हता. तिला माझ्या जिवाची कल्पना येणें शक्य नव्हतें. ती आपल्याकडून डोळे उघडे ठेवण्याचा प्रयत्न करी. घरांत आई आणि सुलोचना ह्या दोघीजणी मदतीला असतांना शेवटीं मलाच पुढें व्हावें लागे. दिव्याच्या अंधुक प्रकाशांत, विचार करीत करीत मी आयुष्याचा भूत, वर्तमान आणि भविष्यकाळ डोळ्यांपुढें आणीत असें. समाधानाला कुठेंसुद्धां जागा नव्हती. सर्वत्र अंधःकार!

बाबांचा एककल्लीपणा दिवसेंदिवस जास्तच त्रासदायक होऊं लागला. एके दिवशीं संध्याकाळच्या सुमारास ते आईवर संतापले. इकडचा दिवा तिकडे ठेवायला आई विसरली—कीं असाच कांहीं तरी गोंधळ झाला होता. मी जों घरांत शिरलों तों माझ्या कानीं बाबांच्या शिव्या आल्या. भरल्या घरांत, करकरीत तिन्हीसांजाच्या वेळेला बाबांनीं ही उचल खाल्लेली पाहून मला अतोनात संताप आला. सौभाग्यवती, कुलीन स्त्रीला उद्देशून अशा शिव्या बाबांना देण्याचें धैर्य तरी कसें झालें कुणास ठाऊक! मी तडक जिन्यानें धांवतच वर गेलों. मला आईची कींव आली.

भिंतीकडे तोंड करून आई पदरानें डोळे पुशीत उभी होती. आई सहसा अश्रू गाळणारी स्त्री नव्हती. तिच्या सहनशीलतेची मर्यादा बाबांनीं

ओलांडली होती. असहाय स्थितीची तिला कल्पना आली; आणि एकदम डोळ्यांवाटे तिनें अश्रू गाळण्यास सुरुवात केली. मला पाहिल्याबरोबर तर तिनें लाजलज्जा, मानापमान विसरून मोटयानें हुंदके देण्यास सुरुवात केली. तिच्या रडण्यानें माझ्या हृदयाचें पाणीपाणी झालें.

बाबा पलंगाच्या कठड्याला धरून उभे होते. अंगावरचें वस्त्रसुद्धां घेण्याची त्यांना शुद्ध नव्हती. लाजलज्जा पार झुगारून दिली होती. पाय लटपटत होते, हात कांपत होते, पण बोलण्याचें अवसान सुटलें नव्हतें !

" रडायला लाज नाहीं वाटत ! अजून नवरा जिवंत आहे. ज्या दिवशीं मी मरेन त्या दिवशीं पोटभर रड. तुझ्या नशीबीं जन्माची रड आहे. तुम्हांला माझा कंटाळा आला आहे. मला काय डोळे नाहींत ? दिवसा ढवळ्या माझा उपहास करतां, माझा मुद्दाम अपमान करतां— मला तुम्ही जिवंत जाळाल. माझ्या मरणाचीसुद्धां तुम्हां वाट पहाणार नाहीं. मेलेल्या जनावराचा गिधाडांना लगेच वास लागतो. तुम्ही माझ्या मरणाच्या आशेनं माझ्याभोंवतीं जिवंतपणींच गिधाडं जमलेलीं आहांत. म्हातारपणीं तुला नवरा नकोसा झाला आहे—" बाबा चिडून बडबडत होते.

मला हें ऐकवेना. आजपर्यंत मी बाबांना भीत होतों, पण आतां माझ्या अंगांत कोठून अवसान आलें कुणास ठाऊक ! मी भीतीची कल्पना अजिबात विसरलों—" बाबा!—" म्हणून मी संतापानें ओरडलों. बाबांनीं माझ्याकडे पाहिलं.

" तूं एक हें दुसरं गिधाड. बाबांनो, मी अजून मेलों नाहीं. कां मला गराडा घालतां ! जेव्हां मी मरेन तेव्हा तुम्हांला मोकळीक आहेच." बाबा अनपेक्षितपणें मोठ्यानें हंसले. मी पुन्हा दचकलों.

" कां ! कशी गम्मत केली ! तुम्हांला वाटलं मी मरेन ! अरे, मी कसला मरणार ! मी तुम्हांला पुरून उरणार आहे! कस फसवलं तुम्हांला ! जा, खुशाल परत जा अजून मी जिवंत आहें. मी मरणार म्हणून हिला कोण आनंद झाला होता ? आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या ! फसली— साफ फसली. जा—पेढे परत कर. अजून पेढे वाटायला अवकाश

आहे—" म्हणून म्हणत बाबा पुन्हां एकदां पूर्ववत् हंसले. मी झटकन् पुढें सरलों.

" बाबा, शहाणपणा पुरे झाला ! समजली तुमची अक्कल ! मुकाट्यानं पांघरूण घेऊन पडतां कीं—" मी म्हणालों.

" यंव रे मुलगा ! 'पुत्र व्हावा ऐसा गुंडा। ज्याच्या हातीं दीड मण धोंडा' घाल तो धोंडा माझ्या टाळक्यांत. तुला वाचा फुटली अं ! सदू, काल माझा शब्द ऐकला कीं तुझ्या अंगाला दरदरून घाम सुटत होता. आज पोपटाला वाचा फुटली. ये माझ्या विठुमिय्या ! तूं माझ्या अंगाला हात तर लाव—. तुला तमाशा दाखवतों. सूर्याचीं पिल्लं दाखवूं का तुला ? जा—मुकाट्यानं तिच्या मांडीवर डोकं टेंकून तूंहि तिच्यासारखा बापाच्या नांवानं रड.— अरे, तूं कालचा खुळचट पोर, तूं काय गमजा लावणार ? तुला एका थरडींत निजवीन. बापाचं ऐकायला नको काय ? तुला कॉलेजांत जायचं आहे काय ? पुढं ये—तुझं कॉलेज काढतों बाहेर—" बाबा म्हणाले.

" जाऊं दे बाबा सदू, तूं नको आणखी मधें पडूंस. जन्माची बाईल तिला कोण खाईल? जन्मभर खात आलेले आहेत, आतां तूं कशाला मला सोडवतोस—? " आई रडत रडत म्हणाली. मी विचारासरशीं बाबांचा हात घट्ट पकडला बाबांनीं धडपड केली. माझ्या हाताला ते रक्त निघेपर्यंत चावले मीं त्यांना पुन्हां पलंगावर निजवलें. हातावरचें रक्त दृष्टीस पडतांच माझें भान सुटलें.—मी एका हातानें बाबांचें तोंड घट्ट दाबून धरलें.

" अं ? लहानपोरासारखे तुमचे कष्ट तिनं करायचे—तुमच्याकरतां रात्रंदिवस तिनं मरायचं; अन् तुम्ही हें बक्षीस देणार काय ? आतां विसरा ते दिवस. मी सांगेन तसं वागलं पाहिजे. आईला एक शब्द उलटून बोललांत तर पहा मग आपला विचार. तुमची गय करून भागणार नाहीं. घरांत तुम्ही नाहीं नाहीं तसले शब्द उच्चारतां ? हें घर काय वेश्यांनीं भरलं आहे अशी तुमची समजूत आहे ! कुठं हीं पापं फेडाल ! स्वतःच्या बायकोला, स्वतांच्या तोंडानं, वेश्येच्या पंक्तीला नेऊन बसवतां ! पुन्हां तर तुम्ही बोला—डाग देईन जिभेला—अन् पलंगावरून उठलांत

ते अंगाभोंवतीं चिरगुटसुद्धां नाहीं ! कुठं लाज विकलीत ! तुम्हांला सदू म्हणजे पोरखेळ वाटला काय ! सदू आतां या घराचा मालक आहे. आज मी मालक आहें. माझ्या म्हणण्याप्रमाणं रहायचं असेल तर आम्ही तुम्हांला औषधपाणी करूं. तुम्ही मरण्याची धमकी कुणाला घालणार ? मला ! तुम्ही मेलांत तर जग काय ओस पडणार आहे ! असे छप्पन जिव रोज मरतात—कोण कुणाला रडणार !" मी बेभान होऊन बोलत होतों. बाबांची धडपड जशी बंद पडली तसा मी आईच्याकडे गेलों. आईचे डोळे लाल झाले होते. अजून ओंठ थरथर कांपत होते.

"आई, तूं माझं ऐक. त्यांच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष देऊं नकोस. भ्रमातलं त्यांचं बडबडणं ! त्यांत उगीच जिवाला खेद करणं बरं नाहीं. तूं खालीं जा. मी त्यांच्यापाशीं घटकाभर बसणार आहें." हलकेच हाताला धरून मी तिला म्हणालों. आजपर्यंत आईनें माझ्या आश्रयाची कधींच अपेक्षा केली नव्हती; पण आतां तिचा धीर सुटला आणि लहान-मुलाप्रमाणें ती माझ्या खांद्यावर मान टाकून मुक्त कंठानें अश्रू ढाळूं लागली.

"सदू, मी काय करूं रे !" म्हणून आर्त स्वरानें तिनें मला प्रश्न केला. पण मी तरी काय उत्तर देणार ?

"सदू, या हालापेक्षां, या वनवासापेक्षां मी मेलें तर—" आईनें मला घट्ट पकडलें.

"आई, तूं घाबरूं नकोस. मी आहें ना जवळ ! मग कां अशी थरथर कांपतेस ! तुला बाबा जें जें कांहीं बोलले असतील तें विसरून जा. आई, जगांत असल्या गोष्टी नेहमींच चालायच्या. मनुष्यानं धीर सोडून कसं बरं चालेल ! रडूं नकोस. पूस ते डोळे—" म्हणून म्हणत सदऱ्याच्या बाहीनें मींच तिचे डोळे कोरडे केले. मी आईला कशीबशी खालीं पोंचती केली. बाबा हा प्रकार लक्षपूर्वक पहात होते. पण बोल-ण्याचें त्यांना धाडस होईना. आईला पोहोंचती करून मी पुन्हां बाबांच्या शेजारीं बसलों. मला आतां त्यांची मुळींच भीति वाटत नव्हती. लहान-पणीं मीं केलेल्या प्रतिज्ञेची मला आठवण झाली, 'बाबांना पश्चात्तापाची

पाळी आणीन ' म्हणून म्हणत संतापानें लाल झालेला एवढासा सदू माझ्या डोळ्यांपुढें उभा राहिला. तो सदू माझ्या अंगांत शिरला—

" बाबा, जगामध्यें न्याय आहे; दुसऱ्या जिवाचा तडफडाट अंतीं चैन पडूं देत नाहीं. केलेल्या पापाचे मुंगीएवढे कण डोंगराएवढे मोठे होऊन छातीवर बसतात. पोटच्या पोराला तुम्ही दारच्या कुत्र्यासारखं वागवलं आहे. पण कुत्र्याप्रमाणं वागवलेला जीव उद्यां वाघाचं रूप धारण करील हें तुमच्या लक्षांत आलं नाहीं. तुम्हाला सदूवर विश्वास ठेवणंसुद्धां पसंत नव्हतं—बन्याला दुकानचा कारभार देतां काय ? बन्या कोण तुमचा ? पुन्हां तुमचा बन्या ह्या घरांत पाऊल टाकील हें आतां विसरा. माझी एक गोष्ट बाजूला केली तरी, आईनं काय तुमचं केलं होतं ? आईचा त्रासिक स्वभाव व्हायला कारण तुम्ही. जन्मांत एक सौख्याचा, सहानुभूतीचा शब्द तुमच्या तोंडून निघाला असेल तर शपथ ! काय मिळालं तुम्हांला ? मुलाची सहानुभूति घालवलीत. बायकोचें प्रेम गमावून बसलांत. केवळ स्त्रीधर्म म्हणून ती तुमच्या आश्रयाला टिकून राहिलेली आहे. तिला तुमच्याविषयीं दया, माया, प्रेम असं कांहीं वाटत नाहीं. तुमच्या खस्ता काढायला आम्हीं तयार आहोंत ह्याचं एकच कारण आहे, आणि तें हें कीं आम्ही अजून तुमच्यासारखे फटिंग बनलों नाहीं. आम्हांला अजून मनुष्यत्वानं सोडलेलं नाहीं—"

बाबांनीं त्यानंतर मुळींच त्रास दिला नाहीं. त्यांची खात्री झाली कीं सदू आतां उलटला आहे. पूर्वीप्रमाणें तो आपल्या धाकाला आतां मुळींच जुमानणार नाहीं. उलट ते आतां मला भिऊं लागले. मी काय करीन आणि काय नाहीं याची त्यांना चांगलीच दहशत बसली. दुसऱ्या दिवशीं मामा आले. त्यांच्याजवळ त्यांनीं आपली भीति बोलून दाखवली. मी जवळ नव्हतों असें त्यांना वाटत होतें; पण त्याच वेळीं मी आंतल्या माडींत पुस्तक वाचीत पडलों होतों.

" मला सदू लागेल तसं बोलतो; तो माझं मुळींच ऐकत नाहीं. माझा वाटेल तसा पाणउतारा करतो. त्याला वडिल माणसांची कांहींच कदर नाहीं—" इत्यादि गोष्टी बाबा दीनवाणीनें मामाजवळ सांगूं लागले.

"असं कुठं झालं आहे, भाऊसाहेब? सदू किती झालं तरी तुमचा मुलगा आहे. एक वेळ आम्ही परके, पण सदू तुमचा आहे. कदाचित् एखादे वेळेस बाहेरच्या त्रासानं जीव कंटाळून एखाददुसरा शब्द गेला असेल त्याच्या तोंडून. त्याबद्दल उगीच कशाला एवढी खंत बाळगतां? मी त्याला सांगून टेवतों पाहिजे तर––" मामा धीर देण्याच्या उद्देशानें म्हणाले.

"नको––त्याला कांहीं सांगूं नका. मी तुमच्यापाशीं जें काय बोलतों त्यांतलं एक अक्षर त्याला कळवूं नका" बाबांच्या आवाजांत घाबरे-पणाची छटा उमटलेली मीं पाहिली. आसुरी आनंदाची एकच लकेर डोक्यांत येऊन गेली. बाबांच्यासारख्या 'मी' 'मी' म्हणणाऱ्या पुरुषाला माझी भीति वाटावी ह्यांत मला अभिमानाची बाजू आहेसें वाटलें. पण तो विचार ह्या वेळेस केवळ दुय्यमाचा होता म्हणून मीं तो बाजूस सारला.

"काल मी थोडंसं हिला बोललों. माझा जीव वैतागून गेला होता. मी काय बोललों तिला हें कांहीं मला आठवत नाहीं, पण ती रडूं लागली वाटतं! इतक्यांत सदू आला अन् फाड फाड बोलूं लागला. ज्याला मीं आजवर अन्न घातलं त्यानं, त्याच तोंडानं, मला शिमग्यांतल्यासारख्या शिव्या द्याव्या! माझी लाज त्यानं बाहेर काढली. जिभेला डाग देण्याची भीति त्यानं मला घातली; आणि नंतर तासभर माझ्याजवळ बसून मला नाहीं नाहीं तें बोलला. त्याचं बोलणं ऐकून घेण्याकरितांच का मीं त्याला लहानाचा मोठा केला! हें जर मला आधींच कळलं असतं तर मी त्याला वढूं देण्याचा मूर्खपणा तरी केला नसता––" बाबा म्हणाले.

"असं बोलूं नये, भाऊसाहेब! तुम्हांला किती वेळां सांगूं कीं आपल्या माणसांविषयीं असा ग्रह करून घेऊं नये. तो जर वायफळ बोलला असेल तर मी त्याचा कान धरून त्याला आणतों, आणि त्याला तुमच्या पायां पडायला लावतों––" म्हणून म्हणत मामा माझा कान धरण्याच्या उद्देशानें उठलेले मीं ताडलें.

"नको, नको. तेवढं नका करूं. तो मुलगा वाह्यात आहे. पाया पडा-यच्या निमित्तानं तो माझ्या पायाचा लचकासुद्धां तोडायला कमी करणार

नाहीं. माझं तुम्हांला हात जोडून सांगणं आहे कीं, मला तुम्ही त्याच्या ताब्यांत देऊं नका. मला एकट्याला त्याच्या शेजारीं ठेवून जाऊं नका. तुम्ही पाहिजे तर रजा काढा. नाहीं तर तुमची सुटी आली तरी चालेल. तो मला मारील. मला एकट्याला मारायला तो मुळींच मागं घेणार नाहीं—" बाबा अगदीं काकुळती येऊन म्हणाले. मामांना इकडे येण्याचा त्रास देण्यापेक्षां आपण होऊनच पुढें व्हावें म्हणून मीं पुढच्या माडींत प्रवेश केला. मला पाहिल्याबरोबर बाबांची मुद्रा कावरीबावरी झाली. मी गालांतल्या गालांत हंसत निर्भयपणें एकेक पाऊल टाकीत पुढें झालों. मामांनीं माझ्या हाताकडे पाहिलें. हाताची पट्टी पहातांच ते आश्चर्यचकित झाले.

"पट्टी कसली रे हातावर ?" म्हणून मामांनीं मला प्रश्न केला. मीं सावकाशपणें बाबांच्याकडे पहात उत्तर केलें,

"पितृप्रेमाची निशाणी. म्हातारपणीं बाललीला सुचूं लागतात त्या ह्या अशा. मामा, बाबा मला कां भितात हें तुम्हांला आत्तांपर्यंत एक कोडंच असेल. त्या कोड्याचं उत्तर ही पांढरी तांबडी पट्टी योग्य तऱ्हेनं देऊं शकेल. मामा, जगांत उगीच कोण कुणाला भिणार ! असले जिव्हेचे जिव्हाळ्याचे प्रसंग घडून आले म्हणजे मग भीतीचं कारण उद्भवतं. आणि मोठ्या माणसांनीं अंतकाळींसुद्धा उघड उघड खोटं बोलावं असं कोणतं शास्त्र सांगतं ?"

"सदू, हीं बोलणीं तुझ्यासारख्या शिकलेल्या माणसाला शोभत नाहींत—" मामा म्हणाले. मी उसळून म्हणालों,

"मामा, बाबांना तरी हें अमानुष वर्तन शोभलं का ? रात्रीचा दिवस करून होरपळणाऱ्या आगींत मी आपल्या जिवाची आहुती देतों आहें. मला स्वतःला क्षणभर विसांवा नाहीं, तर प्रेमाचा शब्द दूरच. आंग मोडून यांना लहान पोराप्रमाणं खेळवल्यासारखं करायचं—आणि हे शेवटीं काय करणार, तर माझ्या अंगचं रक्त पिणार ! मामा, पित्याचं कर्तव्य यांनीं काय पाळलं आहे म्हणून मी तरी पुत्रधर्म पाळूं ? मीं सारं कांहीं सहन केलं, पण आईला त्यांनीं नाहीं नाहीं त्या शब्दांनीं भरल्या घरांत रडायला

लावलं, तें मला मुळींच सहन होईना. बायकांना रडवण्यांत काय पुरुषार्थ त्यांनीं गाजविला ? तुम्हांलाहि रडवायला लावणारे जगांत आहेत हें मीं त्यांना कां पटवून देऊं नये ? ”

मामांनीं माझा आवेश ओसरूं दिला. बाबा भेदरलेल्या मुद्रेनें मामांचा हात घट्ट धरून माझ्याकडे पहात होते.

“ सदू, जरा मागल्या माडींत येतोस का ? ” म्हणून म्हणत मामांनीं मला एकीकडे नेलें.

“ सदू, भाऊंचं डोकं विचारानं हल्लक झालेलं आहे. त्यांना जास्ती चिडवण्यांत उद्यांचं मरण आज ओढवण्यासारखं होणार आहे. ते तुला भिऊन आहेत. तुझ्यादेखत ते आतां पुन्हां तसा प्रकार करतीलसं मला वाटत नाहीं. तूं आपल्या अस्तित्वानं त्यांना जरब बसवलीस तरी पुरें आहे. त्यांच्याशीं कोणत्याहि विषयावर हुज्जत घालणं फायद्याचं नाहीं. मला तुझ्या परिस्थितीची पूर्ण कल्पना आहे. पण मला एक सूचना करावीशी वाटते कीं, अंतकाळीं त्यांना सुखानं मरूं दे. झाल्या गोष्टी विसरण्यांत आपलं कल्याण आहे. त्यांच्या दृष्टीनं तूं विचार करून पहा. नेहमीं लोकांना हुकमतींत वागवणं आणि आपलाच शब्द खरा करणं या बाण्याचा मनुष्य ह्या परावलंबी जीवनास केव्हांहि कंटाळल्यावांचून रहाणार नाहीं. वड्याचं तेल वांग्यावर, या न्यायानं ते तुमच्यावर तोंडसुख घेत आहेत. नको. असा जिवाचा संताप करणं बरं नाहीं. आज ते ज्या आपत्तींत आहेत ती गोष्ट उद्यां आपल्या मानगुटींत बसणार आहे. भाऊंच्या प्रवासाचा जो मार्ग तोच आपलाहि मार्ग आहे. आपल्याला सगळ्यांना तोच मार्ग आहे. दीन, शरण आलेल्या जीवाला खिजविण्यांत आपल्याला काय मिळणार आहे ? मी सुलोचनेला आज धाडून देतों. उद्यां रजा मिळाल्यास खटपट करून पाहीन. भाऊंची सोबत फार दिवसांची नाहीं—” मामा म्हणाले.

सुलोचना आलेली पहातांच बाबांना थोडेंसें हायसें झालेलें मीं पाहिलें. ते सुलोचनेला मुळींच इकडची तिकडे होऊं देईनात. पण त्यांना कांहींच न बोलण्याचें मीं ठरविलें. सुलोचनेला ते जीव कीं प्राण करूं लागले.

कोणतीहि गोष्ट पाहिजे असल्यास ते सुलोचनेला उठायला लावीत.

रात्र होऊं लागली तसतसा रंग पालटूं लागला. बाबांचें बोलणें थोडेसें जड येऊं लागलें. बोलतांना त्यांना अतोनात त्रास पडत असावा हें स्पष्ट दिसत होतें. बाहेरच्या वाढत्या अंधःकाराबरोबर बाबा आपली मुद्रा जास्त भेसूर करूं लागले. बाबांची मुद्रा खरोखरीच इतकी भेसूर दिसत होती कीं साध्या मनुष्याची त्यांना पाहून बोबडीच वळली असती. पांढुरक्या केसांच्यामध्यें ते पांढुरके डोळे, निळसर झालेलें कपाळ, लोंबते हिरवे निळे कान, काळे झालेले ओंठ इत्यादि गोष्टी भेसूरपणाला मदतच करीत होत्या. बाबांचा थोडा डोळा लागल्यासारखें पाहून सुलोचना पाय न वाजवतां माझ्या टेबलाशेजारीं येऊन उभी राहिली. मनांतून ती भ्याली होती.

" सदू, भाऊंच्याशेजारीं तूं बैस. मला भीति वाटते—" ती मला ऐकूं जाईल अशा बेतानें हलकेच म्हणाली.

" वेडी आहेस. भ्यायला काय झालं ? मी आहें ना इथं !—" म्हणून मीं प्रथम तिला झिडकारून लावलें. ती परत बाबांच्यापाशीं जाऊन बसण्याच्या विचारांत होती, पण मीं विचार केला कीं सुलोचना कांहींहि झालें तरी एक पोर आहे. मृत्यूसारख्या भीषण प्रसंगीं तिला दूर ठेवणेंच योग्य आहे. एखादे वेळेस नसता धक्का घेऊन बसली म्हणजे धर्म करतां कर्म उभें रहायचें. मीं तिच्या दंडाला धरून तिला अडविलें. ती माझ्याकडे आशापूर्ण नजरेनें पाहूं लागली.

" सुले, तुला फार भीति वाटते आहे का ? " मीं विचारलें. तिनें मानेनेंच होकार दिला. मी तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणालों, " कशी ग तूं इतकी भित्री ! बरं जा—आंतल्या माडींत नीज जा. माझीं पुस्तकं इकडे तिकडे करूं नकोस हं—"

सुलोचना मला सोडून जाण्यास तयार नव्हती. शेवटीं ' नाहीं ' ' हो ' करतां करतां एका हातानें मनाच्या समजुतीकरतां माझा हात धरून ती तेथेंच जमिनीवर झोंपली. तिच्या हाताशीं खेळत मी विचार करूं लागलों.

मृत्यू आमच्या घरांत या वेळीं वावरत होता. एखादें जड कपाट उचल-

तांना ज्याप्रमाणें आपण आधीं हात लावून अदमासें वजन किती असेल हा अंदाज बांधतों त्याप्रमाणें बाबांना कोणत्या बाजूकडून उचलून न्यायचें इत्यादि विचार आपापसांत मृत्यूचे दूत करीत असतील. मला जर तो पडद्या-आड चाललेला प्रकार पहाण्याची शक्ति असती तर—! ती शक्ति नाहीं हेंच एका अर्थी बरें आहे. आशेचा धागा तेवढाच एक गहूंभर ताणला जातो !

मृत्यू ! कोणी कांहींहि म्हणालें तरी मृत्यू वाईटच. लठ्ठ लठ्ठ संस्कृत शब्दांत 'मरणं प्रकृतिः' म्हणून उपदेशाचें जाळें पसरलें तरी, अनुभवानें समजतें कीं मृत्यू वाईट ! एरवीं जगांतलीं सारीं तत्त्वज्ञानें पटतात, पण मृत्यूच्या समोर एकच गोष्ट डोळयांपुढें उभी रहाते—ती ही कीं, मृत्यू वाईट आहे ! प्रत्यक्ष मृत्यूच्या समोर मी बसलों होतों.

मीं बाबांच्या हाताकडे सहज पाहिलें. बाबांच्या लहानपणीं त्यांनीं ह्या हातांनीं काय काय गोष्टी केल्या असतील—! जीं बोटें लहानपणीं रस्त्यां-तून जाण्याचे वेळीं आधाराकरतां दुसऱ्या कोणाच्या तरी बोटांत अडक-विलीं गेलीं असतील तींच बोटें तरुणपणीं देवाब्राह्मणासमक्ष माझ्या आईच्या बोटांत अडकविलीं गेलीं. त्याच बोटांचा आधार मीं प्रथम शाळेंत जातांना घेतला होता. तींच बोटें मला वारंवार खेद उत्पन्न करीत असत. तींच बोटें दुकानीं राहूला आश्चर्यचकित करून सोडीत—आज तीं बोटें निर्बल, निस्तेज होऊन थरथर कांपत आहेत. मृत्यूच्या भेटीनंतर उद्यां तीं बोटें कुठें असतील ?

बाबांनीं प्रथम या जगाकडे डोळे उघडून पाहिलें असेल तेव्हां त्यांचे उघडलेले डोळे पाहून आतां आपले डोळे मिटले तरी हरकत नाहीं असें मानणारी त्यांची माता कोण धन्यता पावली असेल ! पहिलटकरिणीला तर विशेषच धन्यता वाटणार. तिला ह्या एवढ्याशा दोन डोळ्यांचें सारखें कौतुक करावेंसें वाटत असेल, 'अगबाई, हंसला' म्हणून बाबांना तिनें पुरेपुरेसें करून सोडलें असेल. त्याच डोळ्यांनीं बाबांनीं जगांतल्या इतर वस्तू पहाण्यास सुरुवात केली. त्याच डोळ्यांनीं त्यांनीं इतर मृत्यू पाहिले असतील. त्याच डोळ्यांनीं त्यांनीं लग्नाच्या वराती पाहिल्या असतील.

तारुण्याच्या उन्मादांत रस्त्यांतून जाणाऱ्यायेणाऱ्या कित्येक स्त्रियांकडे त्याच डोळ्यांनीं पाहिलें असेल. त्याच डोळ्यांनीं त्यांनीं अंतरपाट दूर होतांच आईकडे चोरून पाहण्याचें धाडस केलें असेल. त्याच डोळ्यांनीं त्यांनीं माझा जन्म पाहिला. त्याच डोळ्यांनीं त्यांनीं मला जरब बसविली. त्याच डोळ्यांना राहू भीत असे. त्या डोळ्यांचा दरारा आईलासुद्धां जाचक होऊं लागला. मला शिक्षा करण्याच्या उद्देशानें सहा महिन्यांपूर्वी मुंबईहून आलेले बाबा त्याच डोळ्यांनीं माझ्याकडे पहात होते—काल आईकडे रागानें पहणारे हेच ते डोळे. त्यानंतर मला भिणारे ते हेच डोळे—उद्यां ते कुठें जातील? एवढेंच त्यांच कार्य !

किती बेभरंवशाचा कारभार आहे ! मनुष्य परगांवीं गेला किंवा जरा दृष्टीआड झाला तर लगेच शंका येऊं लागते. उद्यां जर जनरल पोस्ट-मास्तरनें एक दिवसाचीं पत्रें जमा करून ' आम्ही खुशाल आहोंत ' या अर्थाच्या मजकुराचीं पत्रें निराळीं काढलीं तर, जिवाला जपणारे आणि मृत्यूला भिणारे लोक किती सांपडतील ? सारे ! आम्ही खुशाल आहोंत म्हणजे ' अजून मेलों नाहीं ' हा उघड अर्थ आहे. यावरून मृत्यूचा भरंवसा देतां येत नाहीं हें दिसून येत नाहीं काय ? तरुणपणीं लग्न करून देण्यांत येतें. आयुष्याचा भरंवसा मुळींच देतां येत नाहीं—पण साऱ्या गोष्टी केवळ अंध विश्वासानें चाललेल्या असतात. जन्मल्यापासून संस्कार चालू असतात. त्या संस्कारांची शेवटची मर्यादा म्हणजे मृत्यू. मृत्यूनंतर होणारे संस्कार त्या प्राण्याला समजण्याजोगे नसतात.

बाबांचें आयुष्यांतलें ध्येय काय असावें ? मनुष्याला विचार करण्याच्या शक्तीबरोबर कांहीं तरी ध्येय ठरविण्याची बुद्धि असते. बाबांनीं तें ध्येय गांठलें होतें का ?

जगांतील साऱ्या ध्येयांची हीच वाट. उरापोटाशीं कवटाळून धरलेल्या आशा, आकांक्षा, महत्त्वाकांक्षा—या अशा फोल होतात ! कां ? ध्येयाची पूर्तता होण्यापूर्वीच जिवाला या जगाबाहेर पडावें लागतें. बाबांच्याविषयीं आतांपर्यंत वाटणारा तिरस्कार कोटच्या कोठें निघून गेला. बाबा आणि मी समदुःखी होतों. कांहीं तरी एक विशिष्ट ध्येय बाबांनीं आपल्या मना-

पुढें ठेवलें असेल. तें ध्येय गांठणें अशक्य वाटल्यावरून त्यांचा पुढचा संसार असा जिकीरीचा झाला असावा. अखिल मनुष्यजातीची ही कथा आहे. बाबा ही एक निराळी व्यक्ति नसून मनुष्यजातीचे एक घटक होते. मला बाबांची कींव करावीसें वाटूं लागलें. मनुष्यजातीची कींव करावी तेवढी थोडीच आहे.

रात्रीं बारा एकच्या सुमारास बाबांनीं पुन्हां उचल घेतली, हें धर्मयुद्ध नव्हतें. एका बाजूनें सर्व विश्वाला दरारा बसवणारी शक्ति आणि दुसऱ्या बाजूनें साडेपांच फूट उंचीच्या देहामध्यें कोंडला गेलेला एवढासा परिमाणू, यांच्यामध्यें ही लढाई चालू होती. निराशेची उसळी मोठी विलक्षण असते. बाबाच्या एवढ्याशा परिमाणूनें विश्वाच्या संहारकर्त्याला दूर लोटलें. पुन्हां बाबांचा श्वास पूर्वीसारखा सुरळीत चालू झाला. पण हा विजय ओढून घेण्यांत बाबांनीं आपली शिकस्त केली होती. दुसरी एखादी चकमक आणि—! पुन्हां बाबांची चर्या पालटूं लागली. इतक्या जवळ असून आई काय करणार? आणि मी तरी काय करणार? अगदीं जवळचे झालों तरी या यातनांतून बाबांची सुटका करणें आम्हांला शक्य नव्हतें. ही लढाई ज्याची त्यानें लढावी लागते. दुसऱ्याच्या मदतीची अपेक्षा करणें शक्यच नसतें. बाबांना संग्रामक्षेत्रावर सोडून आम्ही स्वस्थपणें बाजूला उभीं राहिलों.

बाबांचा आतां मुळींच भरंवसा नव्हता. पहिल्या झटक्यानें त्यांची चांगलीच परीक्षा पाहिली होती. आतां पुन्हां दुसरा झटका यऊं लागला तेव्हां बाबा घाबरले! "सदू—" म्हणून त्यांनीं खोल आवाजांत मला हांक मारली. मला बाबा कांहीं तरी सांगणार या विचारानें मी जवळ झालों—पण तो शेवटचा झटका माझ्याआधींच त्यांच्याजवळ जाऊन पोहोंचला होता. हातपाय घांसून बाबांनीं पुन्हां तोंड देण्याची तयारी केली. पलंगावर पालथें पडून ते अंगाला पीळ घालूं लागले. मी त्यांच्या या कृतीकडे स्वस्थपणानें पहात होतों.

एक जोराचा हिसडा देऊन अंगाभोंवतीं फिरणारा शत्रू दूर लोटण्याचा त्यांनीं प्रयत्न केला—पण त्याच वेळेला त्यांचा तोल सुटला. पलंगाच्या

कठड्यावर त्यांचें डोकें आपटलें. बाबांनीं मान वांकडी केली—. आणि पराजय कबूल केला. सहा महिन्यांपूर्वीं याच माडींत बाबांनीं एका काठीच्या वारासरशीं दिव्याची ज्योत आपण होऊन मोठ्या निष्ठुरतेनें विझविली होती. ह्याच माडींत काळानें त्यांची प्राणज्योत तितक्याच निष्ठुरतेनें विझवून टाकली होती !

सुलोचना स्वस्थपणें जमिनीवरच निजली होती. माझा हात समजून अजून तिनें खुर्चीच्या पायाला धरलें होतें. तिला मीं हलकेच जागें केलें. ती दचकून उठली—

"सुली, चल माझ्या जागेवर जाऊन पड.— तूं आतां इथं बसण्याचं कारण नाहीं—" मी तिला उठवीत म्हणालों. तिनें बाबांच्याकडे पाहिलें आणि झटकन् माझा हात पकडला. मीं मानेनेंच तिच्या मूक प्रश्नाला उत्तर केलें. तिला माझ्या जाग्यावर नेऊन मीं बसवलें, पण ती मला सोडायला तयार होईना.

"खुळी आहे—" म्हणून मी अंथरुणावर घटकाभर बसलों. तिनें माझ्या मांडीवर डोकें ठेवून शान्त चित्तानें झोंपायला सुरुवात केलेली पाहातांच मी हलकेंच उठलों. तिच्या मानेखालीं उशी घालून ठेवली. अंगावर चादर टाकून दिली. सुलोचना अंगाचा मुटकुळा करून निजून राहिली. मी मुकाट्यानें पाय न वाजवतां बाहेरच्या माडींत आलों. मनुष्य मेल्यावर त्याला क्षणभरसुद्धां घरांत ठेवणें शक्य नसतें !

# प्रकरण २२ वें



## सुलोचनेचा दृष्टिकोण

दोन वर्षांचा अवधी लोटला. दोन वर्षांमध्यें ज्या कांहीं गोष्टी बदलल्या त्या गोष्टींत सुलोचनेचा बदललेला दृष्टिकोण ही एक महत्त्वाची बाबत आहे. निसर्गानें तिला त्या क्रमांत मनापासून मदत केली होती. निसर्गानें तिच्या देहांत फरक घडवून आणला होता. आजूबाजूच्या लोकांनीं तिच्या मनांत फरक घडवून आणला होता.

पूर्वींची सुलोचना आतां ओळखूं येणें मुष्किल होतें. पूर्वींच्या सुलोचनेला आपल्या शक्तीची जाणीव नव्हती, त्यामुळें ती सरळ मनाची होती. आतांची सुलोचना एक एक पाऊल मोजून टाकूं लागली. आपण चार लोकांना आपल्याकडे बघायला लावतों, हा विचार तिच्या डोक्यांत खेळूं लागला. आतां ती तेढ्या मनाची झाली होती. बालिशपणा संपला होता तरी बालिशपणाच्या लीला करण्यांत ती आनंद मानूं लागली. तिचा पूर्वींचा आवाजसुद्धां बदलला होता. मला तिच्या त्या अरळ जिभेनें चाललेली बडबड ऐकून कंटाळा येई.

एके दिवशीं संध्याकाळीं मामीच्या मांडीवर डोकें टेवून ती पडली होती. मी पलीकडे खुर्चीवर बसून ऐकत होतों.

" मामी, ( तोंड फुगवून ) आमच्या वर्गावरच्या बाई मोठ्या वाईट आहेत. परवां त्यांनीं ( दांतांच्या सापटींतून वारा आंत ओढीत ) घरून डिक्शनरींतून शब्द काढून आणायला सांगितलं, बरं का ! तशी ( पुन्हां वारा आंत आणून ) मीं कांहीं नेले नाहींत; तेव्हां ( मास्तरीणबाईसारखा आवाज काढून ) म्हणतात कशा कीं, तुम्हाला खेळायला पाहिजे, अभ्यास करायला नको. तुम्हांला थोरल्या बाईपुढं नेऊन उभं केल्याशिवाय तुम्ही सरळ येणार नाहीं. ( मामीच्या मांडीवर डोकें घुसळून ) थोरल्या बाईच्या कानांवर ही गोष्ट गेली; त्या वर्गांत आल्या—" वगैरे वगैरे कथा त्या त्या

अभिनयासहित चाललेली होती. पूर्णविरामाचा पत्ता नाहीं. बोलतांना कुठेंहि वाक्य तोडावें, कांहीं तरी वेड्यासारखे तोंडानें आवाज काढावेत— ही आमची शिकलेली मुलगी. ही आमची हल्लींची शाळेंत जाणारी मुलगी—

केवळ लग्न होईतोंपर्यंत वेळ जाण्याला उत्कृष्ट साधन म्हणजे शाळेंत जाणें, ही जेथें मूळ कल्पना तेथें या प्रकाराशिवाय दुसरें अधिक काय दिसून येणार ?

" मग बाईंनीं शब्द काढून आणायला सांगितलं, त्यांत त्यांचा वाईट-पणा कुठं दिसून येतो ? " मी मध्येंच म्हणालों.

" पण——एवढ्याशाकरितां थोरल्या बाईंना त्यांनीं कशाला सांगावं ? हा भोचकपणा नाहीं का ?" सुलोचना म्हणाली.

" तुम्हांला शिस्त लावतांना ती दमली असेल, म्हणून थोरल्या बाईंची मदत मागितली तिनं——" मी म्हणालों.

" तें कांहीं नाहीं. एकदां मनुष्य वाईट कीं तें सात जन्म वाईट——" सुलोचना म्हणाली.

" तुम्ही मुली आहांत चटोर. मामी, लग्नाची वयोमर्यादा वाढल्यामुळं मुली रिकामा वेळ हा असा घालवतात. बघ, ' परधन ' म्हणून आईबाप तिला जिवापलीकडे माया लावतात. बाहेर शिक्षणाच्या बाबतींत त्यांना कांहींच गुमान नसतें. शिक्षण म्हणजे अकरा ते पांचपर्यंत खेळायला निमित्त—" मी म्हणालों.

" मग आठ वर्षांच्या मुलींचीं लग्नं लावणं चांगलं का ? " मामी हंसून म्हणाली.

" कोण चांगलं म्हणतो ? पण हें शिक्षण——हें हल्लींचं शिक्षण काय उपयोगी ? मामी, तूं माझा एक मित्र साठे आहे त्याला बोलतांना ऐकलं नाहींस. तो या बाबतींत ज्ञानवृद्ध आहे " मी म्हणालों.

" तुम्हां मुलांना नाहीं तरी मुली जरा मोकळ्या फिरूं लागल्या कीं संताप येतो. काय मुलींनीं तुमचं घोडं मारलं आहे रे ? तुम्हांला वाटेल तसं वागायला पाहिजे. तुम्हांला जीव आहे अन् त्या काय लांकडाच्या बाहुल्या

आहेत ?—बायकांच्या विरुद्ध बोलणाऱ्या मुलांच्या तोंडाला एक कडीकुलूप अडकवून टाकलं पाहिजे. बाकी इकडे तरी काय ? तोच फर्मा. तुम्ही सारे पुरुष एके ठिकाणीं संगनमत करतां का रे ? मामी म्हणाली.

"एके ठिकाणीं संगनमत करीत नाहीं, पण प्रत्येकाला अनुभव येतो तो एकच असतो. म्हणून आमचे विचार इतके एक सांच्याचे दिसतात." मी हंसून म्हणालों.

कदाचित् माझ्या दृष्टींत फरक पडला असावा. आणि त्यामुळें सुलोचना बदलली असा भास होत असावा. शकुन्तला माझ्या दृष्टीस पडण्याचे पूर्वी सुलोचना मला गैर दिसत नसे. पण शकुन्तलेला पाहिलें आणि सुलोचना थोडीशी परकी वाटूं लागली. त्या दिवसापासून दोघींमध्यें तुलना करण्याचा मला चाळाच लागून राहिला. हरएक बाबतींत शकुन्तला विजयी ठरत असे. शकुन्तलेनें गवताच्या काड्या खाल्ल्या तरी त्या काड्यांचा पुरवठा करण्यांत मला धन्यता वाटे. मला वाटतें, शकुन्तलेनें दररोज दहा पेंढ्या गवत खाल्लें असतें तरी मी तिच्याकरतां महिन्याच्या बोलीनें भारा लावला असता. सुलोचना यःकश्चित् तोंडांत पेन्सिलीचें टोंक घालूं लागली कीं, मला तें कसेंसेंच दिसे. आणि पेन्सिली तोंडांत घातल्यापासून फायदे या विषयावर एक सडेतोड व्याख्यान मी तिला ऐकवीत असें.

शकुन्तलेनें कॉलेजला रामराम ठोकला, त्यामुळें तिची गांठ घेणें अशक्य होऊन बसलें. जी गोष्ट ज्या वेळीं करायला पाहिजे ती गोष्ट लांबणीवर टाकली म्हणजे कोण यातायात पडते हें मला कळून आलें. शकुन्तला आज कदाचित् माझे नांवावर हक्क सांगूं लागली असती, पण मीं होऊन ती संधि घालवली. त्यानंतर एकदां बुधवारांत मीं तिला पाहिलें, पण मामा बरोबर असल्यामुळें मला उलट बाजूला तोंड करून चालावें लागलें.

सुलोचनेच्या लग्नाची प्रस्तावना सुरू झाली. मामींनीं आईला एके दिवशीं विचारलें,

"सदू जें काय करील त्याच्यांत मला आनंद आहे. मी कांहीं त्याला

अमुकच मुलगी पहा किंवा तमुकच मुलगी पहा, असं सांगणार नाहीं. वहिनी, ही जन्माची गांठ आहे. आपल्याकडे मुलीला विचारण्याची पद्धत नसली तरी मुलाला या बाबतींत स्वतंत्रपणं विचार करूं देण्याची पद्धत पडूं लागली आहे. मी त्याला एका शब्दानं या बाबतींत बोलणार नाहीं. त्याचं त्याला वाटेल तेव्हां तो लग्न करील. घरीं आणील त्या मुलीला जीव लावण्याचं तेवढं मला माहिती आहे. त्याचं त्यांनीं समजून लग्न केलं म्हणजे निदान त्या पोरीचं पुढचं आयुष्य तरी सुखानं जाईल—मी आयुष्यापासून धडा शिकलें आहें. पत्रिकेच्या आंकड्याचं लग्न म्हणजे चालत्या बोलत्या जीवांचं लग्न नाहीं. आमचे पत्रिकेंत छत्तीस गुण जमत होते, म्हणूनच ना असा छत्तिसाच्या आंकड्याप्रमाणं संसार झाला—? तें कांहीं नाहीं. उगीच पत्रिकेच्या नादानं मनुष्य फसतं—एकमेकांच्या सल्ल्यानं झालं म्हणजे निदान हें आमच्यासारखं खडाष्टक तरी उडणार नाहीं.'' आईनें स्पष्ट शब्दांत आपल्यावरची जबाबदारी उडवून लावली. आईनें पूर्वींच्या पद्धतीचे झालेले खेळ स्वतः अनुभवलेले असल्यामुळें तिनें असें बोलावें यांत मुळींच नवल नाहीं.

माझ्यापुढें हा एक पेंचच होता. शकुन्तला पुन्हां भेटेल अशी अजून मला थोडीशी आशा वाटत होती. ती एकदां भेटली कीं लाज वगैरे गुंडाळून मी तिला स्पष्टपणें विचारणार होतों. ती स्पष्ट उत्तर देईल कीं नाहीं ही एक शंकाच होती; पण तिच्या डोळ्यांवरून थोडा तरी अंदाज येईलच कीं नाहीं! तिची संमति असेल तर साठ्याकरवीं तिच्या भावाशीं बोलणें सुरू करावें. आपल्याकडून मामांना पोक्त माणूस म्हणून पुढें ढकलावें. हा विचार परिस्थितीशीं अजिबात जुळता नव्हता हें मला कबूल आहे. अजून मुलाकडच्या लोकांनीं मुलींकडच्या लोकांना विचारायला जायचें हें आपल्याकडे मूर्खपणाचें लक्षण समजलें जातें. पण मी त्यालाहि तोंड द्यायला तयार होतों.

पण शकुन्तला दीड वर्षाच्या अवधींत एकदांसुद्धां भेटली नाहीं. तेव्हां मला साहजिकच तो विचार बाजूस ठेवणें भाग पडलें. मामी तर मला दुसरें कांहीं एक सुचूं देईना. तसें म्हणायला गेलें तर, मीं स्पष्ट शब्दांत

नाहीं म्हणून सांगितलें असतें तर ती मला खाणार होती थोडीच ! पण आपण भीड नको म्हणून कितीहि म्हटलें तरी, आयत्या वेळीं भीड पडल्यावांचून रहात नाहीं. लहानपणापासून मला मामा—मामींचा लळा असल्यामुळें अजूनहि मी त्यांच्याकडेच बहुतेक असें. त्यांची निराशा करणें माझ्या जिवावर येत होतें. स्पष्ट नाहीं म्हणून मीं त्यांना कधींच उत्तर केलें नाहीं; पण ते माझ्या आशेवर स्वस्थ बसलेले पहातांच आपण हें दुटप्पी वर्तन ठेवणें चांगलें नाहीं असें राहून राहून वाटूं लागे.

ध्यानीं, मनीं, स्वप्नीं नसतांना मला याच वेळीं बन्याशीं शेवटचा सामना द्यावा लागला. आणि कारणहि तितकेंच अनपेक्षित होतें. बन्या लहानपणापासून माझ्याशिवाय नेहमीं मामांच्याकडे जात येत असे. नेहमीं येणें जाणें पडल्यामुळें तो घरांतल्यासारखा वागूं लागला. आमच्या चक-मकी वारंवार उडत होत्या, तरी बन्या मामांच्याकडे जाण्याचें सोडीत नसे. दुकानाच्या मालकी हक्कासंबंधानें जो आमचा खटका उडाला त्यांत बन्याला बरेंच खालीं पहावें लागलें. मामांचें त्याचें कदाचित् भांडणहि झालें असतें. पण बन्यानें मामांची सपशेल माफी मागितल्यामुळें पुन्हा त्याला कोणी हटकेनासें झालें. अलिकडे अलिकडे तर तो दररोज बंगल्या-वर नियमितपणें जाऊं लागला.

त्याच दिवशीं संध्याकाळच्या सुमारास साठ्यानें मला सूचना केली होती. प्रथम तो थोडासा सावरून बोलूं लागला,

" देव, हा बन्या कुलकर्णी तुमचा कोणी लांबचा नातेवाईक आहे का ? " साठ्यानें पहिला प्रश्न हा केला.

" कां रे बाबा ? लांबचं नातं म्हणशील तर तुझं विश्वबंधुत्वाचं नातं आहे मात्र—" मी हंसून म्हणालों.

" होय ! त्या विश्वबंधुत्वाच्या नात्याचा तो फायदा घेऊं लागला आहे असं आज मला नक्की कळलं—" साठे म्हणाला.

" म्हणजे लोकांचे खिसे आपले समजून त्यांतली लक्ष्मी आपल्या घरांत ओतूं लागला कीं काय ? " मी म्हणालों.

" त्यापेक्षां भयंकर आहे ! देव, तूं आणि तो एक व्हाल अन् मला

गाढव समजून हंसाल. तें पत्करून मी तुला एक सल्ला देतों कीं, बन्यापासून सावध रहा. वरून दिसणारी शोभिवंत हिरवळ सापाला आश्रय देत असते. बन्या हा एक साप आहे—शिकलेला साप आहे. त्याचा दंश होण्याच्या आंत तूं त्याला हुसकावून लाव—" साठे गंभीर मुद्रेनें म्हणाला. पण बन्याला एवढें भिऊन वागण्याचें मला कारण उमगेना.

"साप साप म्हणत भुई धोपटावी असली फसगत झाली तर?" मीं आपली शंका पुढें मांडली.

"तसली फसगत झाली तर आनंद आहे. पण फसगत न होतां खरोखरच तसा प्रकार असेल तर, मग मात्र तुझ्या नंदनवनाला आग लागेल. त्या आगींत तूं होरपळून निघशील." साठे मनापासून बोलत होता.

"बरं, उद्यांपासून मी त्याच्या बंदोबस्ताला लागतों." मी त्याची समजूत करण्याकरितां म्हणून म्हणालों.

"खरोखरच, मनुष्य इतका पशू बनत असेल काय? सुधारणा झाल्या, आयुष्यांत काय कल्पनातीत फरक घडून आला, राष्ट्रांच्या नकाशांत इतका बदल घडून आला तरी मनुष्यांत काय फरक झाला आहे? पैशाकरितां पाशवी वृत्ति धारण करणं हा आपला धर्मच आहे कीं काय? मनुष्याला सोबत म्हणून निर्माण केलेली स्त्री त्याच्याच नाशाचं कारण व्हावी ना? स्त्री नवीन नातं निर्माण करते त्याचप्रमाणं जुनीं नातीं तोडून टाकते!" साठे म्हणाला.

"पुन्हां तूं स्त्रियांच्यावर घसरलासच! साठे, तुझ्या तोंडाला कडीकुलूप अडकविण्याचा मला आमच्या मामींनं सल्ला दिला आहे—पण तुझी बायको आली म्हणजे—" मी हंसत हंसत म्हणालों.

"ह्याला विनोद म्हणतात का? आतां मी कुठं हंसूं तें सांग—" साठे गंभीर मुद्रा कायम ठेवून म्हणाला.

"बायको आली म्हणजे तूं तिच्यापुढं हंस–" मी पुन्हां हंसून म्हणालों.

"शिकलेल्या पोरांना बायको हा विनोदाचा विषय वाटतो! म्हणे तूं तिच्यापुढं हंस. ती तुझ्यापुढं हंसेल. पण तिच्या हंसण्यानं कैक वेळां रडायची पाळी आपल्यावर येते त्याची वाट काय?" साठे म्हणाला.

" तूं सदा अशीं रडगाणींच गात जा. तत्त्वज्ञानाच्या गंभीर नांवाखालीं तुम्ही या जगांत पोटभर रडून घ्या. कोण तुमचं रडणं ऐकून घेणार ? " मी म्हणालों.

संध्याकाळीं दुकान बंद करून मी मामांच्याकडे गेलों. साठ्याच्या शब्दांमुळें माझ्या मनाला मात्र रुखरुख लागून राहिली. बन्या कोणत्या बाजूनें दंश करील हें मला नक्की कळेना. तरी पण तो दंश करायला मागें घेणार नाहीं ही माझी खात्री होती. साठ्यानें मला सूचना देतांना कोण सावधगिरी बाळगिली होती !

मला साठ्याचें हंसूंच येऊं लागलें. आधींच परमेश्वरानें साठ्याला सौन्दर्य पुरविण्यांत काटकसरीची सबब पुढें आणली होती. त्यांत सोलापूरच्या भागांत जन्म गेल्यानें कानडी चालीवर मराठी बोलतांना तो मधून मधून चमत्कारिक हेल काढी. मी त्याला या बाबतींत बोललोंसुद्धां होतों; पण संवयच जडल्यामुळें त्याचा नाइलाज होता. रस्ता चालत असतांना कां कुणास ठाऊक, मला त्याच्याविषयीं जास्त आदर वाटूं लागला. त्याची आणि माझी ओळख कोठल्या परिस्थितींत झाली होती ? चार चटोर पोरांनीं फुटबॉलप्रमाणें इकडून तिकडे लाथाळलेलें हें एक बाहुलें होतें. साठ्याचे विचार अजून परिपक्व नव्हते. तरी त्याला विचार करण्याची शक्ति होती. तारुण्यांत बांधलेले आडाखे अनुभवानें पुढें फसतात, असें म्हणतात. तें जर खरें असेल तर साठे आपलीं प्रमाणें खोडून काढील का ? का तोहि जुन्या पिढींतील लोकांप्रमाणें आपल्याच मताला चिकटून राहील ? आपलें तेवढें खरें, असा अविचारीपणा तो करील का ?

एकदां तो सहज बोलतां बोलतां कोनाड्याबद्दल ' देवळी ' हा शब्द बोलून गेला होता. मी त्याला हंसलों. त्यानें माझ्याशीं कोण वाद घेतला ! सुमारें एक तासाच्या खडाजंगी वादविवादानंतर त्यानें ' कोनाडा ' या शब्दाचें मोठेपण बिनशर्त कबूल केलें. त्याचप्रमाणें तो आपलीं चुकीचीं मतें मागें घेईल—भांडेल, पण चुकतें आहे हें पटलें कीं माघार घेईल. साठे उदारमतवादी होता.

विजार ' पेहनणें ' या शब्दाबद्दल आम्ही पुष्कळच भांडलों—पण

त्यानें माघार घेतली. ‘घालणें, नेसणें, वापरणें’ यांपैकीं कोणताहि शब्द वापरणें त्यानें बिनशर्त कबूल केलें. साठे खरोखरीच उदार मनाचा होता.

पण बन्याविषयीं साठ्याला इतकी भीति कां वाटावी ! मीं सहज पुढें पाहिलें. विचार करीत करीत मी मामांच्या बंगल्याच्या फाटकापर्यंत आलों होतों. मी अदृश्य साठ्याला दूर करून आंत शिरण्याकरतां फाटकाच्या खांबावर हात ठेवला. मी आंत गेलों. सैंपाकघरांत मामीचा पत्ता दिसेना, म्हणून सुलोचनेच्या खोलीकडे वळलों. बाहेरून खोलींत अंधार दिसत होता. घरांतलीं माणसें घर मोकळें सोडून जातात तरी कशीं, याचें आश्चर्य करीत मीं सुलोचनेच्या खोलीचें दार उघडलें.

मीं दार उघडलें नसतें तरी बरें झालें असतें असें मला वाटूं लागलें. निदान आंतल्या लोकांना इशारा देऊन दार उघडलें असतें तरी बरें झालें असतें. सुलोचना कुणाच्या तरी अंगावर रेलून उभी असलेली मीं प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलें. मला एकदम साठ्याच्या शब्दांची आठवण झाली. सर्प——हिरवळीवरचा विषारी सर्प ! बन्या तर नसेल हा ? दरवाजा उघडा पहातांच सुलोचना दूर झाली. मी शक्य तितक्या शांत आवाजांत म्हणालों.

“ दिवा कां नाहीं लावलास ? मामी कुठें आहेत ?” न कळत माझ्या आवाजांत तीव्रतेची झांक मारूं लागली.

सुलोचनेनें दिवा लावला. बन्या मला पहातांच खुर्चीवर बसला. मीं सुलोचनेकडे रागानें पाहिलें.

“ मामी कुठं आहेत ? ” मीं पुन्हां प्रश्न केला.

“ शेजारच्या यमूकाकूंनीं कशालासं बोलावल्यामुळं ती आत्तांच त्यांच्याकडे गेली आहे. बन्या मला सोबत म्हणून बसला आहे. आत्तांच आई यमूकाकूंकडे गेली——” सुलोचना छपवाछपवी करूं लागलेली मीं तेव्हांच ओळखली.

“ माझ्या प्रश्नाचा अर्थ नीट लक्षांत घे अन् मग उत्तर दे. आत्तां मामी बाहेर पडली का तिला बाहेर पडून तास झाला आहे, हें मी विचारलं

नव्हतं. आणि वेळेचं भान राहाण्याइतकी तुम्हांला शुद्ध असेल तर ना-!" मी खोंचून म्हणालों.

बन्यानें माझ्याकडे खुनशी मुद्रेनें एकवार पाहिलें. मी त्याच्यापुढें जाऊन उभा राहिलों.

"सुलोचने, दरवाजा लावून घे. या वेळीं कडी लावायला विसरूं नकोस. आपलं बोलणं षट्कर्णी व्हावं असं मला मुळींच वाटत नाहीं. लावलीस कडी? तूं टेबलावर बसलीस तरी चालेल. तूर्त तूं नुसतं ऐकून घे. खुद्द तुलाच असे प्रश्न मी मागाहून विचारीन. बन्या चार शब्द बोलायला तुझी परवानगी घेऊं का--?" मी म्हणालों.

"त्यांत परवानगी कशाला पाहिजे? चार शब्द सोडून चार हजार शब्दांचीं व्याख्यानं झोडलींस तरी माझी कांहीं हरकत नाहीं. पण लक्षांत ठेव, कीं त्यांत तुझाच तोटा आहे. मामी आत्तां परत येतील. सुलोचनेनं तुला थाप मारली. मामी बाहेर पडून अर्धा तास होत आला आहे--" बन्याचा हा जिभेचा पट्टा पाहून मी दचकलों. सुलोचना मध्यें बोलण्याचा प्रयत्न करूं लागली, पण मीं तिला बोलूं दिलें नाहीं. बन्या स्वतःशींच हंसत होता.

"बन्या, मी शिक्षणानं इतका भ्याड बनलों नसतों तर आज तूं या घराबाहेर जिवंत पडला नसतास" मी म्हणालों.

"मी कसाहि बाहेर पडलों असतों, पण बरोबर तुला घेऊन पडलों असतों." बन्या चिडून बोलूं लागला.

"बन्या, तूं इतका उलटया काळजाचा असशील ही मला नव्हती कल्पना. बन्या, देवाला स्मरून सांग, या मुलीच्या अंगावर हात ठेवतांना तुला पापवासना शिवली नाहीं---?" मी ओरडून म्हणालों.

"मी कुठं नाकबूल जातों आहें! आज नाहीं उद्यां सुलोचना बाहेरचे किस्से गिरवायला लागली असती! पण इतकं ओरडून कशाला विचारतोस?" बन्या शांतपणें म्हणाला.

"कां? दुसऱ्या कुणाला कळेल म्हणून घाबरतों आहेस?" मी पूर्वीच्याच उंच स्वरांत म्हणालों.

" मी ? अन् घाबरतों ? सदू, अजून तूं पूर्वीइतकाच बावळट आहेस. मला भिण्याचं काय कारण ? भीति त्या पोरीला. अन् तिच्यामुळं तुला. माझी अब्रू बाहेर काढण्याचा प्रयत्न केलास कीं ह्या पोरीचा बळी पडेल—" बन्या म्हणाला.

बन्या जितक्या शान्तपणानें उत्तराला उत्तर देत होता तितका मी चिडलों होतों.

" झाले का प्रश्न ? " बन्यानें उठून म्हटलें. मीं बन्याला दाबून धरलें.

" अशी तुझी सुटका होणार नाहीं. माझ्यापुढं केल्या कृतीचा जाब देणं तुला भाग आहे. या मुलीशीं विवाह करण्याची तुझी तयारी आहे का ?––मनानें तिनें तुला पसंत केलं आहेसं दिसतं—" मी मुलीकडे पाहून म्हणालों.

" ती खूप वरील—पण मी कसं तिला वरूं देईन ? सदू, शहाण-पणा तुझा पुरे कर. ह्या पोरीचा अशामुळें मुळींच बचाव होणार नाहीं. आईबापांच्या लाडानं शेफारलेली ती एक खुळचट पोर आहे. तारुण्याच्या उन्मादानं तिचे डोळे बिथरलेले आहेत. मिळालेल्या स्वतंत्रतेचा तिनं माझ्या पायाशीं उपयोग केला.— तिला नीट गोडीनं सांग. अजून कौ-मार्यभंगाचं पातक तिच्या हातून घडलेलं नाहीं हें आपलं नशीब समज. अच्छा, येऊं का मी ? " म्हणून म्हणत बन्या उठला.

" बन्या, निदान तुला लाज वाटायला पाहिजे होती." मी ओरडून म्हणालों.

" अन् तुला लाज वाटण्याची कांहींच गरज नव्हती ? शकुन्तलेच्या पाठीमागं मारलेल्या चकरा इतक्यांतच विसरतोस ?"

बन्या तिरक्या नजरेनें माझ्याकडे पहात म्हणाला. सुलोचनेनें माझ्याकडे आश्चर्यानें पाहिलें.

" रात्रीं अपरात्रीं दुसऱ्यांच्या मुलींबरोबर सिनेमाला जायला तुला लाज वाटायचं काय कारण होतं ? शकुन्तला—"

" तिचं नांव या ठिकाणीं उच्चारण्याची कांहींएक जरूरी नाहीं—" मी ओरडून म्हणालों.

" जरूरी नाहीं? कां बरं? माझ्या तोंडांत तें पवित्र नांव शोभून दिसत नाहीं वाटतं ? सदू आणि शकुन्तला हा जोडा चांगला झाला असता; पण विधात्याला अक्कल नाहीं. बन्या आणि शकुन्तला हा जोडा कसा काय दिसेल ?" बन्या उपरोधिकपणें हंसून म्हणाला.

" तूं एक शब्द न बोलतां चालता हो—" मी त्याला ढकलून देण्याच्या उद्देशानें पुढें झालों. त्यानें खूण केली.

" थांब. माझ्या जाण्याची एवढी घाई कां ? पण कायमचं जाण्यापूर्वी मला एकवार त्या पोरीशीं बोलायचं आहे." बन्या म्हणाला.

" शक्य नाहीं. तूं आपला रस्ता पकड—" मी दरवाजाकडे बोट करून म्हणालों.

" अच्छा ! नाहीं तर नाहीं. तुझ्याशीं दोन शब्द बोलतों. शकुन्तलेची तुला थोडीशी माहिती देणार आहें—."

" तूं पुन्हां तिचं नांव काढलंस तर—" मी चवताळून म्हणालों.

" वाः !—असं कसं ? ती माझ्या नांवावर उद्यां हक्क सांगणार अन् मी तिचं एकदांसुद्धां नांव घेऊं नको !" बन्या हंसून म्हणाला.

" काय ?" मी दचकून म्हणालों.

" मला आतां गेलंच पाहिजे. पण जातां जातां तुला थोडक्यांत सांगतों. ज्या पांखराकरितां तूं आज दोन वर्षे धांपा टाकीत होतास तें पाखरूं लवकरच माझ्याशीं विवाहग्रंथीनं बद्ध होणार आहे. जगामध्यें पैशाला असा मान मिळतो. तुमच्या रात्रीं अपरात्रीचा मुलाखतींची तिच्या भावाकडे खास तार गेली होती. त्याचा परिणाम असा झाला कीं, तिचें शिक्षण संपुष्टांत आलं. मध्यें एक वर्षभर तिला त्यांनीं मुंबईला एका नातलगाकडे धाडून दिली होती. आतां ते कायमचे तिच्या त्रासांतून सुटण्याच्या विचारांत आहेत. आणि पैसा बोलतो, सदुभाऊ—! अच्छा !" म्हणून बन्या दरवाजाकडे वळला. मीं चटकन् धांवत जाऊन त्याचा हात धरला—

" बन्या, मला तिच्या घराचा पत्ता देतोस ? " मी मोठ्या आशेनें म्हणालों.

" छे ! सुलोचनेच्या बाबतींत तूं मला बोलण्याची बंदी केलीस त्याप्रमाणें शकुन्तलेच्या बाबतींत मी तुला बंदी करतों. काट्यानें कांटा काढणं, सदुभाऊ,—हा आपला धर्म आहे—" बन्या दरवाजा उघडूं लागला.

" जाऊं द्या सदूभाऊ, प्रेमाचा विसर लौकर पडत नाहीं, हें खरं असलं तरी, दुसऱ्याच्या विवाहित पत्नीवर प्रेम करणं हा गुन्हा आहे. कांहीं वेळानं विसर पडेल—" म्हणून विकट हास्य करीत बन्या निघून गेला.

" मला कांहींएक सुचेना. चलत्‌चित्रपटांतील छायाचित्राप्रमाणें एका पाठीमागून एक विचार ये जा करीत होते. पण एक विचार स्पष्ट कांहीं डोळ्यापुढें टिकेना. सुलोचनेकडे मीं पाहिलें. हातावर डोकें ठेवून ती स्वस्थ बसली होती. बन्याशीं विवाह हीच जर तिची आशा असेल तर उडालेल्या ठिकऱ्यांचीती जुळणी करीत असेल. बन्यानें तिला जगाच्या निष्ठुरतेची किमान मर्यादा व्यक्त करून दाखविली होती. सुलोचना मानी होती. मानाच्या उडालेल्या चिंध्या पाहून तिला काय वाटलं असेल ? मी हलकेंच तिच्या पाठीवर हात ठेवला.

झटक्यासरशीं तिनें माझा हात दूर केला. आणि हातावर डोकें टेकून तिनें रडण्यास सुरुवात केली. इतक्यांत मामी आंत आली. मी मामीला पहातांच दचकलों. तरीपण वेळ मारून नेण्याकरितां पुढें झालों—

" डोकं दुखतं आहे सुलीचं. थोडंसं अमृतांजन आहे का ? " मी मामीला म्हणालों. मामीनें सुलोचनेकडे तीक्ष्ण नजरेनें पाहिलें.—अमृतांजन डोक्याला चोळण्याचा सल्ला देऊन मी खोलीच्या बाहेर पडलों. दारांतच मामांची गांठ पडली. मामा आत्तांच हिंडून आले होते.—

" आज जेवण इकडेच ना ! मग जेवल्याशिवाय कुठं चाललास ? " मामा मला अडवून म्हणाले.

" नाहीं. मी घरींच जाऊन जेवणार आहे—" म्हणून म्हणत मी बंगल्याबाहेर पडलों. घरीं जाण्यास माझें मन घेईना. डोक्यांतले विचार शान्त करण्याकरितां म्हणून मनुष्य निर्मनुष्य अशा एकांत जागेकडे वळतो,

पण त्या ठिकाणीं त्याच्या अपेक्षेप्रमानें न घडतां विचारांची गुंतागुंत जास्तच घोटाळ्याची होत जाते.

सुलोचना कितपत दोषी ठरूं शकेल ? बन्या कितपत अपराधी आहे ? मी तरी शकुन्तलेच्या बाबतींत काय केलें होतें ? शकुन्तलेनें मला फूस दिली नव्हती ? ह्या सगळ्या चोरांमध्यें पट्ट चोर कोण ?

आणि आतां शकुन्तलेचा जन्म बन्याशीं हुज्जत घालण्यांत जाणार ? पैसा ! पैसा बोलतो तें कांहीं खोटं नाहीं. शकुन्तलेच्या इच्छेविरुद्ध हा संबंध घडून येणार ? अन् आयुष्यांत जर तिला सहानुभूतीची गरज वाटली तर—? सुलोचनेचे विचार अजून निश्चित झालेले नसल्यामुळें तिला अजून समजावून सांगतां येण्याजोगें होतें—शकुन्तलेचा विसर मला कसा पडणार ? अन् विसर न पडून भागेल कसें—!

---

# प्रकरण २३ वें

## शरणार्थी अप्पा

सकाळीं उठून मी साठ्याच्या घरीं गेलों.

तोंडानें ताणांची भिरभिरी चालू ठेवीत स्वारी हातानें ट्रंका भरण्याच्या उद्योगांत होती—

" संन्यास बाबा हा—बी. ए. होण्याचा विचार होता. पण तें आतां जुळणं शक्य नाहीं—" साठे मला उद्देशून म्हणाला.

" कुठं जाणार आहेस ? " मी आश्चर्यानें म्हणालों.

" कुठं जाणार ? घर सोडून पळालेलं पश्चात्तापी पोर पुन्हां कुठं वळणार ? दिवसभर काबाडकष्ट करून अंगाचा घाम काढणारा मजूर रात्रीं कुठं आश्रयाला जाणार ? घर—घराशिवाय आपण जाणार तरी कुठं ? देव,—

आपली ही शेवटची मुलाखत आहे. आमचा शरणार्द्री अप्पा घ्या—" म्हणून म्हणत साठ्यानें हात जोडले.

" कधीं मधीं बोलतांना एकाद दुसरा शब्द वांकडा गेला असेल त्याची उदारमनानें क्षमा कर. वडिलांची रात्रीं तार आली आहे. वडील अत्यव्यस्थ आहेत. सदू, मनुष्याचा कितीहि राग आला तरी त्याचे हाल व्हावेत असं आपल्याला कधींहि वाटत नाहीं. आपला धर्म अहिंसेचा आहे. रक्त पाहिलं कीं डोळ्यांपुढं काजवे चमकूं लागतात. भोंवळ येते. यःकश्चित् बोट कापलं तरी जीव कावराबावरा होतो. कापल्या ठिकाणीं दुःख होतं म्हणून नव्हे, तर रक्ताकडे पहावत नाहीं म्हणून. मनुष्य मरते-समयीं दीन होतो. लाचार होतो. वडिलांचा माझा शत्रुत्वभाव नाहीं, तरी प्रेमाचा ओलावाहि फारसा आहे असं म्हणतां येणार नाहीं. तरीपण मरतेसमयींची मनुष्याची तडफड पाहून पोटांत कालवाकालव होते. मला वडिलांच्याकडं गेलंच पाहिजे—" साठे म्हणाला.

" पण पुढल्या वर्षी तुला येतां येईल—" मी म्हणालों.

व्यर्थ अशा करतो आहेस. वडिलांच्या पश्चात् घरचं कोण पहाणार ? वडिलांची प्रकृति मी पुरती जाणून आहे. त्यांचा भरंवसा नाहीं—" सदू म्हणाला.

" अन् मी आलों तेव्हां तुला गाणं रुचत होतं—" मी म्हणालों.

" भैरवी. आयुष्याची भैरवी मी आळवीत होतों. वेड्या, विचार विचार तरी किती करणार ? विचाराला सीमा कांहीं तरी आहेच कीं नाहीं ? आयुष्यांत हे तडाखे वारंवार बसणार. नेहमींचीच रड आहे—, जिवाला कुठवर त्रास करून घेणार ? आपलं आयुष्य संपुष्टांत येईपर्यंत आपल्याला असेच दिवस काढावे लागणार—तर मग रडकं तोंड घेऊन कितीं दिवस बसणार ? रडकेपणा सांसर्गिक रोग आहे. एक खेद करूं लागला कीं आजूबाजूचे छप्पन्न लोक खेद करूं लागतात. आयुष्याला तोंड देण्याची तयारी केली पाहिजे. मी आयुष्याला हंसत मुखानें तोंड देणार आहे. पुन्हां एक गाणं म्हणूं का—?" साठे खिन्नमुद्रेनें हंसून म्हणाला.

तर परीक्षा पास,—- नाहींतर तूं मामांना स्पष्ट शब्दांत नकार देऊन मोकळा हो.— बरं पण मला दुपारच्या गाडीला निघालंच पाहिजे—-तूं स्टेशनवर येत असलास तर—-" साठे म्हणाला.

"तुला निरोप द्यायला मी जेवण करून आलोंच—" मी उठून म्हणालों—-.

" जिवंतपणीं—? " म्हणून साठे मोठ्यानें हंसला.—

साठ्याची बहीण त्याच्याबरोबर सोलापुरास जाणार होती.

स्टेशनवर थर्ड क्लासच्या फाटकापाशीं आम्ही सुमारें तासभर उभे होतों. साठ्यानें ह्या व्यवस्थेविषयीं चार धन्यतेचे शब्द मला ऐकविले, "पैसे देऊन सुद्धां यांची चोरी. तासन् तास वाट पहात बसावं लागतं. इंग्लंड-मध्यें असाच प्रकार चालत असेल का? आपलेच लोक, पण बघ कसे उलटतात तें. तो काळा बिल्ला लावलेला मनुष्य काल परवां गटार हुंगीत गांवांतून फिरत असेल. आज तो जी. आय्. पी.चा एकनिष्ठ सेवक म्हणून मिरवीत आहे. वास्तविक तिकीट–कलेक्टर म्हणजे रेल्वेने ठेवलेला सामान्य शिपाई. पण या गुलामांची ऐट बघ. घरीं जन्मभर मराठी भाषेच्यापलीकडे एक अक्षर बोलतां येत नसलं तरी, ह्या फाटकापाशीं तो उभा राहिला कीं, 'किदर जाते है' म्हणून साहेबी थाटांत तो आपला दरारा दाखवूं लागतो. हा मनुष्यस्वभाव बघ. रेल्वे हेंच ह्यांचें जग, रेल्वे हाच ह्यांचा संसार, रेलवे हेंच ह्यांचें जीवित. फिफटीन डाऊन, सिक्सटीन अप, सेवनटीन डाऊन, एटीन अप, इत्यादि गाड्यांचे नंबर हेंच ह्यांचं धर्मसूत्र—. बोल, आज ह्यांच्यासारखे लोक किती तरी असतील? ज्या दिवशीं हे लोक आपली गुलामी सोडतील त्या दिवशीं हिंदुस्थानांत राजकारणाची कोणतीहि सामुदायिक चळवळ करायला हरकत नाहीं असं मी म्हणेन.—"

एकदांचे आम्ही आंत गेलों. आमच्या समोरून एक ख्रिश्चन जोडपें गेलें.—

"त्याचप्रमाणें आत्तां आपल्या अंगावरून गेलेले साहेब. अजून इंग्लंडचें पाणी कांहीं न्यारंच ही ह्यांची समजूत. साहेब यांचा देव." साठे ह्यांच्याकडे पहात म्हणाला.—

" पण त्यांना जातींत रहाणं अशक्य कोटींतलं करणारे तुम्ही आहांत—"
मी म्हणालों.

" ती पिढी गेली. त्या पिढीशीं त्यांनीं चढेलपणाचं वर्तन ठेवलं तरी हरकत नाहीं; पण आमच्याशीं हें असं फटकून वागण्यांत काय मतलब आहे? ह्या लोकांना पुढलेमागले पाचपेंच नाहींत हेंच खरं. 'आधीं होता वाघ्या, त्याचा दैवयोगें झाला पाग्या' अशी यांची स्थिति आहे. साहेबांच्या कृपादृष्टीनें ह्यांच्या राहाणींत फरक पडला,—पण मनाचं स्वामित्व ते गमावून बसले. केवळ धर्म पसंत नाहीं म्हणून दुसरा धर्म कवटाळणारे लोक फार थोडे, जवळ जवळ नाहींच. त्याला कारणं पुष्कळच आहेत. कोणताही धर्म आज आपल्यापुढं आलेल्या प्रश्नांचा उलगडा करण्यास समर्थ नाहीं, हें आपल्याला कळून चुकलं आहे. बायबलवर विश्वास ठेवणारे आज बायबलचा उपहास करीत आहेत. बायबलला Folklore म्हणून म्हणायला ते मागंपुढं पहात नाहींत. आपल्याकडे तोच प्रकार. पुराणं म्हटलीं कीं आजीबाईचं रूप आपल्या डोळ्यांपुढं उभं रहातं. आपला तसा विश्वास बसणं शक्य नाहीं. आजपर्यंत चालत आलेले धर्म आतां निव्वळ अस्थिपंजररूपानं जिवंत आहेत. धर्माकरितां मारामाऱ्या हा निव्वळ चावटपणा आहे. धर्माकरितां कोणी कुणाशीं भांडत नसून खासगी द्वेष साधून घेण्याकरितां ती एक छान थाप आहे. अहिंसा आणि विश्वबंधुत्व हेच खरे धर्म होत. त्यांचा प्रसार झाला पाहिजे—" साठे म्हणाला.

साठ्यांची बहीण आमच्याकडे मुळींच लक्ष देत नव्हती. मला वाटतें तिला आपल्या भावाचा पुरता अनुभव असावा.

" जाऊं दे, धर्माशीं आपल्याला कांहींएक कर्तव्य नाहीं. फक्त स्वार्थाकरितां केलेलं धर्मान्तर निंद्य होय हें मात्र कबूल करावं लागेल.—गाडी आली का?" म्हणून म्हणत साठे पुढें झाला.

" धर्मान्तर म्हणतां म्हणतां देहान्तराचा प्रसंग येईल. मागं हो—" मी त्याला मागें ओढीत म्हणालों.

साठे गाडींत बसलेला पहातांच मला कसेंसेंच झालें. त्यालाहि हा

विरह जाणवत असावा. पण आयुष्याला हंसतमुखानें तोंड देण्याची तयारी करणारा वीर हात जोडून स्वस्थ कसा बसेल ?

" सगळ्यांत जर कोणी आपल्याला जास्त विरोध करतील तर हे लोक. विश्वबंधुत्वाचा डांगोरा पिटणारीं, समतावादाचं तुणतुणं वाजविणारीं हीं युरोपियन राष्ट्रं आपल्याला आडवीं येतील. त्यांच्या देशांत विचाराचं पीक असलं तरी त्या पिकाला आमच्याकडे विक्रीकरतां यावं लागतं. कोणत्याहि गोष्टीची भपक्यानं सुरुवात कशी करावी हें त्या राष्ट्रांपासून शिकून घ्यावं. पण प्रामाणिकपणानं ती गोष्ट शेवटाला नेण्याचं नैतिक धैर्य त्यांच्यांत नाहीं. विश्वबंधुत्वाचा उदोउदो त्यांनीं केला; पण विश्वबंधुत्वाच्या मुळाशीं असलेल्या तत्त्वांची पायमल्ली त्यांनीं केली. अजून काळा मनुष्य म्हणजे एक निराळा प्राणी आहे, ही भावना त्यांनीं सोडली नाहीं. ह्याचं प्रत्यक्ष उदाहरण म्हणणे या स्टेशनचा कारभार. फर्स्ट क्लास, सेकंड क्लास, थर्ड क्लास इत्यादि उद्वेग आणणारे भेदाभेदाचे प्रकार कशाला पाहिजेत ? ह्यानंच तर विषमता उत्पन्न होते—" साठे म्हणाला.

" म्हणजे तूं बोलतां बोलतां कम्युनिझमचीं तत्त्वं बडबडूं लागलास—" मीं म्हणालों.

" छेः ! छेः ! मीं कम्युनिझमविषयीं अजून विचार केला नाहीं. हीं माझीं विश्वबंधुत्वाचीं अंगोपांगं आहेत. मग कदाचित् सत्य हें एकरूप असतं, त्याप्रमाणं कम्युनिझमच्या बुडाशीं विश्वबंधुत्व असल्यास—? त्या वादांत मीं अजून शिरलेलों नाहीं—" साठे प्लॅटफॉर्मवर दूरवर पहात म्हणाला

" तूं नकोच त्या वादांत पडूंस. मोठमोठे लोक हात हालवीत परत आले आहेत—" मी हंसून म्हणालों.

" मोठे लोक थकले म्हणून आपण हातपाय गाळणं युक्त नाहीं. तुला माहिती आहे, कीं जगांतल्या साऱ्या सुधारणेचं मूळ मनुष्याच्या तरुण रक्तापासून उगम पावलेलं आहे. तरुण रक्तानं ज्या कृती घडवून आणल्या जातात त्या जुन्या लोकांकडून मुळींच घडून येत नाहींत. बरं आहे; आमची वेळ भरत आली आहे. कधींकाळीं तुझी गांठ पडलीच तर ठीक;

नाहीं तर सोलापूरच्या काळ्या वावरांत उगवलेलं रानटी झाड त्या ठिकाणींच सुकून गेलं असं समज—मी आज तीन वर्षांनीं पुन्हां बेणीसूरचा जोंधळा खायला जात आहें. बेणीसूरचा जोंधळा तुमच्या गव्हाच्या तोंडांत मारील. तूं तिकडे आलास तर—पण तें शक्य दिसत नाहीं. आतां शेवटचा प्रणाम—'शरणार्द्री अप्पा—!'" म्हणून साठे हंसत म्हणाला. मीहि पण थोडासा वरकरणीं हंसलों. गाडी दिसेनाशी होईपर्यंत मी त्या सोलापूरच्या वाघाकडे टक लावून पहात होतों. पुन्हां त्याची गांठ पडणें कितपत संभवनीय आहे ?

तीन वर्षांच्या अवधींत त्यानें माझ्या जिवाला चटका लावून सोडला होता. कोणत्याहि विषयावर त्याचीं मतें तयार असत. माझ्या मनाला विलक्षण धक्का बसला. आज तीन वर्षें ज्याचा माझा जिवाभावाचा संबंध तो पुनः कधीं दिसणार ? आयुष्याचा संबंध तुटला. दोन प्रवाह कांहीं वेळ एका मार्गानें वहात होते ते आतां विरुद्ध दिशेनें वाहूं लागले. ज्या काळानें आम्हांला एके ठिकाणीं आणण्याचें श्रेय घेतलें होतें त्याच काळानें आमची कायमची ताटातूट केली. अशी ताटातूट करण्यांत त्याचा काय हेतू असावा ? जिवाजिवांमध्यें सलोख्याचा संबंध राहूं नये ही त्याची दुष्ट बुद्धि असावी का ? सायकलला हिसका बसल्याबरोबर मी शुद्धीवर आलों. हिसक्याचें कारण कांहीं विशेष नव्हतें. पुणेकरांच्या परिचयाचें तें कारण होतें. शहर-म्युनिसिपालिटीची ती एक अजब क्लृप्ति होती. साठ्याची मला आठवण झाली. स्थानिक स्वराज्य या विषयावर त्यानें एक विस्तृत संभाषण केलें होतें—मी खिन्न मुद्रेनें पुढें पाहूं लागलों—आयुष्याला तोंड देणें खरोखरीच कठीण आहे.

---

# प्रकरण २४ वें

## निमंत्रणपत्रिका

बन्याचें लग्न ठरल्याचें आईनें मला सांगितलें. आईच्या सांगण्यांत हेतु काय होता हें माझ्या ध्यानांत आलें. बन्याप्रमाणें आतां मीहि एक देवी पकडून आणावी अशी तिची इच्छा असणें साहजिक होतें. पण तूर्त माझी इच्छा तशी नसल्याकारणानें मी मुद्दामच अडाणीपणांत शिरलों.

" बन्याचा बाप पैसा राखून आहे. बाहेरच्या बाजूला त्यांनीं वीस हजाराला बंगला बांधला आहे—" मी म्हणालों.

" मुलगी कॉलेजांत कां कुठंशी शिकत होती म्हणे—" आई सरळ भावनेनें म्हणाली; पण मला पुन्हां आठवण झाली.

" आई, जगांत पैशाला मान आहे. मनाला मारून टाकायला पैसा हें एक सुलभ हत्यार आहे" मी म्हणालों.

" असं कसं होईल ? शिकलेली मुलगी असेल तर ती मनाविरुद्ध कशी लग्नाला तयार होईल ! " आई भोळया भावानें म्हणाली.

" आई, शिकलेली पोर स्वर्गाहून थोर होत नसते. शिकलेल्या मुलींच्याविषयीं तुमची चुकीची समजूत आहे. शिकलेली मुलगी बोलण्यांत पटाईत असते. मशीनगनच्या मिनिटाला चारशें गोळया तर मिनिटाला हिचे पांचशें शब्द, हें समीकरण जुळूं शकेल; पण इथं त्यांच्या नाड्या आंखडतात--पुष्कळशा भानगडी उपस्थित होतात—" मी म्हणालों.

" काय तुमच्या ह्या पुढच्या पिढीचे गोंधळ आहेत, राम जाणे—शिक्षण झालेली मुलगी तोंड दाबून बुक्क्या कशा सहन करील ? ती कांहीं आमच्यासारखी भोळीभाबडी नसणार—" आई म्हणाली.

" आई, तुमच्याहून तिची परिस्थिति अन्य नाहीं. मीं त्या मुलीला पाहिली आहे--" मी हळूंच म्हणालों.

" तूं ! तें केव्हां !—" आई आश्चर्यानें माझ्याकडे पहात म्हणाली.

" ती आणि मी एका वर्गांत होतों—" मी घडधडणाऱ्या हृदयानें म्हणालों.

" तुझ्याइतकं का ती शिकलेली आहे ? मग मुळींच ती ऐकणार नाहीं—" आई निश्चयाच्या स्वरांत म्हणाली.

" आई, तिला मी आपल्या घरीं आणण्याच्या विचारांत होतों.—तुला सोबतीला कोणी तरी पाहिजे म्हणून मी तिला आणणार होतों. तिची इच्छा होती. पण तिच्या इच्छेला कोण विचारणार ?—आज ती मनाविरुद्ध बन्याच्या आईला सोबत म्हणून जात आहे !—तुला सांगणं शक्य नव्हतं—म्हणून मी बोललों नाहीं—" मी विचार करीत म्हणालों.

आईनें माझ्याकडे पाहिलें. तिच्या डोळ्यांत खिन्नता स्पष्टपणें दिसत होती.

" जगामध्यें पुष्कळ गोष्टी आपल्याला पाहिजे असतात, पण त्या मिळत नाहींत. त्या मिळाल्या नाहींत म्हणून खेद करणं मूर्खपणाचं आहे; तरी पण ज्या गोष्टी मिळण्यासारख्या असतांनादेखील मिळत नाहींत—" मी थांबलों.

" हात्तिच्या ! त्याच्यांत काय एवढं ! तुझं कांहीं आजच वय गेलं नाहीं. उद्यां तूं तयार हो, मुली वाटेल तितक्या सांगून येतील.—तुझी मामी आधीं धांवत येईल. अन् सुलोचना कांहीं वाईट नाहीं—" आई मोठ्या आशेनें म्हणाली. आईची ही समजूत पाहून मला हंसूं लोटलें.

" आई, बायको मिळणार नाहीं म्हणून मी मोठ्या फिकीरींत आहें, असं का तुला वाटतंय ? तें नाहीं कारण, कारण दुसरं आहे. जिवाभावांचे संबंध जोडले जातात, जिव्हाळ्याचे संबंध जडतात, परस्पराविषयीं प्रेम वाटूं लागतं—अशा ठिकाणीं जमत नाहीं त्याचा खेद वाटतो. तसं म्हटलं तर एक सोडून दोन बायका मीं केल्या तर, धर्माची आडकाठी नाहीं कीं समाजाची आडकाठी नाहीं. पण—तो निव्वळ बाजार झाला. एखाद-दुसरा भांडूं लागला तर तो मूर्ख ठरतो; पण बाजार बंद पडत नाहीं. आतां हा महिना उलटला कीं पत्रिकेचे शिलालेख शेंकड्यावारीं येऊं लागतील. पत्रिकेआड दडलेल्या मनाचा ठाव कसा काढणार ?—" मी म्हणालों.

" आपल्याला बाहेर पहाण्याची जरूरी आहे कुठं ? बाकी माझा तसा आग्रह नाहीं हो ! माझ्या म्हणण्याला मान देऊन तूं आपली आवडनिवड मारून टाकूं नकोस. मला काय, कुणीहि चालेल. तुझ्या पसंतीवर अवलंबून आहे." आई म्हणाली.

" पाहूं मग—आत्तांच काय त्याचं--" म्हणून म्हणत मी दुकानचा रस्ता धरला.

दुकानांत गेलों तों राहूसुद्धां आज दुसरी गोष्ट काढीना.—

" मघाशीं सुलोचनाबाई कागद घेऊन गेल्या—" माझ्याकडे तिरक्या नजरेनें पहात राहू म्हणाला.

" मग ? सुलोचनाबाई म्हणजे कोणी स्वर्गलोकींचा परमेश्वर आहे कीं काय ?—" मी हंसून म्हणालों.

" पैसे देऊं लागल्या त्या, तेव्हां मी पैसे घेतले नाहींत—" राहू अभिमानपूर्ण मुद्रेनें म्हणाला.

" तुला व्यवहार कळेल तर शपथ. कां घेतले नाहींस पैसे ? " मी म्हणालों.

" घरच्या मालकिणीपासून पैसे घेणं मला पसंत नाहीं पडलं—" राहू दबकत म्हणाला.

" राहू , तुला म्हातारचळ लागलेला दिसतो आहे. मारुतीरायासारखा तूं स्वतः आकाशाकडे तोंड करून लोकांचे नानातऱ्हेचे संबंध जोडूं लागला आहेस. रामाच्या सीतेची याला नसती उठाठेव ! त्याप्रमाणं तूं वाटेल त्या मुलीशीं मालकिणीचं नातं जोडूं लागला आहेस. त्यापेक्षां तूं स्वतःच कां नाहीं पुन्हां संसारांत पडत—? " मी म्हणालों.

" सदुभाऊ, एकदां कोळशावर पाणी पडलं कीं पुन्हां तो लवकर पेटत नाहीं. माझा संसार म्हणजे हें भाऊसाहेबांच्या लेकाचं दुकान. या संसाराविना मला दुसरा संसार नाहीं—" राहू निश्चयी मुद्रेनें म्हणाला.

" म्हणजे हलवायाच्या घरावर तुळशीपत्र ! आपला संसार म्हणून तूं दुकानाचं दिवाळं काढलंस तरी मी तुला बोलूं नये, हीच तुझी इच्छा कीं नाहीं ? हेंच तुला भाऊसाहेबांनीं शिकवलं वाटतं ? राहू, या दुकानांत

येणारी प्रत्येक वस्तु नाण्याच्या नादानं येत असते. कोणीहि झालं तरी माल फुकट देतां कामा नये. तुला आतां संसारांत सार वाटेनासं झालेलं दिसतं आहे. तुला संसाराची आंच लागावी म्हणून मी एक निराळी योजना करणार आहें—" मी विचार करीत म्हणालों.

राहूनें माझ्याकडे प्रश्नार्थक मुद्रा करून पाहिलें.

"दुकानचा खर्चवेंच, भाडंतोडं वजा जातां आपल्याला जें काय महिन्याकाठीं मिळेल त्याचा तिसरा भाग मी तुला यापुढं देत जाईन. म्हणजे, समज, तूं महिन्याकाठीं तीन रुपये शिल्लक पाडलीस तर तुझा पगार एक रुपया; आणि नव्याण्णव रुपये पाडलीस तर तेहतीस रुपये तुझे. आहे तुला कबूल ?" मी त्याच्याकडे पाहून म्हणालों.

"तेहतीस रुपये ? अन् इतके रुपये घेऊन मी काय करणार ? भाऊसाहेब मला अगदीं प्रथम दहा देत होते. मला दहा पुरत होते. नंतर पंधरा झाले—तरी मला पुरत होते. तुम्ही वीस केले तरी मीं तक्रार केली नाहीं. आतां मात्र, तिसाची गोष्ट काढतां तेव्हां, मला बोलणं भाग आहे. ही उधळपट्टी काय कामाची ? मला वीस पुरे होतात. मी जास्त एक पैसा घेणार नाहीं. अन् पुन्हां सुलोचनाबाई आल्यावर त्यांना फुकट कागद दिल्यावांचून रहाणार नाहीं—" राहू आवेशानें म्हणाला.

"अरेच्या ! पण ती कोण तुझी ? तूं इतका कां भांडायला उठतोस ?" मी हंसून म्हणालों.

"त्या कोण ? सदुभाऊ, म्हातारवय झालं म्हणजे बोलायला थोडासा अधिकार येतो. मी सांगतों कीं, त्यांची पुण्याई म्हणून आज आपलं चाललं आहे. घरांत लक्ष्मी यशवन्त असली कीं बाहेरची लक्ष्मी जीव खाऊन पळत येते. सुलुबाईचा पायगूण चांगला आहे. भाऊसाहेब आज असते तर त्यांना मीं तसं सांगितलं असतं. चांगल्या गुणाचा मनुष्य माझ्या डोळ्यांतून कधींहि सुटत नाहीं." राहू म्हणाला.

"राहू, तूं काय म्हणतो आहेस तें माझ्या ध्यानांत आलं आहे. सुलोचना आपल्या घरांत येईल हें मी तुला खात्रीनं सांगतों; पण ती केव्हां येईल हें मात्र मला सांगतां येणार नाहीं—" मी म्हणालों.

" तें मी सांगतों—" राहू आनंदानें बेभान होऊन बोलूं लागला. मी त्यास अडवून म्हणालों,

" तूं काय सांगणार ? तूं सांगशील कीं ती बहुतेक पुढच्या हंगामांत येईल ! चूक. अजून मला शिकायचं आहे. शिकणं झाल्याशिवाय त्या वादांत डोकं खुपसणं शहाणपणाचं होणार नाहीं. पुढं पाहूं—" मी म्हणालों.

" शिक्षण ! शिक्षणानं सगळा घात केला—" राहू आपल्याशींच चरफडत पुटपुटला. मीं न ऐकल्यासारखेंच केलें.

दुपारच्या डांकेनें दोन पाकिटें आलीं. पहिल्या पाकिटांत बन्याच्या लग्नाची आमंत्रणपत्रिका होती आणि त्याच्याबरोबर बन्याचें एक पत्र होतें. बन्याचें पत्र मात्र नमुनेदार होतें.

" सा. न. वि. वि.

सोबत धाडलेली कुंकुमार्चित पत्रिका वाचण्याची आमच्याकरतां तसदी घ्याल अशी आशा आहे. नाहीं वाचलीस तरी कांहीं फारसं बिघडेलसें वाटत नाहीं ती चिठ्ठी म्हणजे आपल्या पराजयाची फडफडणारी पताका आहे. शकुन्तला बन्याच्या मालकीची वस्तु होणार याविषयींची ती जाहीर घोषणा आहे. मला वाटतें, माझ्या नांवापेक्षां तुझेंच नांव त्या ठिकाणीं जास्त शोभिवन्त दिसलें असतें. प्रामाणिक समजूत आहे ही माझी, पण विधिघटना आपल्याला उल्लंघितां येणें शक्य नाहीं. शकुन्तला खुद्द या लग्नाला राजी नाहीं. पण अराजक लोकांच्या राजीला विचारतो कोण ? खूप संतापली, धडपडली—कदाचित् माझ्या नांवानें बोटेंहि मोडलीं असतील तिनें. पण तिचा दादा वचनाचा खंबीर असल्यामुळें आज ही पत्रिका घरोघर धाडण्याचें यश माझ्या पदरीं पडलें आहे. मी तुला कांहीं दिवसांपूर्वी पैशाविषयीं बोललेलें आठवत असेलच. तोच पैसा आज हा संबंध घडवून आणीत आहे. तुला एक सांगून ठेवतों, जगांत पैशाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि वस्तूला मान नाहीं. पैसा आहे तर दहा शकुन्तला खेळवण्याचें सामर्थ्य आहे. तुझ्या घरीं तिची आबाळ झाली नसती हें मला कबूल

आहे; पण तिच्या वाढत्या गरजा तूं कोठवर पुरवल्या असत्यास, हा एक प्रश्न आहे.

कारण, आजची चरफडणारी शकुन्तला उद्यां सरळ येईल. कदाचित् ती माझ्यावर प्रेम करणार नाहीं. मला त्या उदात्त कल्पनेची मुळींच जरूरी नाहीं. प्रेमाचें कोडें तुम्ही लोकांनीं उलगडावें. मला दाखवायचे दांत निराळे आणि खाण्याचे दांत निराळे, असला लपंडावी खेळ खेळतां येत नाहीं. तुमचें प्रेम तुम्हांला लखलाभ होवो. मी मात्र माझ्या कल्पनेप्रमाणें त्या पोरीला ताळ्यावर आणीन. बायका शिकल्या तरी त्यांना वठणीवर आणण्याचें आमच्या हातांत असतें. पत्नीधर्म हा तिला पाळलाच पाहिजे. त्यांतून तिची सुटका करायला सारें विश्व धांवलें तरी कांहीं उपयोग होणार नाहीं.

पत्रिकेंत औपचारिक रीतीनें म्हटलेलें आहे कीं 'आपण आल्यानें विशेष शोभा येणार आहे.' खरोखरीच शोभा येईल! तुझी शोभा पाहून मला मंडपाची शोभा जास्त वाढल्यासारखी वाटेल. माशाला गळ टाकतात त्याप्रमाणें शकुन्तला त्या ठिकाणीं आहे एवढें सांगितलें म्हणजे पुरे. 'आप्तेष्टमित्रांना' बरोबर घेऊन येण्याची विनंति करण्यांत आली आहेच. सुलोचनाबाई येण्यासारख्या मनस्थितींत असल्या तर त्यांना आणण्यास विसरूं नको. पोरीचा भांबावलेला जीव त्या योगानें जरा स्वस्थ होईल.

जातां जातां उपदेशाचे दोन वळसे दिले तर अस्थानीं होईल असें वाटत नाहीं. वास्तविक तुला मी उपदेश काय करणार? पण जगांत हा न्याय असा उलटा आहे. तूं शहाणपणाचा गर्व मिरवतोस हें मला माहीत आहे. सोड तो गर्व. तुझ्यापेक्षां सवाई शाहाणे लोक जगांत अजून जिवंत आहेत. साठ्यासारख्या चार उनाड पाखरांबरोबर दोन शब्द बोलतां आले म्हणजे शहाणपणा येतो असें मुळींच नाहीं. साठे मूर्ख आहे. तूं सात मूर्ख आहेस. कळली तुझी किंमत? जगांत सत्याचा विजय होतो, ही कविकल्पना आहे. तूं मला असत् पक्षाचा म्हणून समजत असशील. त्याकरितां हें सुचवावेंसें वाटतें. 'सत्याचा

जय' हें एका कादंबरीचें गोडसें शीर्षक आहे. जगांत शीर्षकाला थारा नाहीं. जग सुधारण्याचा विचार जरी कितीहि स्तुत्य असला तरी तो अप्रस्तुत आहे, हें विसरून चालणार नाहीं.

असो. झाल्या गेल्या गोष्टी विसरणें हें फायद्याचें होणार आहे. तुमचा आमचा पूर्वापार आलेला संबंध ह्यापुढें नाहींसा व्हावा हें बरें नाहीं. लग्नाला आलात तर झाल्या गोष्टी विसरण्यास आपण तयार आहांत असें मी धरून चालेल. याउपर आपली मर्जी.—स्नेह तुटण्याला वेळ लागत नाहीं हें मी आपल्यासारख्याला शिकवणें मूर्खपणाचें होणार आहे. क. लो....... आपला कृपाभिलाषि,

बन्या."

मीं त्या पत्राचे तुकडे करीत दुसरें पत्र उघडलें. दुसरें पत्र शकुन्तलेनें धाडलें होतें.

"सा. न. वि. वि.

आज मी आपणांस पत्र लिहून माझें मनोगत कळविण्याचें धाडस करतें आहें. जे विचार मला, लज्जेमुळें म्हणा अगर विनयामुळें म्हणा, आपल्यासमोर बोलण्याचें धाडस करणें अशक्य झालें असतें तेच विचार मी पत्ररूपानें पुढें मांडीत आहें. आज तुमच्याशीं बोलणारी शकुन्तला एक निराश्रित, निराधार, आणि हताश झालेली अबला स्त्री आहे. चोहोंकडून वादळ सुटलें आहे. निर्जन अरण्यांत मी एकटी सांपडलेली आहें. कुठेंच जिवाला विसांवा नाहीं.—झंझावातांत मी कशी निभावून जाऊं ?

प्रत्यक्ष मुलीच्या शब्दावर आई विश्वास ठेवायला तयार नाहीं. भाऊराया बहिणीकडे पहातांना, तिच्याशीं बोलतांना शाब्दिक कोट्या करून तिला खिजवण्याचे चाळे थांबवीत नाहीं. मीं काय केलें होतें ? आपल्याशीं माझी मैत्री जडली यांत माझा काय अपराध होता ? माझ्या मनांत पापवासना अजिबात नव्हती हें म्हणणें मानसशास्त्राला सोडून आहे. पण अनुचित कर्म करण्यास मी कधींच तयार झालें नसतें; आणि आपण माझ्यावर तशी वेळहि आणली नसती ही

माझी खात्री आहे. समवयस्क स्त्रीपुरुष एके ठिकाणीं आले कीं, तो विचार अगदीं विसरून जाणें केव्हांहि शक्य नसतें. त्या विचारानें तर आपण एके ठिकाणीं ओढलीं जातों.—पण पराचा कावळा करून लगेच त्या बाईची अब्रू वेशीवर टांगण्याची तयारी करणारे वीर तयारच असतात. असल्याच एका वीरात्म्याशीं मी विवाहग्रंथीनें बद्ध होणार आहें. माझ्या आईजवळ आणि दादाजवळ त्यांनीं नाहीं नाहीं त्या गोष्टी सांगितल्या आहेत. दादांनीं माझें शिक्षण बंद केलें. मध्यें एक वर्षभर मला मुंबईला पाठविण्यांत आली होती.

माझ्या आयुष्यांत पुढें काय होणार तें मला दिसतें आहे. अशा मनुष्याशीं एक दिवस काढायचा म्हणजे प्राणसंकट ! पण त्यालाहि तोंड देणें भाग आहे. मुलींच्या शब्दांना किंमत नाहीं. त्यांची विचारपूस करण्याची कांहींच गरज दिसत नाहीं. त्यांना खरें बोलायला देवानें शिकवलेलेंच नाहीं. त्या जरा कुठें मोकळ्या सुटल्या कीं धांवत जाऊन कुणाच्या तरी गळां मिठीं पडतात—! काय ही विचारसरणी ? अन् ह्यांना आम्ही वडिलकीचा मान द्यायचा ?

मनुष्याची निराशा फार भयंकर असते. सदाचारानें वागून आपला तोटा होत आहे, असें दिसतांच मनुष्य बेभान होतो. धनुष्याकरतां वांकवलेली कामटी ज्याप्रमाणें दोरी तुटतांच वेगानें माघार घेते त्याप्रमाणें मनुष्य एकदम दुसऱ्या टोंकाकडे वळतो. जगांत पापी लोकांचें मूळ म्हणजे सज्जन. सज्जनाचा दुर्जन होण्यास फार वेळ लागत नाहीं. त्याप्रमाणें एक वेळ माझ्या मनानें उचल खाल्ली होती—पण वेळींच मी शुद्धीवर आलें. मला आपली आठवण झाली. मी जर सन्मार्ग सोडून दिला तर आपल्याला वाईट वाटेल, या भावनेनें मीं माघार घेतली.

पण यांनीं काय मिळवलें ? दोन जिवांचा तळतळाट पदरीं बांधून घेतला. मला आतां त्यांच्या पदरीं जन्म काढणें भाग आहे. पण मी जन्मभर तळतळाट देईन. माझीं नातींगोतीं पार जळालीं. मी जगांत रहातें हेंच मोठें नवल आहे. ज्या वेळीं माझ्या आशा फोल ठरल्या

त्याच वेळीं मीं आप्तेष्टांना मूठमाती दिली. पण मी स्वतः आत्महत्येचें पातक शिरावर घेणार नाहीं. आशा फोल झाल्या म्हणून आयुष्य कांहीं फोल ठरत नसतें. आयुष्याची किंमत मी ओळखून आहें. फक्त स्वतः-च्या सुखावर मात्र पाणी सोडावें लागेल.—आमचें कसें काय जमतें हा मोठा प्रश्नच आहे. त्यांना अजून स्त्रीहृदयाची पारख नाहीं हेंच खरें. ' नको जीव हा ' असें होऊन जाईल त्यांना. शिकलेल्या मुली म्हणजे पोरखेळ नव्हे, हें त्यांना समजायला लावीन तरच नांवाची शकुन्तला. शिकलेल्या मुलींचा मनोभंग केला कीं त्याचें प्रायश्चित्त किती भयंकर असतें हें त्यांना लवकरच कळून येईल. असो; आपला संबंध तुटला. तो तितकाच होता. पण जन्मभर मी ती आठवण विसरणार नाहीं.

माझ्या लग्नाच्या गडबडींत मी आपली भेट घेईन. मला आप-ल्याला पुष्कळ गोष्टी सांगायच्या आहेत. आपल्या मातोश्रींकडे म्हणून मी येईन—त्या वेळीं मी त्या गोष्टी सांगेन.—

आपली स्नेहांकित,
शकुन्तला "

मीं पत्राची घडी करून खिशांत ठेवली.

---

# प्रकरण २५ वें



## फोल आशा !

मनुष्याच्या आयुष्यांत असा एक काळ येत असतो, कीं त्या वेळीं अति विचारामुळें त्याची विचारशक्ति कायमचीच नष्ट होईल कीं काय अशी भीति वाटूं लागते. तोच माझ्या बाबतींत प्रकार घडला होता. तसें म्हटलें तर माझे विचार इतकेसे प्रौढ नव्हते, वेदाभ्यासजड नव्हते. साधे सुटसुटीत विचार ते! पण त्यांनींच मला बेकाबूर करून सोडलें होतें.

आयुष्यांत प्रत्येक व्यक्तिमात्राचा कांहीं तरी उपयोग असावा असें मला वाटत होतें, पण ती कल्पना चुकीची ठरण्याचा रंग आला होता. माझा जगाला काय उपयोग होता हेंच मला कळेना. कांहीं एका ठराविक ध्येया-कडे मनुष्याची उत्क्रान्ति होत असते, पण माझें ध्येय मला कुठेंच दिसेना. एकामागें एक घडून आलेल्या विपरीत प्रसंगामुळें मी अगदीं भांबावून गेलों.

बाबांच्या मृत्यूमुळें घराची, दुकानाची जबाबदारी अंगावर पडली होती, तरी मी इतका सुंद झालों नव्हतों; पण शकुन्तलेच्या पत्रानें मात्र मला हेलकावे बसले.

शकुन्तलेचें आयुष्य कसें जाणार ? नवऱ्याशीं उभा दावा ठेवणाऱ्या सतीला दिवस कसे रेटणार ? जन्मभर ती सौख्याला, समाधानाला, शान्तीला आंचवणार ! मनुष्याला तें शक्य आहे काय ? भावनेचा आवेग ओसरल्यावर ती इतक्याच निश्चयानें आयुष्याला तोंड देण्याची हिंमत धरील का नाहीं हा प्रश्नच होता. निश्चय भाराभर करतां येतात. कोणत्या आशे-वर ती दिवस काढणार ? आशारहित जीव, हें विधान विरोधाचा भास उत्पन्न करणारें आहे. आशेशिवाय जन्म जाणार कसा ? मरे तोंपर्यंत....

माझी स्थिति तीच होती. मैत्रीच्या पाठीमागें मी लागलों होतों. बन्याशीं मी लहानपणापासून स्नेह ठेवला होता. त्यानें माझे पांग उत्तम रीतीनें फेडले. सहवासजन्य मैत्रीचा कायमच्या शत्रुत्वांत शेवट होतो, हें त्यानें मला सोदाहरण पटवून दिलें. मित्रप्रेमाची महति गाणारें वीर याला काय म्हणतील ? अतिपरिचयामुळें अवज्ञा करण्याचा मोह पडतो हें तत्त्व मैत्रीच्या बाबतींतहि लागू आहे. परस्पर जीवांची सहानुभूति अशामुळें कशी टिकणार ? आणि या मनुष्यप्राण्यांतून उद्यां देवराजा जन्माला येणार म्हणून आशा करायची ! मनुष्य एकदां आशा करूं लागला कीं मग त्याला परि-मित रहात नाहीं. देवांचा जन्म मनुष्यप्राण्यांमध्यें कसा होणार ?—पण मग पृथ्वींतील जीवनजंतूंचा उत्क्रान्तिवाद ? छेः ! तो वाद जर खरा असेल तर याच मनुष्यप्राण्यापासून—याच दुर्गुणांच्या खाणींतून—नवीन जात निर्माण होईल ! पण त्याला किती तरी पिढ्या घालवाव्या लागतील ! आजकालचें तें कार्य नाहीं. त्याला बराच अवधि लागेल.

साठ्याची आणि माझी मैत्री अशी एकाएकीं कां तुटावी? आमची मैत्री जमण्याचें कारण सहवेदना. त्याला ज्या गोष्टींचें कोडें पडलें होतें त्याच गोष्टींचें मलाहि कोडें पडलें होतें. त्याचे विचार अगदीं थेट माझ्यासारखे होते. अजून जगाचा पुरता अनुभव आला नसल्यानें त्याचे विचार पक्क झाले नव्हते. माझेहि विचार अजून बाल्यावस्थेंत होते. पण आम्हीं विचार करायला सुरुवात केली होती. आम्ही हातपाय हालवूं लागलों होतों. आमच्या मैत्रींत हें दोनशें मैलांचें अंतर कां पडावें? का त्यालाहि कांहीं सबळ कारणपरंपरा असूं शकेल?

शकुन्तलेच्या बाबतींत काय बोलणार? अजून स्त्रीला स्वतंत्र अस्तित्व आहे हें कबूल करायला त्यांचा पालकवर्ग तयार नाहीं. त्यांना विचार नाहीं--त्यांना कोणतेहि संबंध जोडून आणण्याची मोकळीक नाहीं. स्त्रियांशीं मैत्री करणें ही कल्पनाच उपहासात्मक वाटेल.

आपण रहातों हें जग खरोखरीच एक अजब वस्तुसंग्रहालय आहे. एका टोंकाला स्त्रियांना स्वातंत्र्य दिलें गेलें आहे, ( किंवा तें त्यांनीं मिळवलें आहे ) तिथें नीतिमत्तेला किंमतच नाहीं. त्यांचे नीतिमत्तेविषयीं असणारे विचार आमच्याहून किती तरी निराळे आहेत. आणि आमच्याकडे नीतिमत्तेविषयीं कमालीचा कांटेकोरपणा आहे. बायकांना चार भिंतींत कोंडण्यापर्यंत आमची तयारी. एकाच पृथ्वीचीं दोन टोंकें, पण अंतर कोण! विचारांत सारखेपणा असा मुळींच नाहीं--आणि अशा प्राण्यांत एकोपा घडून यावा तरी कोणत्या तत्त्वावर?

माझ्या डोक्यांत एकदम प्रकाश पडल्यासारखें झालें. आयुष्य हें स्वतःच्या सौख्याकरतां नसून दुसऱ्याच्या उपयोगाकरतां आणि स्वतःच्या त्रासाकरतां आहे हेंच खरें. माझी धडपड व्यर्थ जाण्याचें कारण आतां मला उमगलें. आयुष्याचें मूलतत्त्व मी डोळ्याआड करून चाललों होतों. लहानपणीं मीं बाबांच्यापासून संरक्षणाची मागणी केली. त्यांच्या दृष्टीनें मीं कधीं तरी विचार केला होता का? मी आपल्या स्वार्थी दृष्टीनें बाबांच्यांत दोष पहात होतों. बाबांच्यामध्यें कांहींच गूण नव्हते असें कसें होईल? प्रत्येक मनुष्य एक पुरा दुर्जन किंवा पुरा सज्जन असें चित्र कधींच पहावयास मिळणार

नाहीं. असा एकांगीपणा विश्वांत आढळून येत नाहीं. बाबांचा स्वभाव थोडासा तापदायक असला तरी ते दुष्ट नव्हते. आज त्यांच्याच परिश्रमामुळें मला सुखानें अन्न खातां येतें आहे. हा त्यांचा उपकार नाहीं का? त्यांनीं आपल्या आयुष्यांत स्वतःला मुळींच सूख लावून घेतलें नाहीं. त्यांच्या श्रमाचा, त्यांच्या काटकसरीपणाचा आम्हांला उपभोग घेतां आला.— बाबांना ही जाणीव पटली असावी. बाबांच्या चारित्रांत एवढें उदात्त तत्त्व भरलें असतांना मी दुसरीकडे कशाला पाहूं? आपण स्वतःकरतां जगत नसून दुसऱ्याकरतां जगतों आहोंत हेंच खरें.

शकुन्तला माझ्याप्रमाणें फसली. तिला स्वतःच्या सुखापलीकडे काय दिसत होतें? आईला आणि दादाला ती संतापून शिव्या देते, पण त्यांच्या भावनेचा तिनें कधीं तरी विचार केला आहे का? त्यांच्या करण्यांत कांहीं तरी तथ्य आहे कीं नाहीं याचा तिनें मुळींच विचार केला नाहीं. स्वत्वाच्या नादीं लागून ती आजूबाजूच्या लोकांना विसरली.

ती मला भेटून काय करणार? मी तिला काय सांगणार? ती मला काय सांगणार?

आयुष्याला तोंड देण्याची मला तयारी केलीच पाहिजे. मला थांबणें शक्यच नव्हतें. मी तडक मामीकडे गेलों. मामी घरांत नव्हती. मामा हपिसांत गेले होते. सुलोचना तांदूळ निवडीत होती. मी तिला या उद्योगांत पहातांच आश्चर्यचकित झालों.

"मला थोडेसे तांदूळ दे. मी आपली सोय लावतों—" मी तिच्यापुढें बसून म्हणालों.

"मला डोळे आहेत. मी निवडतें—" सुलोचना हंसून म्हणाली.

"म्हणजे, मी आंधळा आहे कीं काय? मलाहि डोळे आहेत. मी निवडतों—" मी हंसून म्हणालों.

"ज्याचं काम त्यांनीं करावं—" सुलोचना हातानें तांदूळ सुपांत लोटीत म्हणाली.

"बरं—तुझी मर्जी. माझं बोलण्याचं काम मी करतों. सुली, माझ्याकडे बघ. रागावून पाहूं नकोस हं अशी! सुले, आज मी एक विशिष्ट हेतु

मनांत धरून तुझ्याकडे आलों आहें. आज मी मामींकडे आलों नाहीं—तर तुझ्याकडे आलों आहें, हें लक्षांत ठेव.——मीं विचार करण्याचं आजपासून सोडून दिलं आहे. झाल्या गोष्टी गेल्या. आतांपासून मी नवीन पान उलटणार आहें. तर तुला सावध करून ठेवावं हें बरं, म्हणून सांगायला आलों——" मी म्हणालों.

" मला कशाला सावध करायचं ?——" आंगठ्यानें तांदुळांतला खडा चिरडण्याचा प्रयत्न करीत सुलोचना आश्चर्यानें म्हणाली.

" पुढं हे असे माझ्या नांवानं तूं खडे फोडूं नयेत म्हणून—" मी तिच्या हाताकडे पहात म्हणालों.

" हा खडा आहे का ! नाचणी दिसत नाहीं ! अन् म्हणे मी डोळस आहें—" सुली नाचणी किंवा खडा काय असेल तें माझ्या अंगावर टाकून म्हणाली.

" सुली, मी आयुष्यांत आजवर एक मोठी चूक करीत आलों आहें. ती मी सुधारण्याचा मनापासून प्रयत्न करणार आहें. मी तुझ्याशीं वागतांना तुझ्या भावनांचा कधींच विचार केला नव्हता. त्यामुळं आपल्यांत बराचसा गैरसमज राहून गेला. अन् त्यामुळं—पण तें जाऊं दे. त्याचा विचार करायचा नाहीं. त्या चुकीला कारण मी होतों. सुली, लाज वाटून घेण्याचं तुला कांहीं कारण नाहीं. हा सगळा परिस्थितीचा खेळ आहे. त्या परिस्थितीला आतां आपण तोंड देणार आहोंत. हो——एक मुद्दा विसरलों, तुला आपलीं नवीन नातीं कळत आहेत ना !——" मी तिच्याकडे पाहून म्हणालों. सुलोचनेनें माझ्याकडे दीनवाण्या दृष्टीनें पाहिलें. गुडघ्यांत मान घालून तिनें आलेला हुंदका दडपून टाकण्याचा मनाशीं प्रयत्न केला.

" हें बघ, तूं जर असंच माझं ऐकून घेणार असलीस तर मी जातों बापडा—" मी उठण्याचा अविर्भाव आणून म्हणालों.

" नाहीं ऽ——नाहीं——" म्हणून सुलोचनेनें पदराच्या टोंकानें डोळे कोरडे केले.

" सुले, आपल्याकडे प्रेम व्यक्त करण्याच्या शाळा घातल्या पाहिजेत. इतके दिवस पाश्चात्यांच्या संगतीला राहून ती कला कांहीं आपण उचल-

लेली नाहीं. मी आज तुझी संमति घेण्याकरितां आलों होतों—पण तुला विचारावं कसं हें कांहीं मला अजून सुधरत नाहीं. उसळीसरशीं चार शब्द अधलेमधले बोलून जातों अन् पुन्हां धडपडतों. बाकी मी चार शब्द का होईना, ते तरी नवसाला बोलतों आहे. तूं तर धरून आणलेल्या चोरासारखी बसलेली आहेस. अग, तुला कुणी मारायला का उठलं आहे? अशी का अंग चोरून बसली आहेस? नीट बैस—" मी म्हणालों. पण नीट बसायला सांगणाऱ्या पुरुषाचें ऐकणें हा स्त्रियांचा धर्म नसतो.

"मामी आतां येईल. तेवढ्या वेळांत मला तुझी संमति मिळवली पाहिजे. वेळ थोडा अन् चढण तर हिमालयपर्वताची, असा हा पेंच येऊन पडला आहे. सुली, तुला एकदां विचारतों कीं, तुला कबूल आहे—? तुझा सदू तुला पसंत आहे? खालीं मान काय घालतेस? तुला मीं कांहीं फांशीं द्यायला काढलेली नाहीं—" मी तिचें डोकें वर उचलून म्हणालों.

सुलोचना लाजून शरमिंदी झाली होती. तिनें पुन्हां आपलें तोंड पदराआड लपविलें.

"तुला ही थट्टा वाटते आहे. तूंच काय पण बाकीच्या लोकांनासुद्धां ही थट्टा वाटेल. पण ही थट्टा नाहीं. आपल्याकडे मुलीची संमति घेण्याचा रिवाज नाहीं. म्हणून त्यापासून मुलीची वासना अतृप्त रहाण्याचा संभव असतो. मी तो रिवाज पाडणार आहें. प्रत्यक्ष मुलीला विचारण्याचा धीर मला झाला नाहीं, त्यामुळं काय अनर्थ झाले हें मला माहीत आहे. ती चूक मी पुन्हां करणार नाहीं—" मी म्हणालों. सुलोचनेनें स्त्रीस्वभावानुरूप माझ्याकडे संशयी मुद्रेनें पाहिलें.

"शकुन्तला—?" ती किंचित् रागानें म्हणाली.

"तिचा विचार आतां कशाला? ती उद्यां लोकाची होणार आहे. अन् तिच्यावर तूं रागावूं नकोस. तिच्या उदाहरणानं तर माझे डोळे उघडलेले आहेत. मग, आपलं काय ठरलं—?" मी मुद्दामच खोडसाळपणानें म्हणालों.

"मी काय सांगणार? मामामामी करतील—" तिनें लाजून खालीं मान केली.

“ पुन्हां तुझीं मामामामी आलींच मध्यें ! अग, त्यांचा संसार झालेला आहे. आतां आपल्यापुरतं पहा. मामांचा संसार कसा होता तें तुझ्यापेक्षां मला चांगलं माहिती आहे ! तुझ्या जन्माच्या वेळेला मामांनीं शान्तामामीला धाडलेलं एक पत्र माझ्याजवळ आहे. त्याची वेळ माझ्यावर कदाचित् पुढं येईल म्हणून तें मीं जपून ठेवलं आहे. पूर्वीच्या दाखल्याबरहूकूम कॉपी करायला कांहीं हरकत नाहीं. मामामामी काय करतील तें आपण मागाहून पाहूं. तूनं आपला विचार काय ठरला तें पाहू. तसं म्हटलं तर तुझं उत्तर मला राहूनंच देऊन ठेवलेलं आहे. तूं लग्नाला कबूल असलीस तर ते कागदाचे पैसे तुला माफ आहेत. कबूल नसलीस तर एक तिऱ्हाईत दुकानदार या नात्यानं ते पैसे मागण्याचा माझा हक्क आहे. गांवांतल्या पोरींना फुकट कागद वांटायला अजून मी कांहीं इतका हुरळलेला नाहीं--” मी म्हणालों.

“ मी काय करूं ? राहून पैसे घेईना. अन् नाहीं दिले पैसे मी तर—? ” सुलोचना म्हणाली.

“ तर—तर लग्नाला कबूल आहेस असं मी समजेन.—कां ? पुन्हां तुला लाजुबाईनं घेरलं वाटतं ? सुली, तूं किती दिवस अशी लाजणार ग ?” मी तिचा हात धरून म्हणालों.

“ इश्श ! ” म्हणून म्हणत सुलोचना घरांत पळाली. मी तिच्या पाठोपाठ आंत गेलों.

“ आतां काय लपंडाव खेळण्याची लहानपणची लहर आली वाटतं—” मी हंसून म्हणालों.

“ नाहीं—तसं नाहीं; मामी आली—म्हणून मी उठलें हो—” सुलोचना फाटकाकडे पहात म्हणाली.

“ अस्सं ! तुला आतां माझी लाज वाटूं लागली नाहीं का ? तें मी विसरलोंच होतों. थांब, तुझी गम्मत करतों—” म्हणून म्हणत मी हंसतमुखानें मामीस सामोरा गेलों. मामी आंत आली.

“ मामी, उभी रहा. माझी फिर्याद आहे—” मी तिचा रस्ता अडवून म्हणालों.

" आमच्या कोर्टाचा तूंच न्यायाधीश होतास. न्यायाधीश फिर्याद करूं लागला म्हणजे संपलंच—" मामी हंसून म्हणाली.

" लहानपणची फिर्याद मी पुन्हां उकरून काढणार आहें—" मी म्हणालों.

" पण मुदत टळल्यावर फिर्याद पुन्हां सुनावणीस घेतां येते का ? " मामी म्हणाली.

" आमच्या कोर्टात मागच्या जन्मींची फिर्याद चालूं शकते, तर या जन्मींची काय कथा आहे ? " मी म्हणालों.

" या जन्मींची कथा आहे म्हणून तर रडायचं—" मामी खिन्न मुद्रेनें म्हणाली.

" कोर्टात अशा तऱ्हेचीं बोलणीं कोण ऐकून घेईल ? माझी फिर्याद ऐक. त्या दिवशीं मीं मामांना आरोपी ठरवून त्यांच्याजवळून नाटकाची शिक्षा पार पाडून घेतलेली आहे. मी तो निकाल बदलतों; मामा आरोपी नाहींत असं मी आज जाहीर करतों. "

" बरे लौकर न्यायाधीशसाहेब जागे झाले—" मामी हंसून म्हणाली.

" मामी, त्या खटल्यांत खरा आरोपी तुझी पोर होती. मी तिला जन्मठेपेची शिक्षा फर्मावितों—" मी मोठ्यानें हंसून म्हणालों.

"म्हणजे ? आणखी हें काय नवीनच ?" मामी एकदम घाबरून म्हणाली.

" तूं घाबरलीस वाटतं ? मामी, इंग्रजींत एक म्हण आहे कीं, खुनाला वाचा फुटते. आज तो गुन्हेगार तुझ्या-माझ्यापुढं उभा आहे. तिला मी आमच्या घरीं पकडून नेणार आहें—" मी सुलोचनेकडे पहात म्हणालों.

" बाईऽ! म्हणजे त्या अर्थानं होय! मग बाबा तूं काय वाटेल तें कर. कायदा प्रस्थापित करण्याकरतां प्रत्येक नागरिकानं आपल्याकडून शक्य ती मदत करणं हें त्याचं कर्तव्य आहे. आम्ही तुझ्या आड येणार नाहीं—" मामी आंत येत म्हणाली.

" मामी, तुझ्या माघारवाणी सुलोचना माझ्याशीं भांडते ग! मला आंधळा म्हणते—दिसत नाहीं का, म्हणून म्हणते—हें असं चांगलं का ? तूं तिला धाक मुळींच लावला नाहींस—" मी म्हणालों.

"आतां तूं तिला धाक दाखव. आम्ही थकलों बाबा—" मामी म्हणाली.

"मी ? अन् तिला धाक दाखवणार ? मामी, मला तिनं सूर्याचीं पिलं दाखविलीं तर मी काय करूं ! " मी हंसून म्हणालों.

"अरे, पण तूं चहा नाहीं का घेतलास ? सुली, अग तो इतका वेळ बसला आहे अन् तुला—" मामी सुलोचनेकडे पाहून म्हणाली.

"मामी, हा प्रच्छन्न आरोप आहे. मला येऊन फार वेळ झाला नाहीं. अन् एकमेकांची चहा करीत बसण्यापलीकडे आम्हांला चहा पिण्याची जरूरीच भासली नाहीं—" मी हंसून म्हणालों.

"स्वतांची चहा करण्यांत काय भूषण आहे ? " मामी म्हणाली.

"स्वाभिमान हें कांहीं दूषण नव्हे. अन् मामी, आपल्या पुस्तकाची इतरेजनाकडून अट्टाहासानें भरमसाट स्तुती करून घेणारे लोक जगांत आहेतच. पण त्यांच्यासारखा आचरटपणा आम्ही केला नाहीं. आम्ही आपल्या आपल्यांत स्तुतीची खिरापत वांटीत होतों. सुली मला आंधळा म्हणे अन् मी तिला रडुबाई म्हणे.—आम्ही स्वतांच आरतीचं ताम्हन तोंडापुढं फिरवीत होतों." मी उभ्या असलेल्या पाटाच्या राशीवर बसून म्हणालों.

"पाट अधांत्री आहेत—" सुलोचना हंसूं दाबून म्हणाली.

"मला माहिती आहे. मी पडलों म्हणजे तुझी करमणूक व्हावी या उद्देशानं मी मुद्दामच तसा बसलों आहे—" मी म्हणालों.

"सुली, तूं चहाकडे पाहिलंस का ? एक गोष्ट तुला कितीदां सांगावी लागते ग ? " मामी म्हणाली.

"मामी, अष्टपुत्री नेसून गौरीहरापुढें इंद्रायणीची प्रार्थना करीत बसणारी भगवतीदेवी एका शब्दानं सांगून कशी वळणार ? तिला—पण तें लांब आहे. आतां तूं माझी काळजी सोड. मला या घरांत चहा मिळणार नाहीं ही काळजी तूं आतां करण्याचं कांहीं कारण नाहीं. ती बघ कशी डोळे वटारून पाहते आहे माझ्याकडे—" मी हंसत म्हणालों.

"मी पाटावर चाललेल्या कसरतीकडे पहातें आहें—" सुलोचना चहाचें भांडें उतरीत म्हणाली.

नंतर मामीनें मला एकीकडे नेलें. मामीची मुद्रा गंभीर होती.

" सदू, तूं हा थट्टाविनोद मनापासून करीत नाहींस हें मी ओळखलं आहें. ह्याच्या पाठीमागं कांहीं तरी आहे. तुझ्या मनाला ही उपरती कोठून झाली ? आजपर्यंत सुलीशीं इतक्या सख्य भावानं वागतांना आज मीं तुला प्रथम पाहिला. ह्या स्थित्यंतराचं कारण काय ? " मामी चिंतातुर मुद्रेनें म्हणाली.

" मामी, अग बायको ही जातच मुळीं अशी आहे कीं—" मी हंसून म्हणालों. मामीनें माझा हात धरला.

" फाजिलपणा पुरें कर. मी अगदीं जीव कळवळून विचारतें आहें, अन् तूं बायकोची जात कशी आहे तें मला सांगतो आहेस ! का जगाविरहित तुलाच एकट्याला बायको मिळणार आहे—" मामी म्हणाली.

" अग पण मामी, जगाला आणखी भाराभर बायका मिळाल्या तर मला त्यांच्याशीं काय कर्तव्य आहे ! मला एकच मिळणार आहे.— रागावूं नकोस. मामी, ह्या स्थित्यंतराचं कारण मी तुला उघड मनानं सांगणार आहे. मी आयुष्यांत आजवर एक मोठी चूक करीत आलों आहें. ती चूक पुन्हां न करण्याची सावधगिरी बाळगणं म्हणजे हें असं आत्तांच्यासारखं वागणं, हें मला पटलं आहे. मी सुलोचनेशीं कधींच मिळूनमिसळून वागलों नाहीं—" मी म्हणालों.

" मग त्या चुकीचा दंड म्हणून का तूं मनाविरुद्ध तिच्याशीं लग्नाला तयार होणार आहेस ? " मामी हंसून म्हणाली.

" असा विपर्यास करूं नकोस, मामी. माझं म्हणणं नीट ऐकून घे. आजपर्यंत मी स्वतःविषयींच्या विचारांत इतका गुरफटून गेलों होतों कीं माझ्याप्रमाणं लोकांनाहि भावना असतील ही कल्पना मला आली नाहीं. माझ्या मनाविरुद्ध गोष्ट झाली कीं, मी हातपाय आपटून आकाशपाताळ एक करण्याचा घाट घालीत असे; पण मला आज कळलं कीं, जगामध्यें दुसऱ्या लोकांनाहि आपल्याप्रमाणंच भावना आहेत. सुलोचनेला मी एक लांकडाची बाहुली यापलीकडे फारशी किंमत देत नव्हतों; पण

सुलोचना मनुष्य आहे हें मला कळून आलं—" मी दूरवर दृष्टि फेंकीत म्हणालों.

" त्या दिवशीं संध्याकाळीं—? " मामी खिन्न मुद्रेनें म्हणाली.

" त्या दिवशीं म्हणजे ? " मी आश्चर्यानें प्रश्न केला.

" सदू, वेड पांघरून तूं कितीहि छपवाछपवी केलीस तरी मला तो प्रकार कळला. त्या दिवशीं मी बाहेरून सर्व प्रकार ऐकत होतें. बन्या निघून गेलेला मीं पाहिलं. सदू, त्या दिवशीं मीं आशा सोडली. आजवर मीं सुलोचनेला माझी 'मुलगी' म्हणून मोठ्या अभिमानानं मिरवीत होतें. मला तिची किंमत कळून आली. आणि म्हणून मीं तुला पुन्हां एका शब्दानं विचारलं नाहीं. सदू, अजून विचार कर—गेलेला शब्द मागं घेतलास तरी मला दुःख वाटणार नाहीं. पण तूं मनाला खात राहिलेला पाहून मला नको जीवसं होईल. सदू, लहानपणापासून मला तुझी माया लागलेली आहे. तुझं अकल्याण व्हावं असं मला मुळींच वाटणार नाहीं. सुलोचनेचं नशीब आणि ती, काय वाटेल तो गोंधळ घालूं देत; मला त्याची परवा नाहीं—"

" मामी, मला आधीं सांग—तूं मामांना यांतलं एक अक्षर सांगितलंस का ? " मी उतावीळ मुद्रेनें म्हणालों.

मामीनें मान हालवून नकार दर्शविला. मीं समाधानाचा सुस्कारा सोडला.

" मग माझं एक म्हणणं आहे. त्यांना या बाबतींत एक अक्षर सांगूं नकोस. मामांच्या निरागस आनंदांत विरजण पाडण्याची माझी इच्छा नाहीं. त्यांना न कळलेलंच बरं. आणि मामी, तूं आतां आम्हा तरुणांच्या भानगडी चोरून ऐकायला कांहीं लहान नाहीस ! उद्यां सुलीशीं थट्टा करीत बसलों तरी तुझ्या कानांची मला भीति बाळगावी लागेल ! मामी, झाल्या गोष्टी गेल्या. चूक होणं हा मनुष्यधर्म आहे; पण त्या न विसरणं हा मनुष्यधर्म नाहीं—" मी म्हणालों.

" सदू—सदू—" म्हणून मामीनें मला पोटाशीं धरून अश्रूंनीं न्हाऊं घातलें. सुमारें पंधरा वर्षांपूर्वी आमच्या घरांत सुली बाजेवर पडली अस-

तांना मामीनें मला असेंच पोटाशीं कवटाळून धरलें होतें. मी त्या वेळच्या हूडपणानें मामीच्या मांडीवर डोकें घुसळलें.—मामी किती तरी वेळ रडत होती.

" मामी, मनाला मोकळं सोडलं कीं वावटळीसारखे विचाराचे वारे वाहूं लागतात. मी विचार करण्याचं सोडून देणार आहें. मनाला बांधून टाकण्याकरतां म्हणून सुलोचनेच्या हातांचा मी उपयोग करण्याचं मनांत आणलं आहे. पुरुषांच्या मनोवृत्तींना आळा घालण्याचं काम स्त्रियांच्या हातांकरवीं घडत असतं. लग्न झालं म्हणजे साहजिकच माझा जीव दुसरीकडे गुंतेल, आणि विचारांना मूठमाती देण्यास सोपं पडेल—" मी मामीपासून दूर होऊन म्हणालों.

" पण विचार कसा सुटेल ?" मामी म्हणाली.

" सुटेल,—मामी आपण मनांत धरलेल्या आशा फोल झाल्या तरी आशावाद फोल होत नसतो. अंतर्यामांत आशावाद टिकून असतो. माझ्या विवक्षित आशा फोल झाल्या, पण त्या आशांच्या जळत्या चितेंतून ह्या नवीन आशा बाहेर पडल्या. सुलोचनेला माझ्या पूर्वीच्या विचारांची मी यत्किंचित्‌हि झळ लागूं देणार नाहीं. आम्ही आयुष्यांत पाऊल टाकूं तें नवीन आशांचं पुडकं कांखोटीला मारून टाकूं. आमच्या दोघांच्या आशा एक रहातील. आम्ही एकत्र आशावाद करूं. आमच्या इच्छा, आमच्या आकांक्षा एकमताच्या रहातील. पतिपत्नी या नात्यानं त्या मिळवण्याचा आम्ही मनापासून प्रयत्न करूं. शोकपर्यवसायी गोष्टींतून आनंदाचा उगम होतो तो असा—मनुष्याला एकदां ठेंच बसलेली असली कीं, पुढं तो ठेंच खाण्याचा प्रसंग सहसा येऊं देत नाहीं.—पण पुन्हां मी विचार करूं लागलों;—आंत चल. सुली रडूं लागली असेल. तिला आतां आपल्या साध्या बोलण्यांतसुद्धां डाव तर चालला नाहीं ना अशी शंका येणं स्वाभाविक आहे—"

मामा आपल्या कन्येच्या पुढें बसून कांहीं तरी वाद घालीत असलेले मीं पाहिलें.

" अरे सदू, ही काय म्हणते आहे ऐकलंस का ? कोण आलं आहे

सुलोचना मनुष्य आहे हें मला कळून आलं—" मी दूरवर दृष्टि फेंकीत म्हणालों.

" त्या दिवशीं संध्याकाळीं—! " मामी खिन्न मुद्रेनें म्हणाली.

" त्या दिवशीं म्हणजे ! " मी आश्चर्यानें प्रश्न केला.

" सदू, वेड पांघरून तूं कितीहि छपवाछपवी केलीस तरी मला तो प्रकार कळला. त्या दिवशीं मी बाहेरून सर्व प्रकार ऐकत होतें. बन्या निघून गेलेला मीं पाहिलं. सदू, त्या दिवशीं मीं आशा सोडली. आजवर मी सुलोचनेला माझी 'मुलगी' म्हणून मोठ्या अभिमानानं मिरवीत होतें. मला तिची किंमत कळून आली. आणि म्हणून मीं तुला पुन्हां एका शब्दानं विचारलं नाहीं. सदू, अजून विचार कर——गेलेला शब्द मागं घेतलास तरी मला दुःख वाटणार नाहीं. पण तूं मनाला खात राहिलेला पाहून मला नको जीवसं होईल. सदू, लहानपणापासून मला तुझी माया लागलेली आहे. तुझं अकल्याण व्हावं असं मला मुळींच वाटणार नाहीं. सुलोचनेचं नशीब आणि ती, काय वाटेल तो गोंधळ घालूं देत; मला त्याची परवा नाहीं—"

" मामी, मला आधीं सांग—तूं मामांना यांतलं एक अक्षर सांगितलंस का ? " मी उतावीळ मुद्रेनें म्हणालों.

मामीनें मान हालवून नकार दर्शविला. मीं समाधानाचा सुस्कारा सोडला.

" मग माझं एक म्हणणं आहे. त्यांना या बाबतींत एक अक्षर सांगूं नकोस. मामांच्या निरागस आनंदांत विरजण पाडण्याची माझी इच्छा नाहीं. त्यांना न कळलेलंच बरं. आणि मामी, तूं आतां आम्हा तरुणांच्या भानगडी चोरून ऐकायला कांहीं लहान नाहींस ! उद्यां सुलीशीं थट्टा करीत बसलों तरी तुझ्या कानांची मला भीति बाळगावी लागेल ! मामी, झाल्या गोष्टी गेल्या. चूक होणं हा मनुष्यधर्म आहे; पण त्या न विसरणं हा मनुष्यधर्म नाहीं——" मी म्हणालों.

" सदू—सदू—" म्हणून मामीनें मला पोटाशीं धरून अश्रूंनीं न्हाऊं घातलें. सुमारें पंधरा वर्षांपूर्वी आमच्या घरांत सुली बाजेवर पडली अस-

तांना मामीनें मला असेंच पोटाशीं कवटाळून धरलें होतें. मी त्या वेळच्या हूडपणानें मामीच्या मांडीवर डोकें घुसळलें.—मामी किती तरी वेळ रडत होती.

" मामी, मनाला मोकळं सोडलं कीं वावटळीसारखे विचाराचे वारे वाहूं लागतात. मी विचार करण्याचं सोडून देणार आहें. मनाला बांधून टाकण्याकरतां म्हणून सुलोचनेच्या हातांचा मी उपयोग करण्याचं मनांत आणलं आहे. पुरुषांच्या मनोवृत्तींना आळा घालण्याचं काम स्त्रियांच्या हातांकरवीं घडत असतं. लग्न झालं म्हणजे साहजिकच माझा जीव दुसरीकडे गुंतेल, आणि विचारांना मूठमाती देण्यास सोपं पडेल—" मी मामीपासून दूर होऊन म्हणालों.

" पण विचार कसा सुटेल ?" मामी म्हणाली.

" सुटेल,—मामी आपण मनांत धरलेल्या आशा फोल झाल्या तरी आशावाद फोल होत नसतो. अंतर्यामांत आशावाद टिकून असतो. माझ्या विवक्षित आशा फोल झाल्या, पण त्या आशांच्या जळत्या चितेतून ह्या नवीन आशा बाहेर पडल्या. सुलोचनेला माझ्या पूर्वींच्या विचारांची मी यत्किंचित्‌हि झळ लागूं देणार नाहीं. आम्ही आयुष्यांत पाऊल टाकूं तें नवीन आशांचं पुडकं कांखोटीला मारून टाकूं. आमच्या दोघांच्या आशा एक रहातील. आम्ही एकत्र आशावाद करूं. आमच्या इच्छा, आमच्या आकांक्षा एकमताच्या रहातील. पतिपत्नी या नात्यानं त्या मिळवण्याचा आम्ही मनापासून प्रयत्न करूं. शोकपर्यवसायी गोष्टींतून आनंदाचा उगम होतो तो असा—मनुष्याला एकदां ठेंच बसलेली असली कीं, पुढं तो ठेंच खाण्याचा प्रसंग सहसा येऊं देत नाहीं.—पण पुन्हां मी विचार करूं लागलों;—आंत चल. सुली रडूं लागली असेल. तिला आतां आपल्या साध्या बोलण्यांतसुद्धां डाव तर चालला नाहीं ना अशी शंका येणं स्वाभाविक आहे--"

मामा आपल्या कन्येच्या पुढें बसून कांहीं तरी वाद घालीत असलेले मीं पाहिलें.

" अरे सदू, ही काय म्हणते आहे ऐकलंस का ! कोण आलं आहे

राहू आनंदी मुद्रेनें हातांतल्या बरूंना चार दिशा दाखवीत पुढें आला.

" तुझ्या म्हणण्याला मान देऊन मीं सुलूबाईला यापुढं फुकट कागद देण्याचं ठरवलं आहे. तुला आईनं तें सांगितलंच असेल---" मी टेबलावर पायांची जुडी टेकवीत म्हणालों.

" मला मामासाहेबांनीं बंगल्यावर बोलावलं होतं---त्यांनीं मला सांगितलं. सदुभाऊ, आम्हा म्हाताऱ्यांचं म्हणणं तुम्हीं ऐकलंत म्हणजे आम्हा म्हाताऱ्याना फार गोड वाटतं. अजून जगामध्यें आम्हांला विचारणारी मंडळी आहेत हें पाहून जरा बरं वाटतं---अन् पोर पण पोर आहे; वाटेवरचा चोर पत्करील---" राहू म्हणाला.

" हो ! तीच मला भीति होती. वाटेवरच्या चोरानं तिला नेऊं नये म्हणून मीं तिला संरक्षण देण्याचं टरवून टाकलं." मी म्हणालों.

" सदुभाऊ, मीं सुलोचनाबाईजवळ आमच्या कागदाचे पैसे मागितले. त्यांनीं इकडे तिकडे कोणी नाहीं असं पाहिलं अन् चटकन् उत्तर केलं---काय म्हणाल्या बरं ? हां---आठवलं. 'राहू, मी तुझी बाईसाहेब आहे हो. आतां माझ्या नांवचे पैसे तिकडच्या नांवावर वसूल करून घेत जा---' म्हणाल्या---अन लगेच घरांत पळाल्या. मी हंसतां हंसतां बेजार झालों. सदुभाऊ, तुम्हांला नाहीं हंसूं येत ?---" राहू मोठ्या आशेनें म्हणाला. मीं मुद्दामच गंभीर मुद्रा धारण केली.

" यांत हंसण्याजोगं काय आहे ? यांत आपणा दोघांचा अपमान आहे, हें तुला कसं समजत नाहीं ? ' तुझी बाईसाहेब आहें हो ' या वाक्यांत तिनं तुला तुझी जागा दाखविली आहे. याचाच सरळ अर्थ असा घेतां येईल कीं, 'राहू---खबरदार पुन्हां माझ्याशीं पैशाची गोष्ट काढलीस तर !' तूं नोकर आहेस. मी मालकीण आहें. मी काय वाटेल तें करीन '---आतां दुसरं वाक्य मला उद्देशून आहे. आपले पैसे एखाद्याकडून वसूल व्हावयाचे असले आणि ते वसूल होणं शक्य नसलं तर आपण काय करतों ? बुडीतखर्च म्हणून म्हणतों, अन् त्याच्या पतीची किंमत ओळखतों. तिनं जातां जातां सुचवलं कीं, पैसे जर मीं देण्याचं नाकारलं तर मला पत नाहीं---राहू, मराठी भाषा वांकवावी तशी वांकवतां येते, बाबा! त्यांतल्या

त्यांत पुण्यांत राहिलेल्या बायकांच्या एकेका मराठी शब्दाला कमींत कमी दहादहा अर्थ असतात. त्यांच्यापासून आम्ही ही मायबोली शिकतों, पण आम्हांला हात टेकणं भाग पडतं—" मी राहूकडे पाहून हंसूं लागलों.

"सदुभाऊ हें तुम्ही बोललांत म्हणून मीं ऐकून घेतलं—" राहू रागानें म्हणाला.

"आणि राहू, तूं आहेस म्हणूनच मीं बोलून घेतलं—राहू, दुसरं एक मी तुला विचारणार आहें. भाऊ गेल्यापासून एवढं मोठं घर अगदीं शून्य दिसतं. तर तूं भाडेकरी म्हणून येणार आहेस का ? मीं मामांना तो बंगला सोडून द्यायला सांगितलं आहे; ते उद्यां किंवा परवां आपल्या घरांत येतील—" मी म्हणालों.

"सुलूबाई आपल्याकडे रहायला येणार ? मग मी धांवतच येईन !" राहू आनंदानें म्हणाला.

आज उद्यां, केव्हां तरी येणार म्हणून ज्या प्रसंगाची मी आतुरतेनें वाट पहात होतों तो प्रसंग यानंतर सुमारें एक आठवड्यानें घडून आला.

शकुन्तला प्रत्यक्ष माझ्यापुढें उभी होती, पण मला खरेंच वाटेना. आठ दिवसांपूर्वी आपल्या माहेरच्या नांवावर पाणी सोडून आयुष्याला तोंड देण्यास तयार झालेली शकुन्तला माझ्या खुर्चीवर बसली होती. संध्याकाळची पांचाची वेळ होती म्हणून बरें, नाहीं तर मामा, मामी, आई—सगळ्यांनीं माझ्याकडे कोणत्या दृष्टीनें पाहिलें असतें ! आई आणि मामी तुळशीबागेंत का कुठेंशा गेल्या होत्या. मामांना घरीं यायला दीड तास अवकाश होता. मी घरांत शिरतांच सुलोचना पुढें आली. कुणाला तिसऱ्याला न ऐकूं जाईल अशा आवाजांत तिनें मला 'कोणशीशी बाई—तुमच्याकडे आली आहे' म्हणून वर्दी दिली. मीं ओळखलें; पण न ओळखल्यासारखी मुद्रा करून मी चहा करण्यास तिला सांगून वर गेलों. सुलोचनेला कांहीं तरी सुगावा लागला असावा अशी तिची चर्याच सांगत होती.

शकुन्तला माझ्या खुर्चीवर बसून गळ्यांतले मणी चघळीत होती. माझ्याकडे तिनें मान वर करून पाहिलें.

" म्हटलं आज गांठ पडते कीं नाहीं ! त्यांतून तुमची आई घरांत नाहीं. ती मुलगी कोण आहे ?—" शकुन्तला एकदम म्हणाली.

" सुलोचना; माझी मामेबहीण.—पण मामांनीं माझ्या सोडमुंजीच्या वेळीं दिलेलं वचन खरं करण्याकरितां म्हणून मोठ्या मिनतवारीनं त्यांनीं तिला आमच्या घरांत घुसडविण्याचा विचार चालवला आहे—" मी हंसून म्हणालों.

" अस्सं काय ! मग बरोबर आहे. अतिस्नेहः पापशंकी—ही म्हण बरोबर आहे." शकुन्तला पदराच्या टोंकाशीं खेळत म्हणाली.

" मी नाहीं समजलों—" मी गोंधळून म्हणालों.

" कळकळीच्या प्रेमावांचून मत्सर उत्पन्न होत नसतो." शकुन्तला हनुवटीवर डाव्या हाताची तर्जनी ठेवून म्हणाली.

" म्हणजे ! कुणी कुणाचा मत्सर केला ?—" मी म्हणालों.

" साहजिक आहे. आपल्या माणसांशीं तिसरी बाई येऊन बोलूं लागली म्हणजे कुणालाहि चुकल्याचुकल्यासारखं होणारच. पण मी तिचा मत्सर येथून जाण्याच्या आंत काढीन—" शकुन्तला म्हणाली.

पुन्हां आमच्या बोलण्यांत खंड पडला. वाटेल त्या विषयावर तासतास चर्चा करणारा साठे,—त्याचा मी पट्टशिष्य—! पण शकुन्तलेपुढें काय बोलावें हें मला सुचेना. ' तूं ' का ' तुम्हीं '—काय वापरावें ?

" पण तूं इकडे आलीस कशी ?" मी भीत भीत म्हणालों. शकुन्तलेनें चमकून माझ्याकडे पाहिलें.

" अति त्रास पडला. पण एकदां माझा निश्चय झाला. मैत्रिणीकडे जाणार आहें म्हणून सांगून आलें." ती म्हणाली.

" मी तुझी मैत्रीण वाटतं ! " मी धिटाईनें म्हणालों. ' तूं ' सर्वनाम पचनीं पडलेलें मीं ताडलें. " शकुन्तला, मला तुला एक प्रश्न विचारायचा आहे. तूं हा जो भांडणाचा निश्चय केला आहेस तो टिकवण्याचं तुझ्यांत सामर्थ्य आहे, असं तुला प्रामाणिकपणानं वाटतं का ? तूं आयुष्यांत पुढं काय करणार आहेस ?"—मी पुढें म्हणालों.

" आमच्या पतिराजांसारखे अरेरावी वर्तनाचे पुरुष असतात त्यांना

घडे शिकणवणार आहें. मुली म्हणजे मत्ता समजून लत्ता उडवण्याच्या वस्तु नाहींत हें मी त्यांना पटवून देणार आहें. मी स्वतः लागेल तितका त्रास सोसायला तयार आहें. पण माझ्याप्रमाणं इतर मुलींना त्रास सोसायला लागूं नये ही माझी इच्छा!—स्पष्ट बोलायला हरकत नाहीं—एवीतेवी माझा मनोभंग झाला आहे. माझ्या सुखाच्या कल्पना जळून खाक झाल्या आहेत. पण झाल्या गोष्टीचा विषाद न मानतां, पुढं येणाऱ्या गरीब जीवांना त्रास पडूं नये म्हणून मी मुद्दाम पायावर धोंडा पाडून घेणार आहें. माझ्या आयुष्याचे जितके हाल होतील तितके मला पाहिजे आहेत. भडक रंगाचं चित्र जास्त परिणामकारक असतं. माझ्या उदाहरणानं तरी कांहीं सुधारणा झाली तर माझ्या आशा सफल झाल्या असं समजून मी आनंद मानीन–" शकुन्तला आवेशानें म्हणाली.

"तूं माझं ऐकशील का ?" मी मध्येंच म्हणालों.

"नाहीं. स्वच्छ नाहीं. मी या बाबतींत कुणाचंच ऐकणार नाहीं. पहिली चकमक मीं कालच उडवली. आमच्या सासूबाईनीं मला तपेली भरून ठेवायला सांगितलं. मीं ठेविली. मध्यें कुणी ती ओतून दिली मला कांहीं माहीत नाहीं. पण जरा वेळानं त्या मला टाकून बोलूं लागल्या! 'शिकलेल्या मुली तुम्ही अशा ग कशा दाडग्या ! एक काम धड नाहीं करायचं !—' मातीन् मसण. वाटेल तें बोलूं लागल्या. मीं लगेच उत्तर केलं कीं, 'शिकलेल्या मुली तुमच्या घरीं हमाली करायला येत नसतात. तोंड संभाळून बोला—' झालं. आमच्या पतिराजांची स्वारी रागानं फणफणत आली. मीं एका शब्दानं त्यांना परतायला लावलं—'बेतानं वागा !' हा माझा सल्ला त्यांना पटला—!" शकुन्तला अभिमानपूर्ण आवाजानें म्हणाली.

"पण शकुन्तला, हा तुझा विध्वंसनाचा प्रकार काय उपयोगीं ?—" मी म्हणालों.

"वा ! शहरांतली कोंदट वस्ती नाहींशी करण्याकरतां आपण काय करतों ? झाडांना नवी पालवी फुटण्यापूर्वी हिवाळ्यांत त्या पानांची काय वाट होते ? तांदळाचं पीक कसल्या जमिनीवर काढतात ? विध्वंसनकार्य

चालू केलं तरच लोक ताळ्यावर येतील. आतां मुलींनीं जन्मभित्रेपणा सोडला पाहिजे. असल्या पतिदेवांबरोबर जिवाचा मोक्षमोक्ष होईपर्यंत उभा दावा मांडला पाहिजे. मुली भित्र्या. मी भित्री होतें. पुरुषांना धीर झाला नाहीं तरी, मनानं पसंत केलेल्याला मुलींनीं हातचा सोडतां कामा नये—त्यांनीं आपल्याला विचारलं नाहीं तरी आपण होऊन त्यांना विचारावं—ही माझी शिकवणूक आहे. मुलांमुलींनीं दोघांनींहि हा धीटपणा आंगीं आणला पाहिजे. मनांत लाख वाटत असेल, पण उच्चाराशिवाय प्रेम आहे किंवा नाहीं हें कसं कळून येणार—! तो उच्चार करायला मी मुलींना शिकवणार आहें—" शकुन्तला म्हणाली.

" शकुन्तला, वाङ्मयामध्यें प्रेमाशीं आपण जितकी सलगी घेतों तितकी व्यवहारांत ती आपल्याला नसते. वाचेनं मुलानं मुलीला तें कसं सांगावं ? किंवा मुलीनं मुलाला कसं सांगावं ? "—मी शंका पुढें करून म्हणालों.

" मुख्य प्रश्न लाजेचा येतो. थोडीशी लाज गुंडाळून ठेवली पाहिजे. बरं, असलं प्रेम शब्दानं व्यक्त करण्याचे प्रसंग भर बुधवारांत कांहीं येणार नाहींत. एकमेकांनीं सहानुभूतीनं एकमेकाचं ऐकून घ्यावं. मुख्य म्हणजे आतां मुलींनीं बंडखोर वृत्ती धारण केली पाहिजे. स्वतःच्या पसंतीनं आपला जोडीदार त्यांनीं शोधून काढला पाहिजे. आईबाप ऐकत नाहींत तर भांडावं, रडावं, रुसावं, धाक घालावा—काय वाटेल तें करावं; पण धरून आणलेल्या लंबकर्णाच्या गळ्यांत माळ टाकून मोकळं होऊं नये. मला हे विचार आज सुचत आहेत पण हातून घडलेली चूक दुसऱ्याला नडूं नये ही माझी इच्छा. पुढच्या पिढीचं कल्याण व्हावं ही माझी आशा. मुलींनीं मनांत आणलं तर त्यांना बऱ्याच गोष्टी करतां येतील. मात्र पहिली गोष्ट ही कीं, त्यांनीं मनुष्यघाणेपणा सोडून दिला पाहिजे. बरोबरच्या मुलाशीं फटकून वागणं केव्हांहि बरोबर नाहीं. त्याचा आपला हेवादावा नसतांना उगाच त्याच्यावर डोळेफाड काय म्हणून ? नीतिमत्तेच्या सबबीखालीं आपल्याला कल्पनातीत दडपून टाकण्यांत येत आहे, ही त्यांना जागृति झाली पाहिजे. आपल्याला भेटणारे, आपल्याशीं बोलणारे जे बरोबरीचे लोक असतील ते मनांत पापवासना

धरूनच आपल्याजवळ येतात ही समजूत चुकीची आहे. तसा प्रसंग आलाच तर आपण दूर व्हावं. पण घर, घरचीं माणसं अन् देव-घरचा कोंपरा—हीं ओलांडून थोडंसं पलीकडे गेलं पाहिजे. जगांत भेटणारे सगळेच पापी असतात असं मानायचं तर त्यांत तुमचीहि गणना होते, हें कुणी तरी मुलींना समजावून सांगितलं पाहिजे. तें कार्य मी करणार आहें. विवाह ही एक धगधगीत अग्निरेषा आहे. एकदां ओलां-डली कीं माघार म्हणून घेतां येत नाहीं. प्रथमच डोळे उघडे ठेवून पाऊल टाकलं पाहिजे—–"

"शकुन्तला, तुझे विचार बरेचसे माझ्या विचाराशीं जुळते आहेत; पण तुझ्यासारखं माझ्यांत धैर्य नाहीं. माझा आशावाद फारच अल्प आहे. दुसऱ्यावर प्रेम करणं आणि दुसऱ्यानं आपल्यावर प्रेम करावं असं वागणं हेंच माझं ध्येय आहे. आणि Charity begins at Home या तत्त्वाला अनुसरून मी सुलोचनेवर प्रेम करायला शिकतों आहें—" मी म्हणालों.

"म्हणजे शिकवणी आहे वाटतं कुणाची—?" शकुन्तला हंसून म्हणाली. मी धीर करून म्हणालों,

"शकुन्तला— विसरूं म्हटल्यानं विसर पडत नाहीं. मला दोन गोष्टी करायच्या आहेत. पहिल्याचा विसर पाडणं अन् दुसऱ्याची सुरुवात करणं— ह्या गोष्टी अत्यंत कठीण आहेत—" मी म्हणालों.

"खरं आहे. तो अनुभव मला आहे. फक्त मला दुसऱ्यावर सुरुवात करायची नाहीं. आयुष्यांत माझ्यासारख्या भावनाप्रधान मुलींना कोणतीहि गोष्ट एकदांच करावीशी वाटते. आतां मी 'प्रेम हा शब्द विसर-ण्यास शिकतें आहें—" शकुन्तला जड आवाजानें म्हणाली.

सुलोचना चहा घेऊन आंत आली. शकुन्तलेनें तिच्या खांद्यावर हात ठेवून म्हटलें,

"सुलूबाई, माझा मत्सर तुम्हांला कां वाटावा ? माझं नांव शकुन्तला आहे हें मी तुम्हांला सांगितलंसुद्धां नाहीं. का माझ्या डोळ्यांवरून तुम्ही माझी परीक्षा केलीत ? कांहीं का असेना, मी तुम्हांला बजावून सांगतें कीं

आतां मत्सराचं कांहीं कारण नाहीं. मी तुमची बहीण आहें. माझ्यापासून तुम्हांला कांहींहि धोका पोहोंचणार नाहीं—"

सुलोचना मुकाट्यानें माझ्याकडे पाहूं लागली.

" हें पहा, तुम्ही माझ्याकडे पहा. एक वेळ कदाचित् तुमच्या जागीं मी—पण तें आपण विसरून जाऊं. सुलूबाई, अगदीं मोकळ्या मनानं या बहिणीला शेवटचा निरोप द्या. माझा तुमचा पुढं आयुष्यांत एकत्र भेटण्याचा मुळींच प्रसंग येणार नाहीं." शकुन्तला चहाचा कप उचलून म्हणाली. चहा होईपर्यंत कोणीच मध्यें बोललें नाहीं.

" सुलूबाई—माझी आठवण तुम्हांला रहावी म्हणून—" असें म्हणत शकुन्तलेनें आपल्या हातांतली एक सोन्याची बांगडी सुलोचनेच्या हातांत अडकविली. सुलोचना भीतीनें मागें हात घेऊं लागली.

" अगबाई, खरंच ! तुम्ही दोघेहिजणं एकमताचीं आहांत, नाहीं का ? माहिती आहे ! घाला ती बांगडी हातांत—कांहीं राग भरणार नाहींत. मी सांगतें—" म्हणून म्हणत शकुन्तलेनें सुलोचनेच्या हातांत ती बांगडी घट्ट बसवली.

" आणि मला—? " म्हणून मी हंसत म्हणालों.

" आपल्याला जें काय देणं होतं तें पूर्वींच देऊन ठेवलेलं आहे—आतां बाकी माझ्याजवळ शून्य—" म्हणून म्हणत शकुन्तला निघून गेली. हीच तिची शेवटची भेट—

सुलोचना अजून विचार करीत उभी होती. मीं तिला हाताला धरून हालवलें, तेव्हां ती जागी झाली.

" सुली, ह्या मुलीवर माझं मनापासून प्रेम आहे—पण त्या प्रेमाची काय वासलात लागली तें तूं प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहात आहेस—पुन्हां तूं तिच्यावर रागावणार नाहींस ना ? तिच्यावर जें माझं प्रेम आहे त्याच प्रेमाची तूंहि भागीदारीण आहेस—" मी म्हणालों.

सुलोचनेनें उत्तर न करतां मुकाट्यानें माझ्या छातीवर डोकें ठेवलें—!

समाप्त.